पुणें विद्यापीठ



बहिःशाल शिक्षण मंडळ

## बहिःशाल शिक्षण ग्रंथमाला

संपादक

अ. वि. नाईक, एम्. ए., पीएच्. डी.

सचिव, बहिःशाल शिक्षण मंडळ

१

# जगाचें राजकारण

(जागतिक राजकारणाचा ओळखता परिचय)


लेखक

वसंत मंजुनाथ सिरसीकर

एम्. ए.

राज्यशास्त्राचे प्राध्यापक,

स. प. महाविद्यालय, पुणें, २.



एप्रिल, १९५४ ]

[ मूल्य ३ रुपये

# प्रकाशक–निवेदन

मुंबई सरकारच्या सन १९४८ च्या **पुणें विद्यापीठ** कायद्यांतील २६ व्या कलमान्वयें, पुणें विद्यापीठानें १९५० साली **बहि:शाल शिक्षण मंडळ** स्थापन केलें. मंडळाच्या उद्देशांपैकीं सामान्य जनतेला उपयुक्त असणाऱ्या व आकलन होणाऱ्या विषयांवर पुस्तकें लिहून घेण्याची व प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करणें हा एक आहे.

तदनुसार **'जगाचें राजकारण'** हें पुस्तक प्रा. व. मं. सिरसीकर, एम्. ए. यांजकडून मंडळानें तयार करून घेतलें आहे व तें आतां **बहि:शाल शिक्षण ग्रंथमालेंतील** पहिलें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

पुणें विद्यापीठ,
गणेशखिंड, पुणें ७.
चैत्र शु॥ १, शक १८७६
४–४–५४

**अ. वि. नाईक**
सचिव,
बहि:शाल शिक्षण मंडळ.

# निवेदन

'जगाचें राजकारण' या पुस्तकाचें स्वरूप पूर्णपणें परिचयात्मक आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणाचें सर्वांगीण विवेचन करणारा हा ग्रंथ नव्हे. परिचयात्मक पुस्तकाच्या मर्यादा सांभाळून विषयाचें सुलभ विवेचन करण्याचा मीं प्रयत्न केला आहे. १९५१–५२ या वर्षी पुणें विद्यापीठाच्या बहिःशाल शिक्षण मंडळातर्फे मी या विषयावर दिलेलीं व्याख्यानें श्रोत्यांना पसंत पडलीं. त्यावेळचे मंडळाचे सचिव श्री. ना. अ. गोरे यांच्या प्रोत्साहनामुळें हें पुस्तक लिहून झालें.

विषयाचें विवेचन अधिक स्पष्ट व्हावें या दृष्टीनें सविस्तर टिपणें, कोष्टकें व नकाशे जोडले आहेत. मला वाटतें, वाचकांना त्यांचा चांगला उपयोग होईल.

अनेक अडचणींमुळें पुस्तकाचें प्रकाशन लांबणीवर पडलें; त्यामुळें विवेचनांतील कांहीं भाग आजच्या परिस्थितींत अद्ययावत् वाटणार नाहीं. पण आंतरराष्ट्रीय राजकारणाचें स्वरूप इतकें गतिमान् आहे कीं त्यामुळें सहृदय वाचक या दोषांकडे दुर्लक्ष करतील अशी आशा आहे.

माझें पुस्तक प्रकाशित करणारे पुणें विद्यापीठाचें बहिःशाल शिक्षण मंडळ, त्या मंडळाचे सचिव डॉ. अ. वि. नाईक, विद्यापीठाच्या मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. श्री. रा. परांजपे व त्यांचा कामगारवर्ग या सर्वांच्या सहकार्याबद्दल आभार व्यक्त न करणें कृतघ्नपणाचें ठरेल. सूचि तयार करण्याचें व मुद्रितें तपासण्याचें किचकट व कंटाळवाणें काम माझे मित्र श्री. कुबेर यांनीं केलें. त्यांचाहि मी अत्यंत आभारी आहें. माझे मित्र प्रा. वाघ यांनीं पुस्तकांतील नकाशे तयार करून देऊन मला उपकृत केलें आहे.

माझा हा अल्प प्रयत्न वाचकांना आवडेल अशी आशा आहे.

स. प. कॉलेज,
पुणें २.

व. मं. सिरसीकर

# अनुक्रमणिका

# जगाचें राजकारण

## अर्थ व साधनें : १ :

आधुनिक काळापूर्वी जागतिक राजकारणाचीं सूत्रें कांहीं थोड्या व्यक्तींच्या हातीं केंद्रित झालेलीं असत. तत्कालीन सर्वसामान्य नागरिकांना या महत्वाच्या पण गुप्त राजकारणाविषयीं कांहींहि कळूं शकत नसे. प्रत्येक देशांतील निवडक राजकारणधुरंधर मुत्सद्यांचें तें जणूं राखीव क्षेत्र असे. जागतिक राजकारणाच्या या गुप्ततेंमुळें सामान्य व्यक्ति त्या क्षेत्रापासून अतिशय दूर असे. जागतिक राजकारण आणि सर्वसामान्य व्यक्तिजीवन यांचे आज असलेले निकटवर्ती संबंध त्या काळांत उत्पन्न झालेले नव्हते.

लोकशाहीच्या विकासाबरोबर सर्वसामान्य जनतेला राजकारणाच्या कोणत्याहि क्षेत्रापासून वंचित राखणें अशक्य होऊं लागलें. देशांतर्गत राजकारणांत आपल्या प्रतिनिधींच्या द्वारां सामान्य जनता ज्याप्रमाणें राज्यकर्त्यांच्या धोरणावर नियंत्रण ठेवूं लागली त्याचप्रमाणें स्वतःच्या देशाचें परराष्ट्रीय धोरण काय असावें याविषयीं देखील जनता जागृत राहूं लागली. औद्योगिक क्रांतीनंतरच्या काळांत साऱ्या जगाचें स्वरूप दिवसेंदिवस जणूं लहान होत आहे. पूर्वींच्या काळीं निरनिराळ्या देशांतील अनुल्लंघनीय वाटणारें अंतर, दळणवळणाच्या साधनांतील क्रांतिकारक सुधारणांमुळें आज नाहींसें झालें आहे. औद्योगिक क्रांतीचा परिणाम केवळ याच क्षेत्रांत दिसून येतो असें नाहीं. विशेषत: आर्थिक क्षेत्रांत भिन्न समाज पूर्वींप्रमाणें स्वयंपूर्ण राहिलेले नाहींत. प्रत्येक समाजाला आपल्या दैनंदिन गरजांच्या पूर्तीसाठीं देखील अन्य समाजावर अवलंबून रहावें लागतें. 'जीवनाच्या इतर क्षेत्रांतहि असेच क्रांतिकारी बदल घडून आलेले आहेत.

बिनतारी संदेशयंत्रे, नभोवाणी, 'दूरदर्शन' (टेलिव्हिजन) इत्यादि शोधांमुळें जगाच्या कानाकोपऱ्यांत घडणारी घटना कांहीं निमिषार्धातच सर्व जगाला ज्ञात होते. भिन्न देशांतील अंतर्गत राजकारणाचे परिणाम त्या त्या राष्ट्रापुरते कधींच मर्यादित रहात नाहींत. या सर्व परिस्थितींत जागतिक राजकारणाविषयीं उदासीन रहाणें आधुनिक नागरिकाला शक्य तर नाहींच पण इष्टहि नाहीं.

विसाव्या शतकांत सामान्य व्यक्तींचें दैनंदिन जीवन आणि जागतिक राजकारण यांचें संबंध अत्यंत घनिष्ठ झालेले आहेत. यालू नदीवरील विद्युत्‌निर्माण केंद्रावर होणारा बॉंबवर्षाव, अमेरिकेंतील अध्यक्षपदीं आयसेन हॉवर यांची नियुक्ति, नवरशियाचा निर्माता स्टॅलिनचें निधन, ब्रिटनमधील मजूरपक्षांतील अंतर्गत दुफळी, मलायांतील दहशतवादी चळवळ, दक्षिण आफ्रिकेंतील वर्णद्वेषविरोधी सत्याग्रह, ईजिप्तमधील राज्यक्रांति, अर्जेंटिनांमधील सीनॉर पेरॉंची निवडणूक, इराकमधील अमेरिकाविरोधी निदर्शनें या किंवा यासारख्या इतर निरनिराळ्या देशांत घडणाऱ्या घटनांवर सामान्य व्यक्तीचें जीवित आणि त्याचें सौख्य अवलंबून असतें. या परिस्थितींत जागतिक राजकारणाचें स्वरूप व त्यांतील गुंतागुंत समजून घेण्याचा प्रयत्न करणें एक आवश्यक कर्तव्य ठरतें. पण जागतिक राजकारण म्हणजे तरी काय ?

जागतिक राजकारणाचें विषयसुलभतेच्या दृष्टीनें चार मुख्य विभाग कल्पिता येतात. (१) आंतरराष्ट्रीय संबंध (२) आंतरराष्ट्रीय विधि-नियम. (३) आंतरराष्ट्रीय संघटना. (४) आंतरराष्ट्रीय इतिहास. पहिल्या प्रकारांत आज अस्तित्वांत असलेल्या राष्ट्रराज्यांच्या परस्पर संबंधांचा, सहकार्याचा आणि संघर्षाचा विचार अंतर्भूत होतो. या संघर्षांतून आणि सहकार्यातून आंतरराष्ट्रीय विधिनियम जन्माला येतात. आंतरराष्ट्रीय विधिनियम आणि आंतरराष्ट्रीय संबंध हे दोन्ही विभाग परस्परावलंबी आहेत. आंतरराष्ट्रीय विधिनियमांचें पालन भिन्न

राष्ट्राज्यांना केवळ शांततेच्या काळांतच करावें लागतें असें नाहीं. युद्धकाळांत देखील या विधिनियमांचें पालन युद्धमान व तटस्थ राष्ट्रें कसोशीनें करतात. निरनिराळया राष्ट्रांतील संघर्षांमुळें युद्धे निर्माण होतात. विसाव्या शतकाच्या प्रथमार्धांतच जागतिक स्वरूपाचीं दोन महायुद्धें लढलीं गेलीं. या संघर्षांमुळें मानवजातीचें आणि संस्कृतीचें केवढें अपरिमित नुकसान झालें याची मोजदाद कधींच करतां येणें शक्य नाहीं. पण या संघर्षांतूनच मानवजातीला आशादायक वाटणाऱ्या आंतरराष्ट्रीय संघटना निर्माण झाल्या. वरील तीनहि प्रकारांची नोंद सुसंगत रीतीनें ठेवणें भावी पिढ्यांना मार्गदर्शक ठरतें. हाच आंतरराष्ट्रीय इतिहास होय. जागतिक राजकारणाच्या या सर्व विभागांचा साधा शलाकापरिचय देखील या पुस्तकात करून देणें स्थलाभावीं शक्य नाहीं. आंतरराष्ट्रीय संबंध आणि आंतरराष्ट्रीय संघटना यांची तोंडओळख करून देण्याइतपतच विवेचन करणें शक्य आहे.

जागतिक राजकारणांत अनेक राष्ट्रांचे परस्परांशीं संघर्ष व संबंध निर्माण होत असतात. पण या सर्व घडामोडींच्या पार्श्वभूमीची छाननी केल्यास राष्ट्रीय सामर्थ्य व त्याचा उपयोग करून सत्ताराजकारणांत यशस्वी होण्याचा प्रयत्न प्रत्येक राष्ट्र करीत असतें असें दिसून येते. हे राष्ट्रीय सामर्थ्य अनेक साधनांवर अवलंबून असते. या साधनांच्या अनुकुलतेनुसारच प्रत्येक राष्ट्राचें जागतिक राजकारणांतील स्थान निश्चित होत असतें. स्थूलमानानें कोणत्याहि राष्ट्राचें सामर्थ्य खालील साधनांवर अवलंबून असते असें म्हणता येईल (१) लोकसंख्या (२) साधनसंपत्ति (३) औद्योगिक व शास्त्रीय प्रगति (४) लष्करी सुसज्जता (५) राष्ट्रीय चारित्र्य व मनोधैर्य (६) स्थिर राज्यव्यवस्था (७) जीवनविषयक तत्वज्ञान.

**(१) लोकसंख्या :—**राष्ट्राचें जागतिक राजकारणांतील स्थान त्या 'राष्ट्राच्या लोकसंख्येवर कांहीं अंशीं अवलंबून असतें, हें उघड आहे.

प्रचण्ड लोकसंख्या असलेलीं राष्ट्रेंच युद्धकाळांत आधुनिक मानव संहारासाठीं लागणारी अफाट सैन्यें उभारूं शकतात. लोकसंख्येचा विचार केवळ युद्धकालीन संभाव्य सैन्यभरतीसाठींच करावयाचा असा याचा अर्थ नाहीं. राष्ट्रांतील नैसर्गिक साधनसामुग्रीचा उपयोग व विकास करण्यासाठीं देखील मोठ्या लोकसंख्येची आवश्यकता असते. पण आंतरराष्ट्रीय संबंधांचा विचार करतांना प्रत्येक राष्ट्राच्या सैनिकी सामर्थ्याकडे अधिक लक्ष देणें क्रमप्राप्त ठरतें. लोकसंख्या केवळ प्रचण्ड असून भागत नाहीं. कोणत्याहि राष्ट्राच्या लोकसंख्येविषयीं विचार करतांना त्यांतील स्त्रीपुरुषांचें परस्पर प्रमाण किती आहे हें महत्त्वाचें ठरतें. तसेंच लोकसंख्येंत वृद्ध आणि अल्पवयीन बालके यांच्याशीं वयांत आलेल्या तरुणांचें काय प्रमाण पडतें हाहि मुद्दा महत्वाचा असतो. दोन राष्ट्रांची लोकसंख्या समान असून देखील वरील दोन प्रमाणें भिन्न असल्यास एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रापेक्षां बलिष्ठ ठरतें. उदाहरणार्थ, 'अ' आणि 'ब' या दोन राष्ट्रांचीं प्रत्येकीं लोकसंख्या १०० आहे असें समजू. 'अ' च्या १०० लोकसंख्येपैकीं ६० स्त्रिया असून उरलेल्या ४० त वृद्धांचें प्रमाण अधिक आहे. उलट पक्षीं 'ब' मध्यें स्त्रियांची संख्या ४० असून उरलेल्या साटांत तरुणांचें प्रमाण अधिक आहे. या परिस्थितिंत समान संख्य असूनदेखील 'अ' पेक्षां 'ब' हें राष्ट्र बलिष्ठ ठरतें. लोकसमुदायाच्या बाबतींत विचार करतांना संख्याधिक्याप्रमाणेंच, वयाचें प्रमाण, स्त्रीपुरुषांचें परस्पर प्रमाण, जन्ममृत्यूंचें प्रमाण आणि आरोग्य यांचाहि विचार करणें आवश्यक ठरतें.

(२) **साधनसंपत्ति :**—जगांतील कोणतेहि दोन देश साधन-संपत्तींच्या बाबतींत समान आढळून येत नाहींत. प्रत्येक राष्ट्रांत नैसर्गिकरीत्या कांहीं साधनांचा अभाव तर अन्य साधनांची विपुलता आढळून येते. स्वतःच्या लोकसंख्येचें पोषण आणि वर्धन करण्यासाठीं नैसर्गिक साधनसामुग्रीची गरज प्रत्येक राष्ट्राला असते. सर्वच राष्ट्रें या बाबतींत भाग्यवान असणें शक्य नाहीं. आधुनिक जगांत अमेरिका व

त्याखालोखाल सोव्हिएट रशिया हीं दोन राष्ट्रें नैसर्गिक साधनसामुग्रीच्या दृष्टीनें इतर राष्ट्रांपेक्षां अधिक संपन्न आहेत. सत्ताराजकारणांत यशस्वी होण्यासाठीं लागणाऱ्या शस्त्र सामर्थ्याची उभारणी याच साधनसामुग्रीवर केलेली असते. लोखण्ड, कोळसा, पेट्रोल, युरेनियम या आणि यासारख्या इतर खनिज संपत्तीचे सांठे ज्या राष्ट्राजवळ अधिक तें राष्ट्र जागतिक सत्तास्पर्धेत प्रभावी ठरण्याची शक्यता असते. कोणत्याहि देशाच्या साधनसामुग्रीचा विचार करतांना, हवामान, भौगोलिक स्थान, जमिनीची सुपीकता इत्यादींचाहि विचार करणें आवश्यक असतें. कारण त्याशिवाय राष्ट्राला स्वयंपूर्णता प्राप्त होऊं शकत नाहीं. साधनसामुग्रीच्या संपन्नतेविषयींच्या व त्यावर आधारलेल्या राष्ट्रसामर्थ्याच्या कल्पनादेखील बदलत्या काळानुसार बदलत असतात. अठराव्या शतकच्या शेवटीं कोळसा आणि लोखण्ड यांची विपुलता असलेलें ब्रिटन सामर्थ्यवान् ठरलें. पण विसाव्या शतकाच्या मध्यावर, जग असतांना कोळसा आणि लोखण्ड यांची विपुलता असून भागत नाहीं. तर त्याच्या जोडीला पेट्रोल युरेनियम यांचीहि विपुलता असावी लागते. इतकेंच नव्हे तर अन्नधान्याच्या बाबतींतदेखील सुपीक जमीन आणि अनुकूल हवामान या गोष्टी असल्याखेरीज राष्ट्राला सामर्थ्यसंपन्न होता येत नाहीं. साधनसामुग्रीच्या बाबतींत झालेली निसर्गाची अवकृपा आधुनिक काळांत शास्त्रीय शोधांमुळे कांहीं प्रमाणांत भरून काढतां येत असली तरी निसर्गदत्त साधनविपुलतेचें महत्त्व यत्किंचित्हि कमी झालेलें नाहीं. साधनसंपत्तीच्या निसर्गानें केलेल्या विषम वाटणींतूनच पुढें सबल व दुर्बल राष्ट्रांचे संघर्ष निर्माण होतात. साधनसामुग्रीचा अव्याहत पुरवठा स्वतःच्या राष्ट्राला व्हावा यासाठीं साम्राज्यनिर्मितीची कल्पना कांहीं राष्ट्रांना स्वीकारार्ह वाटूं लागते.

(३) **औद्योगिक व शास्त्रीय प्रगतिः**—प्रचण्ड लोकसंख्या व निसर्गदत्त साधन संपत्ति हे दोन्ही घटक अस्तित्वांत असून देखील एखादें राष्ट्र दुर्बल व मागासलेलें ठरण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ, १९४८

पूर्वी चीनजवळ प्रचण्ड लोकसंख्या व साधनसामुग्रींची विपुलता असून-देखील औद्योगिक व शास्त्रीय प्रगतीच्या अभावी चिनी राष्ट्र जागतिक राजकारणांत दुर्बल ठरलें होते. निसर्गाच्या देणगीचा अधिकांत अधिक उपयोग करण्यासाठीं औद्योगिक व शास्त्रीय प्रगतीची आवश्यकता प्रत्येक राष्ट्राला असते. औद्योगिक क्रांतीनंतरच्या या यंत्रसंस्कृतिप्रधान युगांत आधुनिक यंत्रचलित कारखाने व प्रचण्ड उत्पादन यांचा अवलंब केल्या-खेरीज कोणत्याहि राष्ट्राला सामर्थ्यसंपन्न होतां येत नाहीं. इतकेंच नव्हे तर या यंत्रयुगांतील युद्धेंदेखील यंत्रचलित सैन्यांनीं व यांत्रिक शस्त्रास्त्रांनीं लढलीं जात असल्यामुळें औद्योगिक विकासाखेरीज अशा युद्धांत यश मिळणें असंभव आहे. एखाद्या राष्ट्राचा औद्योगिक विकास घडून येण्यासाठीं कांहीं गोष्टींची आवश्यकता असते. प्रथमतः या विकासाला पायाभूत असणाऱ्या लोखण्ड व कोळसा यांच्या खाणी परस्पर निकट असणें आवश्यक असतें. स्वतःचा विकास घडवून आणण्यासाठीं जनतेंत दुर्दम्य आकांक्षा, औद्योगिक क्षेत्रांत नेतृत्व करूं शकणाऱ्या कर्तबगार व्यक्ति, आणि वाढती शास्त्रीय प्रगति इत्यादि गोष्टींचा संच असल्याखेरीज निसर्गावर विजय मिळवतां येत नाहीं. निसर्गानें साधनसामुग्रीची खैरात केली तरी तिचा उपयोग करून घेण्याचें कौशल्य व इच्छा लोकांत हवी. शास्त्रीय प्रगतीशिवाय हें कौशल्य वाढीस लागत नाहीं. आधुनिक काळांत झालेल्या शास्त्रीय प्रगतीमुळें निसर्गाचे अनेक गूढ व्यापार मानवाला ज्ञात झाले आहेत. अणुशक्तीचा शोध हें त्याचें अगदीं अलीकडील उदाहरण होय. राष्ट्राची शास्त्रीय प्रगति घडून येण्यासाठीं सुसज्ज प्रयोगशाळा, अलौकिक बुद्धीचे शास्त्रज्ञ, उत्कृष्ट शिक्षणव्यवस्था व सिद्ध झालेल्या प्रयोगांचा व्यापारी उपयोग करण्याची तयारी इत्यादि गोष्टी जरूर असतात. अर्थात्‌च या सर्व गोष्टींच्या अस्तित्वासाठीं देशांत सुस्थिर राज्यव्यवस्था असणें आवश्यक ठरते.

(४) **लष्करी सुसज्जता :**—लोकसंख्या, व साधनसामुग्री यांचा उपयोग औद्योगिक व शास्त्रीय प्रगतीनें जसा शांततेच्या काळीं

करतां येतो तसाच युद्धकाळांतहि राष्ट्राच्या सामर्थ्यासाठीं करावा लागतो. लष्करीदृष्ट्या सुसज्ज असण्यासाठीं अनेक साधनांचा उपयोग करावा लागतो. संहारक शस्त्रांचे शोध, उत्कृष्ट शिक्षण दिलेलें खडें व राखीव सैन्य, युद्धविशारद सैन्याधिकारी, इत्यादींचा उल्लेख करतां येईल. उदाहरणार्थ, गेल्या दोन महायुद्धांत निरनिराळया राष्ट्रांनीं लावलेले संहारक शस्त्रांचे शोध त्या त्या राष्ट्रांना कसे लाभदायक ठरले हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. पहिल्या महायुद्धाच्या अखेरच्या काळांत इंग्लंडनें निर्माण केलेले रणगाडे, किंवा जर्मनीच्या पाणबुड्या, अथवा दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटीं अमेरिकेनें वापरलेला अणुबॉम्ब या शस्त्रांच्या नाविन्यामुळें त्या राष्ट्रांना त्याचा फायदा मिळाला. रोमेलसारख्या युद्धविशारदांमुळें युद्धाचा रंग कसा पालटूं शकतो हा इतिहास ताजाच आहे. लोकशाही राष्ट्रांपेक्षां हुकुमशाही राष्ट्रांच्या सैनिकांना मिळालेले दीर्घकाल शिक्षण व युद्धतंत्राचा अनुभव त्यांच्या सुरवातीच्या नेत्रदीपक विजयांचा आधार होता.

(५) **राष्ट्रीय चारित्र्य व मनोधैर्य**:—कोणत्याहि राष्ट्राच्या सामर्थ्याच्या या अंगभूत घटकाची खरी कसोटी युद्धकाळांतच होते. पराजयाच्या खडतर प्रसंगांत राष्ट्र टिकून राहणें अथवा नष्ट होणें हें त्या त्या राष्ट्राच्या चारित्र्यावर व मनोधैर्यावर अवलंबून असते. कोणत्याहि बिकट परिस्थितींत राष्ट्राच्या परराष्ट्रीय धोरणाचा दृढनिश्चयानें पाठपुरावा करणें यासाठीं अवल दर्जाच्या मनोधैर्याची आवश्यकता असते. दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीच्या प्रचंड आघातानें विकलांग झालेल्या फ्रान्सनें पत्करलेला शरणागतीचा मार्ग किंवा एकाकी अवस्थेंत, भिंतीला पाठ लाऊन शेवटपर्यंत लढा देण्याचा मार्ग अनुसरणारें ब्रिटन. या दोन उदाहरणांवरून राष्ट्रीय चारित्र्य व मनोधैर्य या घटकाचें अस्तित्व व महत्त्व ध्यानांत येण्यासारखें आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरच्या दिवसांत सर्व बाजूंनी पराभव व विनाश होत असतां जर्मनीनें दाखवलेलें मनोधैर्य एक प्रकारें विस्मयजनक होतें. यावरून प्रतिकूल परिस्थितींत कोणतें

राष्ट्र किती मर्यादेपर्यंत टिकाव धरील याचा अंदाज बांधणें शक्य नाही, असेंच म्हणावें लागेल. दुसऱ्या महायुद्धाचेंच आणखी एक उदाहरण घेतल्यास ह्या घटकाचें महत्त्व पटूं शकेल. सोविएट रशियन जनतेनें दाखविलेल्या असामान्य मनोधैर्यामुळेंच रशियानें जर्मनीच्या चढाईचा प्रतिरोध तर केलाच पण शेवटीं जर्मनीवर विजय संपादन केला. मनोधैर्याचा अभाव असता तर सोविएट रशियाला अपरिमित मनुष्यहानी सोसणें शक्य झालें नसते.

राष्ट्रीय चारित्र्य व मनोधैर्य वरच्या दर्जाचें राहण्यासाठीं जनतेच्या आकांक्षा साकार करणारी शासन संस्था अस्तित्वांत असली पाहिजे. शासनसंस्थेचें धोरण आपल्या आकांक्षानुसार चालूं आहे असें वाटल्या-खेरीज जनतेचा पाठींबा अशा धोरणाला मिळत नाहीं. ज्या राष्ट्रांतील शासन संस्था लोकप्रिय असते मग ती कोणत्याहि प्रकारची असली तरी त्या राष्ट्राचें मनोधैर्य टिकून राहतें असा निष्कर्ष गेल्या दोन महायुद्धांच्या अनुभवावरून काढतां येतो.

(६) स्थिर राज्यव्यवस्था :—प्रचण्ड लोकसंख्या, नैसर्गिक साधन-सामुग्री, औद्योगिक प्रगति व लष्करी सुसज्जता हीं सर्व असून राष्ट्र सामर्थ्य-संपन्न होईलच अशी शाश्वति नाहीं. स्थिर राज्यव्यवस्था असल्याखेरीज या सर्व घटकांचें नियोजन व संकलन राष्ट्रहितासाठीं कसें होईल ? ज्या राष्ट्रांत स्थिर राज्यव्यवस्था नसेल तें राष्ट्र वरील साधनांनीं परिपूर्ण असून देखील सत्താराजकारणांत अपयशी ठरण्याचा अधिक संभव आहे. देशांतर्गत कारभारांत स्थिरता, सुरक्षितता व जनतेचें सहकार्य असल्याखेरीज परराष्ट्रीय राजकारणांत कोणतेंहि राष्ट्र खंबीर धोरण स्वीकारूं शकत नाहीं. ज्या देशांत राज्यक्रांति, अस्थिर समाज, लुटालूट आणि रक्तपात या गोष्टी नित्याच्याच होतात तें राष्ट्र जागतिक स्पर्धेत मागें पडल्याशिवाय कसें राहील ? सत्ता स्पर्धेत यशस्वी होण्यासाठीं राष्ट्राच्या सामर्थ्याचा एकसूत्री उपयोग

करावा लागतो. स्थिर राज्यव्यवस्था याचा अर्थ हुकूमशाही राजवट असा विचार करणें चुकीचें ठरेल. लोकशाही राष्ट्रेंदेखील स्थिर राज्यव्यवस्था ठेवूं शकतात असा इतिहासाचाच दाखला आहे. राज्याची शासनव्यवस्था ही सतत बदलत गेल्यास समाजाच्या स्थैर्यालाहि धक्का लागतो. समाज-स्थैर्याशिवाय राष्ट्र सामर्थ्यशाली होऊं शकत नाहीं. म्हणून स्थिर राज्यव्यवस्था असणें आवश्यक असते.

(७) **जीवनविषयक तत्त्वज्ञान** :— आधुनिक काळांत निर-निराळ्या राष्ट्रांतील जीवनविषयक तत्त्वज्ञानांत फार फरक पडला आहे. निरनिराळ्या राष्ट्रांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञांनातील भिन्नतेचा प्रभाव जागतिक राजकारणावर पडतो. विसाव्या शतकांतील आंतरराष्ट्रीय संघर्षांची एकोणीसाव्या व अठराव्या शतकांतील तत्सम संघर्षांशीं तुलना केल्यास वरील विधानाची सत्यता पटूं शकेल. दुसऱ्या महायुद्धानंतर निर्माण झालेल्या जागतिक परिस्थितींत तर अशा वैचारिक संघर्षाला अधिकच तीव्रता व कटुता प्राप्त झाली आहे. प्रत्येक राष्ट्राला त्याचें स्वतःचें असें वैशिष्ट्यपूर्ण जीवनविषयक तत्त्वज्ञान असेलच असें नाहीं. पण आज जगांत मान्यता पावलेल्या दोन विचारप्रणालींपैकीं – लोकशाही व साम्यवाद – त्या राष्ट्राला कोणती जवळची वाटते हें महत्त्वाचें आहे. वैचारिक दृष्टिकोन समान नसल्यास केवळ समान संकटामुळें परस्परांनिकट आलेलीं राष्ट्रें अधिक काळ मित्रत्वानें राहूं शकत नाहींत हें गेल्या सात वर्षांच्या अनुभवानें सिद्ध झालें आहे. जागतिक राजकारणांत जीवनविषयक तत्वज्ञानाला केवढें महत्त्व प्राप्त झालें आहे हें वरील उदाहरणावरून लक्षांत येऊं शकेल. आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या गुंतागुंतींत वैचारिक दृष्टीकोनांतील भिन्नता व तज्जन्य संघर्ष यांचीहि भर पडलेली असते हें विसरतां येत नाहीं.

आंतरराष्ट्रीय सत्ताराजकारणांत वरील सात घटकांचें स्थान किती महत्वाचें आहे याविषयीं विस्तारानें विवेचन करणें आवश्यक असलें तरी

स्थलाभावीं शक्य नाहीं. जागतिक राजकारणांत अग्रेसर ठरलेल्या, प्रभावी होऊं पाहणाऱ्या व निष्प्रभ झालेल्या राष्ट्रांच्या इतिहासाचें तुलनात्मक निरीक्षण केल्यास वरील विवेचनाची सत्यता ताबडतोब पटूं शकेल. उदाहरणादाखल युद्धोत्तर काळांतील अमेरिका व सोविएट रशिया या दोन राष्ट्रांच्या सत्ताराजकारणांतील अग्रेसरत्वाकडे निर्देश करतां येईल. हीं दोन राष्ट्रें 'महान' राष्ट्रें या सार्थ नामाभिधानानें ओळखलीं जातात. त्यांचें मोठेंपण कशावर आधारलेलें आहे याचा पडताळा घेणें सहज शक्य आहे. प्रचण्ड लोकसंख्या, विशाल भूप्रदेश, विपुल साधनसामुग्री, शास्त्रीय व औद्योगिक प्रगति लष्करीसुसज्जता, राष्ट्रीय चारित्र्य व मनोधैर्य, स्थिर राज्यव्यवस्था व विशिष्ट वैचारिक दृष्टीकोन या प्रत्येक बाबतींत हीं दोन राष्ट्रें इतर राष्ट्रांपेक्षां कितीतरी पटींनें श्रेष्ठ आहेत. त्या दोघांत कांहीं बाबतींत अधिक उणें असेल पण बाकीचीं राष्ट्रें त्यांच्या तुलनेनें दरिद्री ठरतात. आज अग्रेसर असलेल्या या राष्ट्रांच्या जोडीला, पूर्वी जगाचें नेतृत्व करणारीं पण आज मागें पडलेलीं दोन राष्ट्रें ब्रिटन व फ्रान्स यांना बसविलें म्हणजे वरील मुद्दा अधिक स्पष्ट होतो. दुसऱ्या महायुद्धानंतर सत्ताराजकारणांत ब्रिटन व फ्रान्स यांची पिछेहाट होण्याचें मुख्य कारण त्यांचीं अपुरी लोकसंख्या व साधनसामुग्रीचा अभाव होय. चौदा कोटी लोकसंख्या असलेला अमेरिका व एकोणीस कोटी लोकसख्या असलेला सोव्हिएट रशिया यांच्या तुलनेंत चार कोटी लोकसंख्या असलेलीं राष्ट्रें मागें पडावींत हें क्रमप्राप्तच आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणांत ४५ कोटी लोकसंख्या असलेला नवचीन आणि ४० कोटींचा भारत यांना मिळणारें वाढतें महत्त्व पाहिलें म्हणजे लोकसंख्या व साधनसामुग्री या घटकांचें महत्व पटूं शकतें. नवचीन व भारत ही भावी सत्ताराजकारणांतील अग्रेसर राष्ट्रें ठरण्याचा दाट संभव आहे. अर्थात्च हें विधान करतांना औद्योगिक व शास्त्रीय प्रगति आणि स्थिर राज्यव्यवस्था या घटकांच्या महत्त्वाकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं.

जागतिक राजकारणांत राष्ट्राचें स्थान निश्चित करणाऱ्या मूलभूत घटकांचें विवेचन वर केलें आहे. पण या विवेचनानंतरदेखील या राजकारणाचें स्वरूप स्पष्ट होत नाहीं. हें स्वरूप स्पष्ट करण्यासाठीं निरनिराळया विचारवंतांनीं आपापल्या परीनें जागतिक राजकारणाचा अर्थ लावला आहे. कांहीं विचारवंतांच्या मतें जागतिक राजकारण हें सत्तेच्या अभिलाषेंतून जन्मास येतें. म्हणून त्यांतील सर्व घटनांचें विश्लेषण व स्पष्टीकरण याच दृष्टीनें करावयास हवें. जागतिक राजकारणांत सत्तास्पर्धा आणि संघर्ष यांची गुंतागुंत असते हें नाकारतां येणार नाहीं. पण सत्तेची अभिलाषा ही मूलभूत मानवी भावनांपैकीं आहे, हें सत्य विसरतां येत नाहीं. विख्यात ब्रिटिश तत्त्वज्ञ बर्ट्रॅन्ड रसेल यांनीं सत्तेचे अनेक प्रकार वर्णिले आहेत. प्रस्तुत विषयाच्या अनुरोधानें त्यांतील कांहींचा उल्लेख करणें आवश्यक आहे. राजकीय सत्ता, आर्थिक सत्ता, पाशवी सत्ता, विचारांवरील सत्ता इत्यादि यांपैकीं राजकीय वा आर्थिक सत्तेच्या हव्यासामुळें जागतिक संघर्ष निर्माण होतात. दुर्बल राष्ट्रांवर आपली राजकीय अथवा आर्थिक किंवा दोन्ही प्रकारची सत्ता प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नांतूनच महायुद्धांचा जन्म झाला आहे. वरील विवेचन मान्य करूनदेखील जागतिक राजकारण म्हणजे केवळ सत्तासंघर्ष असें मानतां येत नाहीं. कारण सत्तास्पर्धेएवढेंच त्याचें स्वरूप मर्यादित आहे असें समजणें म्हणजे या कठीण व गुंतागुंतीच्या समस्येला अतिशय साधें व सोपें स्वरूप देणें होय.

सत्ता सिद्धान्त नाकारणारे विचारवन्त या राजकारणाचें स्पष्टीकरण वैचारिक संघर्षांत शोधतात. त्यांच्या मतें वैचारिक दृष्टिकोनांतील भिन्नता व त्यामुळें निर्माण होणारे संघर्ष यांचीच परिणति युद्धांत होते. या सिद्धान्ताचे पुरस्कर्ते सत्ताभिलाषा, असामान्य व्यक्तींचें कर्तृत्व व राष्ट्रांची ऐतिहासिक परंपरा इत्यादि गोष्टींना महत्त्व देण्यास तयार नसतात. वस्तुतः जागतिक राजकारणांत सत्ताभिलाषा, वैचारिक संघर्ष, असामान्य व्यक्तींच्या

व्यक्तित्वाचा झगडा, राष्ट्रांची परंपरा, ऐतिहासिक अपघात इत्यादि अनेक कारणांचें बेमालूम मिश्रण झालेलें असतें. त्यामुळें या राजकारणाचें स्वरूप समजावून घेतांना एखाद्या विशिष्ट विचारप्रणालीचा पूर्वग्रहदूषित चष्मा वापरण्याऐवजीं सर्वच कारणांचा विचार तरतमबुद्धीनें करणें इष्ट ठरतें.

निरनिराळ्या राष्ट्रांचें नेतृत्व करणाऱ्या व्यक्तींच्या स्वतःविषयींच्या भ्रामक कल्पना जागतिक शांततेला हानिकारक ठरल्याची अनेक उदाहरणें आहेत. नेपोलियन, कैसर, हिटलर, मुसोलिनी यांच्या व्यक्तित्वाचा हातभार तत्कालीन संघर्षांत होता हें नाकारतां येणार नाहीं. पण याचा अर्थ केवळ अशा व्यक्तींच्या महत्त्वाकांक्षेनुसार जागतिक राजकारण बदलतें असा होत नाहीं. राष्ट्राराष्ट्रांतील औद्योगिक व व्यापारी स्पर्धा, अप्रगत देशांच्या बाजारपेठा काबीज करण्याची धडपड, विशिष्ट आर्थिक हित-संबंधांची राष्ट्राच्या परराष्ट्रीय धोरणावर असलेली पकड इत्यादि कारणें राष्ट्राराष्ट्रांत संघर्ष घडवून आणण्यास पुरेशी ठरतात. कित्येक वेळीं विशिष्ट आर्थिक हितसंबंधामुळें संभाव्य युद्ध टाळण्याची पराकाष्ठा करण्याकडे–शरणागति पत्करण्याकडेदेखील–प्रवृत्ति निर्माण होऊं शकते. याचा अर्थ कोणतेंहि एकच कारण महत्त्वाचें मानून चालत नाहीं. इतर कारणांचा साकल्यानें विचार करणें आवश्यक असतें.

आर्थिक हितसंबंधाचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून पेट्रोलचा उल्लेख करतां येईल. पेट्रोलचें शांततेच्या काळांत औद्योगिक विकासासाठीं असणारें महत्त्व व युद्ध काळांत यंत्रचलित सैन्यें व यांत्रिक शस्त्रास्त्रें यासाठीं लागणारी त्याची गरज यांमुळें पेट्रोलच्या खाणींच्या स्वामित्वाबद्दल संघर्ष निर्माण होणें अपरिहार्य आहे. सोविएट रशिया व अमेरिका हीं दोन राष्ट्रें वगळल्यास पेट्रोलचे अशोधित सांठे मध्यपूर्वेतील इराक, इराण आणि सौदी अरेबिया या राष्ट्रांत आहे. ही तीनहि राष्ट्रें राजकीय व

आर्थिक दृष्ट्या अत्यंत मागासलेलीं आहेत. त्यामुळें त्यांच्या प्रदेशांत असलेल्या तेलखाणींवर कोणाचा कबजा असावा याविषयीं सतत संघर्ष चालू आहे. त्यातच आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या व्यापारी संघटनांच्या निरनिराळ्या खाणीवरील वर्चस्वाची भर पडली आहे. इराण आणि ब्रिटन या दोन राष्ट्रांतील अँग्लो इराणियन ऑईल कंपनीविषयीं निर्माण झालेली तेढ आतां विकोपास गेली आहे. या एका उदाहरणावरूनदेखील मध्यपूर्वेतील पेट्रोलचे सांठे तिसऱ्या महायुद्धाचा भडका उडविण्यास समर्थ ठरूं शकतात हें दिसून येईल. वरील विवेचनावरून सत्ताराजकारणांतील आर्थिक हितसंबंधांचे विशेषतः युद्धोपयोगी पेट्रोलचें महत्त्व लक्षांत येईल.

सत्ताराजकारणाचें स्वरूप समजावून घेण्यासाठीं जगांत प्रभावी ठरलेल्या विचारप्रमणालींची व त्यांच्या प्रतिनिधिभूत राष्ट्रांची ओळख करून घेणें आवश्यक ठरतें. या दृष्टीनें विचार करतां इंग्लड, फ्रान्स व अमेरिका यांत अस्तित्वांत असलेली लोकशाही विचारप्रणालि, सोविएट रशिया, नवचीन आणि पूर्व युरोपीय राष्ट्रें यांत प्रस्थापित झालेली साम्यवादी विचारसरणी, व दुसऱ्या महायुद्धांत पराभूत झालेल्या जर्मनी, इटली या राष्ट्रांचें फॅसिस्ट तत्त्वज्ञान याचेंहि विवेचन करणें क्रमप्राप्त आहे. याच बरोबर समाजवाद, साम्राज्यवाद व राष्ट्रवाद या वादांचाहि परामर्ष घेणें जरूर आहे. एका दृष्टीनें विचार करतां जागतिक राजकारणांतील या सर्व विचारप्रणालींचें जनकत्व अठराव्या व एकोणीसाव्या शतकांत घडून आलेल्या औद्योगिक क्रांतीकडे व त्या क्रांतीतून जन्मास आलेल्या नव्या यंत्रसंस्कृतीकडे द्यावें लागतें.

औद्योगिक क्रांतीमुळें भांडवलशाही समाजरचनेला सुरवात झाली. कांहीं काळानंतर भांडवलशाही राष्ट्रांत लोकशाही राज्यव्यवस्था निर्माण होणें अपरिहार्य झालें. कारण, नव्या भांडवलदारवर्गाला हवी असलेली सत्तेची भागीदारी द्यावयास जुना सरदार व सरंजामदारवर्ग आणि राजा तयार

नव्हते. राजा आणि नवा धनिक वर्ग यांच्या सत्तासंघर्षांतून आधुनिक लोकशाहीचा जन्म झाला आहे. भांडवलशाही अर्थरचनेचा एक परिणाम समाजाची विभागणी भांडवलदार व त्यांचे आश्रित असा एक वर्ग आणि शेतीपासून दुरावलेला, कारखान्यांत राबणारा व शोषित असा दुसरा वर्ग होण्यांत झाला. या दोन वर्गांच्या संघर्षामुळें मार्क्सनें प्रतिपादिलेलें साम्यवादी तत्वज्ञान अस्तित्वांत आलें. याच तत्त्वज्ञानाचा एक उपप्रकार म्हणून समाजवादाकडे निर्देश करतां येईल.

भांडवलशाहीच्या उदयाबरोबर राष्ट्रवादी कल्पनांची वाढ झालेली आढळून येते. भांडवलशाही आणि राष्ट्रवाद या मातापित्यांच्या पोटीं प्रथम साम्राज्यवाद आणि पहिल्या महायुद्धानंतर फॅसिस्टवाद हीं दोन अपत्यें जन्मास आलीं. राष्ट्रवादी कल्पनांमुळें स्वतःच्या राष्ट्राचा नव्या युगांतील भांडवलशाही विकास करण्यासाठीं मागासलेल्या राष्ट्रांवर आपले वर्चस्व स्थापण्याचा विचार निर्माण झाला. या विचाराचें मूर्त स्वरूप अठराव्या व एकोणीसाव्या शतकांत श्वेत राष्ट्रांनीं श्वेतेतरांच्या आशिया आणि आफ्रिका खंडांतील राष्ट्रांवर केलेल्या यशस्वी आक्रमणांत आढळून येतें. अर्थातच या साम्राज्यस्पर्धेंत ब्रिटन, फ्रान्स, हॉलंडसारखीं राष्ट्रें अग्रेसर ठरलीं तर जर्मनी इटलीसारख्या राष्ट्रांना इतरांची साम्राज्यतृष्णा तृप्त झाल्यावर उरलेल्या तुकड्यांवर समाधान मानावें लागलें. या साम्राज्यांचा उपयोग विशेषेंकरून हुकमी कच्चा माल व पक्क्या मालाची सुरक्षित बाजारपेठ या दृष्टीनें करण्यांत येत असे. विसाव्या शतकांत श्वेत राष्ट्रांच्या साम्राज्यवादी स्पर्धेतून पहिलें महायुद्ध निर्माण झालें. त्या महायुद्धांत पराभूत झालेल्या जर्मनीसारख्या राष्ट्रांत आणि नाममात्र विजयी होऊन अपयशी ठरलेल्या इटलींत, फॅसिस्टवादाचा जन्म झाला. या वादांत आत्यंतिक आक्रमक राष्ट्रवाद आणि राज्यनियंत्रित भांडवलशाही यांचें चमत्कारिक मिश्रण झालेलें आढळून येते. दुसऱ्या महायुद्धांत जर्मनी, जपान आणि इटली

या तीन प्रमुख फॅसिस्ट राष्ट्रांचा संपूर्ण पराजय झालेला असला तरी फॅसिस्ट वाद नष्ट झाला आहे असें मानणें चूक ठरेल.

वरील भिन्न विचारप्रणालींचे पुरस्कर्ते असलेलीं राष्ट्रें स्वतःच्या विशिष्ट विचारप्रणालीसाठीं सतत झगडत असतात. या दृष्टीनें लोकशाहीचीं विविध स्वरूपें – ब्रिटन, फ्रान्स व अमेरिका – फॅसिस्ट वादाचे प्रणेते – जर्मनी, जपान, इटली–साम्यवादी तत्त्वज्ञानाचा अध्वर्यु सोव्हिएट रशिया आणि नवोदित आशियाचे प्रतिनिधि नवचीन आणि भारत या सर्व राष्ट्रांविषयीं विस्तारानें विवेचन पुढें केलें आहे.

युद्धोत्तर जग आणि त्याच्या आंतरराष्ट्रीय समस्या यांचें स्वरूप समजण्यासाठीं ज्या दोन महायुद्धांनीं हें जग उध्वस्त केलें आहे त्यांचा विचार करणें आवश्यक ठरतें. या महायुद्धांचा विचार केल्याखेरीज आजच्या राजकारणांतील अनेक धागेदोरे लक्षांत येणार नाहींत. जगाचा इतिहास घडविण्यांत राज्यक्रान्त्या आणि युद्धें यांचा फार मोठा हातभार असतो. त्यांतहि या दोन महायुद्धांनीं जगाची अक्षरशः उलथापालथ घडवून आणली आहे. एकोणीसावें शतक आणि विसावें शतक यांत केवळ ५० वर्षांचेंच अंतर नाहीं तर हीं दोन महायुद्धें आणि त्यांनीं जगाच्या स्वरूपांत घडवून आणलेली क्रान्ति आहे. या दोन युद्धांच्या इतिहासाशिवाय विसाव्या शतकाची कोणतीहि समस्या समजूं शकत नाही.

विसाव्या शतकांतील सर्वांत महत्त्वाच्या दोन घटना कोणत्या असा प्रश्न कोणालाहि विचारल्यास त्याचें उत्तर दोन महायुद्धें असेंच येईल. सारें जग जणूं हीं दोन युद्धें लढण्यासाठींच निर्माण झालें आहे अशा हिरीरीनें दोन्ही युद्धें लढलीं गेलीं. युद्धाचा जन्म मानवी संस्कृतीइतकाच प्राचीन असेल. पण मानवी संहाराची कमाल मर्यादा ह्या युद्धांनीं गांटली. विसाव्या शतकाचा सारा इतिहास–राजकीय, सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक–युद्धाच्या भीषण छायेनें झांकळून गेला आहे. युद्धांसाठीं तयारी युद्धासाठीं सुरुवात व शेवट; तहाची तयारी व पुढच्या युद्धाची भाषा असें चक्रनेमिक्रमानें गेल्या ५० वर्षांत घडलें आहे. युद्धपूर्व, युद्धकाळ, युद्धोत्तर काळ, शीतयुद्ध, प्रायोगिक युद्ध हें सारे शब्दप्रयोग वाचले म्हणजे कोणालाहि साहजिकच वाटतें कीं गेल्या अर्धशतकांत जगांत युद्धाखेरीज दुसरें कांहीं महत्त्वाचें घडलेंच नाहीं.

१९१४ जूनच्यां २८ तारखेस ऑस्ट्रीयाच्या आर्च डयूकचा एका सर्व्हियन माथेफिरूनें खून केला. त्या सर्व्हियन माथेफिरूच्या एका गोळीनें केवळ आर्च डयूकचाच अंत केला असें नव्हे तर युरोपांत चाळीस वर्षें नांदत असलेल्या शांततेचा बळी घेतला. अब्जावधि रुपयांच्या संपत्तीचा निव्वळ धूर झाला. कोट्यवधि कुटुंबांची वाताहत झाली. अनेक राजवंश देशोधडीस लागले, व कित्येक साम्राज्यें नष्ट झालीं. सर्व्हियन माथेफिरुनें झाडलेली गोळी ही जणूं महायुद्धाची संकेत निशाणी होती. अवघ्या दोन महिन्याच्या अवधींत अमेरिका वगळल्यास जगांतील बहुतेक महत्त्वाचीं राष्ट्रें मानवी संहाराच्या या कार्यांत अत्यंत उत्साहानें विजय गीतें गात सामील झालीं.

पहिल्या महायुद्धाची कारणें कोणतीं? या प्रश्नाचें उत्तर अनेकांनीं आपापल्या परीनें व आपापल्या राष्ट्रीय दृष्टिकोणांतून दिलें आहे.

सर्वांचा निष्कर्ष काढणें अशक्य आहे. कारण दोन विरोधी राष्ट्रगटांतील विचारवंतानीं लिहिलेल्या युद्धाच्या इतिहासांत आपलें स्वतःचें राष्ट्र न्याय्य वर्तन करीत होतें, हाच अट्टाहास दिसून येतो. युरोप खंडांतील राष्ट्रगटांच्या सत्तेचा समतोलपणा ढळण्याचें अनेक प्रसंग १९१४ पूर्वी आले. पण त्यावेळीं युद्धाचा भडका उडाला नाहीं. पण ही टिकवून धरलेली शांतता म्हणजे वादळांपूर्वीचीच शांतता होती. आर्चड्यूकच्या खुनाच्या निमित्तानें युरोपीय राष्ट्रांनीं युद्धाला सुरुवात केली. पण युद्धाची खरीं कारणें राष्ट्राराष्ट्रांतील विद्वेष–आर्थिक चढाओढी–लष्करी व नाविक दलांची स्पर्धा–राष्ट्राचें विरोधी गट, (जर्मनी, आस्ट्रीया हंगेरी–इटाली विरुद्ध फ्रान्स इंग्लंड–रशिया) प्रत्येक राष्ट्रांतील जहाल राष्ट्रवादी प्रचार व त्या प्रचारांतून निर्माण होणारें भीतीचें वातावरण–यामध्यें सांपडतात. १९ व्या शतकांत झालेल्या साम्राज्यवादी चढाओढींत कांहीं राष्ट्रांना मिळालेलीं घबाडें इतरांच्या डोळ्यांत सलणें अगदीं 'स्वाभाविक'. तसेच मिळालेलीं घबाडें आपल्यालाच उपभोगीतां यावींत म्हणून 'तुष्ट' राष्ट्रांनीं आपले लष्करी व नाविक सामर्थ्य वाढविण्याचा सपाटा चालवावा हेही तितकेच 'स्वाभाविक'.

औद्योगिक ब्रिटनला, जर्मनीची वाढती औद्योगिक प्रगती व वैज्ञानिक सामर्थ्याचें वैषम्य वाटणें जितकें स्वाभाविक तितकेंच जर्मनी या नवोदित राष्ट्राला आपलें साम्राज्य इतरांच्या मानानें लहान असल्यानें ब्रिटन व फ्रान्स यांच्या प्रचंड साम्राज्याचा हेवा वाटणें स्वाभाविक. या व या प्रकारच्या स्वाभाविक वाटणाऱ्या परस्पर विद्वेषांतूनच महायुद्धाचा जन्म झाला. कच्चा माल–त्याचे उत्पादन करणाऱ्या वसाहती–पक्का माल विकत घेणारी कोट्यवधि कृष्णवर्ण आफ्रिकन व आशियाई जनता यांच्यावर स्वामित्व आपलें असावें असें प्रत्येक मोठ्या राष्ट्रास वाटत होतें. महायुद्धाची पार्श्वभूमि ही अशा प्रकारची होती.

२८ जुलै १९१४ला ऑस्ट्रियानें सर्व्हियाबरोबर युद्ध पुकारलें. सर्व्हियाचा मित्र म्हणून रशियानें सैन्याची जुळवाजुळव सुरु केली. ती लगेच

थांबवावी असा जर्मनीनें रशियाला दम भरला. रशियाने त्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. व १ ऑगस्टला जर्मनीनें रशियाबरोबर युद्ध पुकारलें. फ्रान्स रशियाचा मित्र त्यामुळें ३ ऑगस्टला जर्मनीनें फ्रान्सबरोबर युद्ध पुकारून तटस्थ बेलजियम मधून फ्रान्सवर चाल केली. बेलजियमच्या तटस्थतेचा भंग केल्याच्या निमित्तानें ब्रिटननें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. आणि पहिल्या महायुद्धाला सुरुवात झाली.

या मानवी संहारांत जर्मनीनें प्रकट केलेले सामर्थ्य अचाट होतें. लष्करी सामर्थ्यांत जर्मनीच्या कोणत्याहि तीन शत्रु राष्ट्रांना जर्मनीनें एकाच वेळीं खडे चारले असते. जर्मनीच्या औद्योगिक व आर्थिक शक्ती जर्मनीच्या विज्ञान–तंत्रविद्या (Technology) जर्मनीची कार्यकुशलता व मनोधैर्य यांच्या संयुक्त बळावर जर्मनी जगाला अजिंक्य ठरला असता. पण जर्मन मुत्सद्यांनीं केलेल्या चुकांची भरपाई जर्मनीच्या सैनिकांनीं केलेल्या अतुलनीय पराक्रमानें झाली नाहीं. जगांतील बाकीचीं सर्व महान् राष्ट्रें जर्मनीच्या विश्वविजयी महत्त्वाकांक्षेला पायबंद घालण्यासाठीं एकत्रित झाली. नेपोलियनच्या साम्राज्यापेक्षां मोठें साम्राज्य जर्मनीनें हस्तगत केलें पण तें क्षणकालच टिकलें.

जर्मनीच्या श्लीफेन योजनेप्रमाणें फ्रान्सचा पहिल्या धडाक्यांत पराभव करून जर्मनसैन्य पूर्व अघाडीवर आणून रशियाची कणिक तिंबायची असा जर्मन सेनानींचा मनसुबा होता. फ्रान्सचा पाडाव त्वरित होण्यासाठीं बेल्जियम मधून चढाई करायची व जर्मनीच्या ७२ पैकीं ५३ सैन्यविभागांनीं ठरल्याप्रमाणें ती केली व बेल्जियमचा प्रतिकार मोडून जर्मन सेना पॅरिसच्या रोखानें धावली. पण मार्नेजवळ फ्रेंचप्रतिकार वाढला व जर्मन फौजांनीं खंदक खणून आपले मोर्चे बांधले व त्यानंतर सतत चार वर्षें पश्चिम आघाडीवर खंदकी युद्ध चालू राहिलें.

पूर्व आघाडीवर रशियन चढाईला टॅनेनबर्ग येथें हिंडेनबर्गनें पूर्ण जमीनदोस्त केलें व रशियन पोलंड युद्धक्षेत्र बनला. १९१५ मध्यें इटलीनें

लंडन तहाच्या आमिषामुळें विश्वासघात करून जर्मनी-ऑस्ट्रियाविरुद्ध युद्ध पुकारलें. पण युद्धाची गति अगर दिशा बदलल्या नाहींत. उलट बल्गेरिया युद्धांत पडतांच जर्मनीनें ऑस्ट्रियाच्या मदतीनें सर्व्हिया जिंकला व तुर्कस्थानशीं दळणवळण जोडलें. पश्चिम आघाडीवर जर्मन सेनानींनीं बचावाचें धोरण चालू ठेवलें, व रशियाला मागें रेटीत ऑस्ट्रियाच्या प्रदेशांतून त्याची हकालपट्टी केली व रशियन भूमीवर आक्रमण सुरू केलें. १९१६ मध्यें जर्मनांनीं 'व्हर्डून' सर करण्याची पराकाष्ठा केली, पण ते अपयशी ठरले. तसेंच अँग्लोफ्रेंचांनीं केलेली सॉमेंची चढाईदेखील अशीच बारगळली. रुमानियानें १९१६च्या जुलैंत फ्रेंचांच्या बाजूनें युद्धांत भाग घेतला व अगदीं थोड्या अवकाशांत जर्मनी व ऑस्ट्रियाच्या फौजांनीं रुमानिया व्यापला. १९१७च्या सुरुवातीला रशियन राज्यक्रांति होऊन रशियन प्रतिकार कोलमडला, व जर्मनीला पश्चिम अघाडीवर लक्ष केंद्रित करणें शक्य झालें.

अत्यंत प्रभावी लष्करी तंत्र, केंद्रित सैन्य संचालन व अंतर्गत वाहतुकीचीं साधनें यामुळें जर्मनीचा वरचष्मा पश्चिम आघाडीवर १९१७ मध्यें होता. पण जर्मन मुत्सद्यांनीं अमेरिकेच्या बाबतींत केलेल्या चुका फारच घातक ठरल्या. तटस्थ अमेरिकेच्या नागरिकांचें वित्त व जीवन अधिकाधिक धोक्यांत आलें व त्याचें प्रमुख कारण म्हणजे जर्मन पाणबुड्यांनीं सुरू केलेलें अनिर्बंध संहारसत्र. त्यांत अँग्लो-फ्रेंचांच्या गलबतांप्रमाणें अमेरिकेच्याहि जहाजांना 'समुद्रस्तृप्यन्तु' व्हावें लागलें. अमेरिकन नागरिकांच्या जीवित व वित्त हानीमुळेंच तटस्थ अमेरिका युद्धांत पडावयास तयार झाली.

अमेरिका युद्धांत पडतांच युरोपीय युद्धाचा सारा रागरंग बदलला. ताज्या दमाच्या अमेरिकन पलटणी येतांच आपल्याला युद्ध जिंकणें अशक्य होईल या अंदाजानें जर्मन सेनाप्रमुखांनीं १९१८ मध्यें शेवटची चढाई

पश्चिम आघाडीवर केली. या चढाईपूर्वीच रशियन राज्यक्रांति होऊन बोल्शेविकांनीं जर्मनी व ऑस्ट्रियाशीं ब्रेस्टलिटोव्हस्क येथें तह केला. त्यामुळें पूर्व आघाडींतून जर्मन सेना मोकळ्या झाल्या होत्या. शेवटच्या चढाईत जर्मन फौजा ५० मैल पुढें सरकल्या. दोस्तांची आघाडी वांकली पण मोडली नाहीं. दोस्तांची प्रतिचढाई सुरू होऊन जर्मन फौजांना मागें रेटण्याचें काम सुरू झालें. याच सुमारांस बल्गेरियाचा सॅलोनिका-जवळ पराभव होऊन बल्गेरियानें युद्धांतून आपलें अंग काढून घेतलें व दोस्तांशीं स्वतंत्र तह केला. तुर्कस्थाननें थोड्याच दिवसांत तोच मार्ग स्वीकारला. ऑस्ट्रिया हंगेरी कोलमडून पडला, व ११ नोव्हेंबर १९१८ रोजीं चार वर्षांपेक्षां अधिक काळ चाललेला नरसंहार थांबून युद्धतहकुबी जाहीर झाली. जर्मनींत राज्यक्रान्ति होऊन कैसर हॉलंडमध्यें आश्रयार्थी म्हणून आला व जर्मनींत लोकशाहीवादी शासनसंस्था स्थापन झाली.

१९१४ चें युद्ध म्हणजे 'जगांत लोकशाही राजवटीचा मार्ग सुकर करण्यासाठीं लढलेलें शेवटचें युद्ध' असें त्यावेळच्या अनेक स्वप्नाळू ध्येयवाद्यांना वाटत होतें. 'युद्ध नष्ट करणारें युद्ध' 'जागतिक युद्ध' अशा शब्दांनीं त्यावेळीं १९१४–१८ च्या महायुद्धाचें वर्णन करणाऱ्यांच्या हें कल्पनेंतदेखील आलें नाहीं कीं एका पिढीच्या आंतच दुसऱ्या महायुद्धाचा भीषण प्रसंग मानवजातीवर ओढवणार आहे. इतकेंच नव्हे तर त्यांत मनुष्यहानि व वित्तहानि अनेक पटींनीं अधिक होणार आहे.

दुसऱ्या महायुद्धाकडे वळण्यापूर्वी पहिल्या महायुद्धाचा जमाखर्च पाहणें अतिशय बोधप्रद ठरेल. दोस्त राष्ट्रांनीं सुमारें चार कोटीं सैन्य उभारलें होतें. तर जर्मनीच्या बाजूस दोन कोटींवर सैन्य होतें. युद्धांत एक कोटीचा संहार झाला व सुमारें दोन कोटी जखमी, अपंग या सदरांत जमा झाले. युद्धांमुळें बालमृत्यूचें प्रमाण वाढलें. वेड लागणें, शारीरिक ऱ्हास, मानसिक दौर्बल्य यांचें प्रमाण वाढलें. या सर्वांचा विचार केल्यास

मानवी समाजाचें किती प्रचण्ड प्रमाणावर नुकसान झालें याची केवळ अंधुक कल्पना येऊं शकेल. आर्थिकदृष्ट्या झालेलें नुकसान कल्पनातीत आहे. युद्धासाटीं वर्षानुवर्षें चाललेली तयारी हिशेबांत न घेतां केवळ गेल्या महायुद्धाचा एकंदर प्रत्यक्ष खर्च सुमारें ७५०० कोटी (७५०,०००,०००,०००) रुपये झाला असावा असा अगदीं काटकसरीचा अंदाज आहे. या प्रत्यक्ष नुकसानीशिवाय युद्धामुळें अप्रत्यक्ष नुकसान किती झालें हें कधींच अजमावतां येणार नाहीं. उध्वस्थ कुटुंबे, दरिद्री झालेला मध्यम वर्ग, नष्ट झालेली समाजाची सुरक्षितता यांतून उत्पन्न झालेलें एका सबंध पिढीचें जीवन-वैफल्य-या नुकसानीचें मोजमाप कोण व कसें करूं शकेल ?

पहिल्या महायुद्धाची समाप्ति व्हर्सायच्या तहानें झाली. प्रे. विल्सनच्या ध्येयवादी घोषणा हवेंत विरण्यापूर्वीच त्यांना हरताळ फांसणारीं कलमें व्हर्सायच्या तहांत अंतर्भूत करून युरोपीय विशेषत: दोस्तांच्या तथाकथित नेत्यांनीं पुढील महायुद्धाचीं बीजें पेरून ठेवलीं. जर्मनीला कायमचा खच्ची करण्यासाठीं केलेल्या योजना शेवटीं फ्रेंचाऐवजीं हिटलरच्या उपयोगीं पडल्या. स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार निर्माण केलेलीं पूर्व युरोपांतील लहान लहान राष्ट्रें जर्मनीभोवतीं शृंखला ठरण्याऐवजीं हिटलरच्या घशांत असहाय्य मेंढराप्रमाणें पडलीं. अर्थात् त्या वेळीं जर्मनीला जमीनदोस्त करण्यासाठीं जेत्यांनीं जर्मनीच्या सर्व वसाहती आपल्या ताब्यांत घेतल्या. आल्सेसलोरेन फ्रान्सनें परत घेतला. युपेन माल्मेडी बेल्जियमला देण्यांत आला. सार प्रांत १५ वर्षें फ्रान्सच्या स्वाधीन करण्यांत आला. पोलिश कॅरिडॉर, सायलेशिया इत्यादि पोलंडला बहाल करण्यांत आले. डॅन्झीग व मेमेल यांना स्वतंत्र स्थान देण्यांत येऊन जर्मनीचे लचके तोडले. जर्मनीचें नाविकदल जेत्यांनीं बळकाविलें. व्यापारी गलबतांचीहि तीच स्थिति झाली. केवळ अंतर्गत संरक्षणासाठींच एक लक्ष सैनिकांची परवानगी देण्यांत आली. व्हाईनलँड दोस्तांनीं व्यापून तेथें

१५ वर्षांसाठीं तळ ठोकला. सर्वांवर ताण म्हणजे जर्मनीला युद्धासाठीं पूर्णतया जबाबदार धरण्यांत येऊन कल्पनातीत अशी सुवर्ण खंडणी जर्मनीवर लादण्यांत आली.

१९१९–१९३९ हा वीस वर्षांचा काळ म्हणजे दोन महायुद्धांतील मध्यंतर होय. या वीस वर्षांत जागतिक इतिहासाला मिळालेली गति सामान्य माणसाची विचारशक्ति गुंग करणारी होती. इतकेंच नव्हे तर मोठमोठ्या विचारवंतांचीदेखील प्रज्ञा या कालांत घडलेल्या घटनांनीं सुन्न झाली.

१९१९ च्या राष्ट्रसंघाच्या व आंतरराष्ट्रीय सहकार्याच्या घोषणा केवळ सर्वसामान्य जनतेच्या डोळयांत धूळ फेंकण्यासाठींच होत्या. याचें प्रत्यन्तर म्हणजे युद्धोत्तर काळांत झपाट्यानें वाढीस लागलेला आर्थिक राष्ट्रवाद होय. राष्ट्राच्या स्वयंपूर्णतेच्या कल्पनेचें वाढलेलें स्वरूप म्हणजे आंतरराष्ट्रीय सहकार्याची अंत्येष्टीच होती. पण केवळ एवढ्यावरच या गोष्टी थांबल्या नाहींत तर ज्या लोकशाहीसाठीं युद्ध लढलें गेल्याचें सामान्य जनतेला सांगण्यांत आलें त्या लोकशाहीची सर्वांगीण पिछेहाट याच काळांत झाली. युरोपच्या नवीन लोकशाही राष्ट्रांनीं तिचा त्याग करून सर्वाधिकारशाहीचें आधुनिक स्वरूप अंगिकारलें. १९२२ मध्यें मुसोलिनीनें इटलीच्या लोकशाहीचा निकाल लावून अनियंत्रित सर्वाधिकारशाहीचें बीजारोपण केलें. अगदीं थोड्याच काळांत त्याचा प्रचंड वृक्ष तयार झाला. पण या विषवृक्षाची प्रचंड वाढ पाहून स्वतःला लोकशाहीचे पाठीराखे म्हणवणारे अँग्लो–फ्रेंच–अमेरिकन मुत्सद्दी अत्यंत आनंदांत होते. कारण १९१७ सालीं राज्यक्रांति होऊन रशियांत स्थापन झालेल्या नव्या साम्यवादी राजवटीचा कांटा काढावयास या नव्या सर्वाधिकारशाहीचा उपयोग होईल या सुखद पण भोळसट कल्पनेंत ते वावरत होते. युद्धोत्तर काळांतील सारे युरोपीय राजकारण या मध्यवर्ति कल्पनेवर उभारलेलें

दिसून येतें. यामुळेंच १९३३ मध्यें जर्मन लोकशाहीचा अन्त पाहून ब्रिटिश अगर फ्रेंच मुत्सद्यांनीं त्याविषयीं नक्राश्रुदेखील ढाळले नाहींत. कारण सोविएट रशियाच्या वाढत्या सामर्थ्याला पायबंद घालण्यासाठीं हिटलरचा उपयोग होईल अशा रम्य कल्पनेंत ते गुंग होते. जर्मनीच्या (Drang nach Osten) पूर्व युरोपांतील प्रसार धोरणामुळें युरोपांतील सत्तेचा समतोलपणा राखण्यासाठीं आपणां स्वतःला कांहींहि न करावें लागतां जर्मन गरूडाची व रशियन अस्वलाची झुंज लावतां आल्यास फारच उत्तम, या मोहक पण परिणामीं घातक ठरलेल्या मार्गानें लोकशाहीचें राजकारण या काळांत खेळलें गेलें. रशियन साम्यवादाच्या आंतरराष्ट्रीय आक्रमणाच्या खऱ्या खोट्या भीतीमुळें युरोपीय राष्ट्रांतील धनिकवर्गानें, सत्ता लोकशाहीच्या मार्गानें सामान्य जनतेच्या हातीं जाईल म्हणून सर्वत्र सर्वाधिकारशाहीचा पाठपुरावा केला. विशेषतः पूर्व युरोपांतील रुमानिया, पोलंड, हंगेरी, बल्गेरिया या राष्ट्रांत लोकशाहीचें बीज रुजण्यापूर्वींच वरील कारणांमुळें सर्वाधिकारशाहीचा उदय झाला.

१९३३ ते १९३९ या सहा वर्षांत नाझी जर्मनीनें हिटलरच्या नेतृत्वाखालीं व्हर्सायचा तह नष्ट केला. सक्तीचें लष्करी शिक्षण, अमर्याद शस्त्रास्त्रवाढ विशेषतः विमानदल, ऑस्ट्रियाचें एकीकरण, झेकोस्लोव्हाकियाचें विच्छेदन व नतर स्वाहाकार व शेवटीं डॅन्झीग प्रकरणाची तेढ अशा रीतीनें दुसऱ्या महायुद्धाकडे आपलीं पावलें वळवलीं, लोकशाही राष्ट्रांनीं, महायुद्ध टाळण्यासाठीं केलेले सारे प्रयत्न शरणागतीच्या स्वरूपाचे असून देखील युद्धपिपासु सर्वाधिकारशाही यामुळेंसुद्धां संतुष्ट होऊं शकली नाहीं, व युद्ध टाळतां आलें नाहीं.

२३ ऑगस्ट १९३९ रोजीं जगाला आश्चर्याचा धक्का देणारी एक विलक्षण घटना घडली. आजपावेतों एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्यास आतुर झालेलीं जर्मनी व रशिया हीं राष्ट्रें आपले पूर्वींचे सर्व वैर विसरून

परस्परांचे स्नेही बनले. रूसो–जर्मन अनाक्रमणाच्या तहानें रशिया व जर्मनी यांनीं परस्परांविरूद्ध युद्ध न करण्याची हमी परस्परांनी दिली. या साऱ्या घटनेचा अर्थ फारच थोड्या अवधींत जगाला कळून आला. लोकशाही राष्ट्रांचा रशियाला आपणांकडे वळविण्याचा व शांततावादी मोर्चा बळकट करण्याचा प्रयत्न पूर्णपणें अयशस्वी झाला. पोलंड हें एकाकी पडलें, व जर्मन आक्रमणाची पूर्वतयारी निर्धास्तपणें सुरू झाली. आठ दिवसांच्या आंतच जर्मनीनें, पोलंडला आपल्या अत्यंत अपमानकारक अटी नाकारल्याबद्दल युद्धाचें रीतसर आव्हान देखील न देतां पोलीश भूमीवर आक्रमण करण्यास सुरवात केली. १ सप्टेंबर ते १८ सप्टेंबर या अठरा दिवसांत जर्मन फौजांनीं अर्धा पोलंड व्यापला, व पूर्वनियोजित संकल्पानुसार उरलेला अर्धा रशियन फौजांनीं गिळला. पोलंडच्या मित्रराष्ट्रांनीं (इंग्लंड, फ्रान्स) ३ सप्टेंबर रोजीं जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. पण युद्ध पुकारण्यापलीकडे पोलंडला कसल्याहि प्रकारची मदत ते देऊं शकले नाहींत.

पोलंडचा पराभव झाल्यानंतर जर्मनीनें बराच काळपावेतों दुसरी कसलीच हालचाल केली नाहीं. उलट लोकशाही राष्ट्रांनीं आतां हें युद्ध लांबवण्यांत त्यांचा वा इतर कोणाचाहि फायदा नसल्यानें सन्माननीय तहासाठीं त्यांनीं मान्यता द्यावी असा प्रचार सुरू केला. अर्थात्च तोपावेतों आलेल्या कटु अनुभवामुळें लोकशाही राष्ट्रें या घातक आमिषाला बळीं पडलीं नाहींत. ९ एप्रिल १९४० रोजीं जर्मनीनें डेन्मार्क व नॉर्वे या निरुपद्रवी तटस्थ राष्ट्रांवर अचानक स्वारी केली. इंग्लंड व फ्रान्स यांनीं कसलीहि मदत देण्यापूर्वी नॉर्वेच्या सर्व महत्त्वाच्या बंदरांचा जर्मनांनीं कब्जा घेतला. याचा परिणाम म्हणजे इंग्लंड व फ्रान्स यांना नॉर्वेतून पळतां भुई थोडी झाली. पुढील घटनांवरून आज असें निश्चित म्हणतां येतें कीं, १० मे १९४० रोजीं सुरू केलेल्या जर्मन चढाईचाच हा (नॉर्वेवरील स्वारी) पूर्व रंग होता. १ल्या महायुद्धानंतर संरक्षणाच्या

न्यूनगंडानें पछाडलेल्या फ्रेंचांनीं अब्जावधि रुपये खर्च करून अभेद्य समजली जाणारी मॅजिनो तटबंदी उभारली. पण जर्मन गरुडाच्या यंत्र-चलित भरारीपुढें ती टिकाव धरूं शकली नाहीं. सेडन येथें फ्रेंचांची फळी फोडून जर्मनांनीं ताबडतोब इंग्लिश खाडीकडे धांव घेण्यास सुरुवात केली. ब्रिटिश सैन्य व फ्रेंच सैन्याचा कांहीं भाग यांना कोंडींत पकडून त्यांचा निकाल लावण्याचें त्यांचें धोरण होतें. त्याच अवधींत बेल्जमनें आपल्या दोस्तांना न विचारतांच शरणागति पत्करल्यामुळें ती बाजूदेखील उघडी पडली. या परिस्थितींत ब्रिटिश सन्याला पद्धतशीर माघार घेऊन आपला जीव बचावणें आवश्यक ठरलें.

नॉर्वेमधील पराजयामुळेंच चेंबर्लेन मंत्रिमंडळाचें स्थान डळमळित झालें होतें. शरणागतीच्या राजकारणाचा सर्वसामान्य जनतेला आलेला वीट, युद्धांतील पराजय व संकटकाळास योग्य अशा प्रभावी नेतृत्वाचा अभाव या गोष्टीमुळें चेंबर्लेन मंत्रिमंडळ जनतेंत अधिकाधिक अप्रिय झालें. फ्रान्समधील चढाईमुळें तर चेंबरलेनला आपल्या मंत्रिमंडळाचा राजिनामा देणें भाग पडलें. चर्चिलच्या युयुत्सु नेतृत्वाखालीं राष्ट्रीय मंत्रिमंडळ स्थापन झालें, व इंग्लंडनें युद्ध जिंकण्यासाठीं आपली कंबर कसली. पण युद्धपूर्व काळांतील चुका इतक्या भयानक होत्या कीं, आयत्या वेळीं मंत्रिमंडळांत बदल घडवून त्यांचें परिमार्जन करणें शक्य नव्हतें. मेच्या शेवटच्या आठवड्यापासून ते ४ जूनपर्यंत 'डंकर्क' या फ्रेंच बंदरांतून ब्रिटिश सैन्यानें घेतलेली यशस्वी माघार ही इतिहासांत चिर-स्मरणीय ठरेल. कारण जर्मन विमानदलाचा अविरत बॉंब वर्षाव, पाणबुड्यांचे सतत हल्ले, पुढें सरकणाऱ्या जर्मन फौजांचें वाढतें दडपण व 'डंकर्क' सारखें एक लहानसें बंदर या सर्व अडचणींतून ब्रिटिश जनतेच्या सहकार्याच्या जोरावर ब्रिटिश सैन्य स्वदेशीं सुखरूप परत येऊं शकलें. या प्रसंगापासूनच चर्चिलच्या प्रभावी नेतृत्वाची चुणूक जगाला दिसली.

'डंकर्क' संपलें, आणि अवघ्या १५ दिवसांत फ्रान्सचें अधःपतन झालें. चर्चिलच्या एकीकरणयोजनेला, स्वार्थान्ध व पराभूत वृत्तीच्या फ्रेंच नेत्यांनीं नकार दिला. मार्शल पेतॉंच्या जराजर्जर नेतृत्वाखालीं, फ्रान्सनें पुनः एकदां शरणागति पत्करली. फ्रान्सचे व्याप्त आणि अव्याप्त असे भाग पाडण्यांत येऊन 'व्हिशी फ्रान्स' ची राजवट चालू झाली. १९३५ सालीं मुसोलिनीच्या हातांवर ॲबिसीनीयाचें उदक सोडावयास तयार झालेला लावल, त्याचा सहकारी बॉने, अशा फॅसिस्ट मनोवृत्तीचे जर्मनप्रेमी या काळांत पुढें आलें. 'व्हिशी' फ्रान्सची चार वर्षांची राजवट म्हणजे फ्रेंच राष्ट्राच्या इतिहासाला लागलेला एक कलंक आहे. जर्मन व्याघ्रानें शिकार केलेल्या फ्रान्सच्या कलेवराचा लचका तोडून आपली भूक शमविण्यासाठीं इटालियन लांडग्यानें १९४० च्या जूनमध्यें युद्धांत उडी घेतली.

फ्रान्सवर मिळवलेल्या न भूतो न भविष्यति अशा विजयामुळें हिटलरला सारें आकाश ठेंगणें वाटावें यांत नवल तें कसलें? आणि म्हणूनच त्याच्या विजयमार्गांत आडव्या येणाऱ्या इंग्लंडचा निःपात करण्यासाठीं १९४० च्या सप्टेंबर महिन्यांत हिटलरनें इंग्लंडविरूद्ध आकाश-युद्धास सुरुवात केली. इंग्लंडची स्थिति त्या वेळेस अत्यंत बिकट होती. फ्रान्सचें पतन, सर्व युरोप जर्मन गरुडाच्या पंखाखालीं, अमेरिकेचें साहाय्य तुटपुंजे व सैन्य आरमार आणि विमानदल यांची शोचनीय अवस्था, या अडचणीमुळें, जर्मनीच्या प्रचंड विमानदलाच्या आघातापुढें ब्रिटन टिकाव धरूं शकेल असें ब्रिटनच्या हितचिंतकांनासुद्धां खरें वाटेना. पण चर्चिलनें दिलेल्या 'रक्त, श्रम, अश्रु आणि निढळाचा घाम' या महामंत्रांमुळें जणूं सारी ब्रिटिश जनता एक दिलानें काम करीत होती, झटत होती. प्रत्येकाच्या समोर आपलें राष्ट्र विजयी कसें होईल याशिवाय अन्य विषय नव्हता. अविरत बॉंबवर्षाव चालू असतांनादेखील ब्रिटिश स्त्रीपुरुषांनीं आपल्या प्रिय देशासाठीं अनंत कष्ट

सोसून युद्धसामुग्रीची निर्मिती केली. पहिल्या महायुद्धाप्रमाणेंच यावेळीं देखील ब्रिटनला दैव अनुकुल झालें. सप्टेंबर १९४० ते १९४१ या अवधींत हिटलरच्या अजिंक्य विमानदलानें आपल्या राक्षसी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण तें छोटेसें बेट युरोपच्या हुकूमशहापुढें नमलें नाहीं, इतकेंच नव्हें तर टिकाव धरून राहिलें व नंतर ब्रिटिश विमानांनीं प्रतिचढाईला सुरुवात केली. इतिहासांतील 'जर आणि तर' हे नेहमींच मनोरंजक असतात. तरी देखील हिटलर ब्रिटनच्या युद्धांत यशस्वी झाला असतां तर काय घडलें असतें याचा विचार क्षणभर कां होईना आपलें मन थरारून सोडतो.

१९४० मध्यें इटलीनें जरी जर्मनीच्या बाजूनें युद्धांत पदार्पण केलें, तरीसुद्धां जर्मनीला त्याचा तादृश असा कांहींच फायदा झाला नाहीं. उलट इटलीच्या आफ्रिकेंतील वसहातीविरुद्ध ब्रिटिशांनीं केलेल्या हल्ल्यांत मुसोलिनीची पडती बाजू सावरण्यासाठीं जर्मनीला रोमेलसारखा अव्वल दर्जाचा सेनापति फर्जा घालणें भाग पडलें. परंतु रोमेलनें आपली कामगिरी चोख रीतीनें बजावली. त्याचप्रमाणें इटलीच्या ग्रीसमधील नामुष्कीस पायबंद घालण्यासाठीं, हिटलरला ग्रीसमध्यें लक्ष घालणें, व त्यांतूनच युगोस्लाव्हिया क्रीट इत्यादि प्रकरणें उद्‌भवलीं. अर्थात्‌च विजयी जर्मन फौजांनीं ते प्रदेश काबीज करून हे सर्व प्रश्न सोडवले. रुमानिया आणि बल्गेरिया यांनीं रशियाच्या भीतीमुळें जर्मनीचें प्रभुत्व मान्य केलें होतेंच. या सर्व गोष्टीमुळें ब्रिटनचें पूर्व भूमध्यसमुद्रांतील आणि बाल्कन राष्ट्रांतून पूर्णपणें उच्चाटन झालें. तसेंच जर्मनीच्या रशियावरील संकल्पित स्वारीचा मार्ग मोकळा झाला.

फ्रान्समध्यें 'संरक्षक' मनोवृत्तीचा न्यूनगंड निर्माण झाला होता. त्याचप्रमाणें जर्मनींत दोन आघाडयांवरील युद्धाच्या भीतीचा न्यूनगंड पूर्वींपासून अस्तित्वांत होता. आणि याच भीतीपायीं हिटलरनें रशियाशीं

अनाक्रमणाचा तह केला होता. परंतु ब्रिटनवरील स्वारींत अपयश मिळाल्यानें हिटलरचें युद्धाचें वेळापत्रक साफ चुकलें व दुसऱ्या आघाडीवरील युद्धाची संभाव्यता वाटूं लागली. यांतून निसटण्याचा एकच मार्ग म्हणजे ब्रिटनची शक्ति वाढण्यापूर्वी बलिष्ठ रशियाला नेस्तनाबूत करणें. याच विचारानें हिटलरनें २२ जून, १९४१ रोजीं रशियावरील अभूतपूर्व चढाईस सुरुवात केली. त्यापूर्वी म्हणजे १० मे, १९४१ रोजीं हिटलरनें हर हेसला इंग्लंडमध्यें पाठवून रशियाविरोधी आघाडींत ब्रिटननें सामील व्हावें असा एक धाडसी प्रयत्न केला. अर्थात्च ब्रिटन ह्या डावपेंचाला बळी पडलें नाहीं. जर्मन सेनानींची अपेक्षा रशियन युद्ध चार महिन्यांत संपावें अशी होती. आणि जर्मन सेनेनें केलेल्या पहिल्या दोन महिन्यांतील प्रगतिकडें पाहतां ती अपेक्षा अगदींच अवास्तव होती असें म्हणतां येत नाहीं. कारण जर्मन फौजांनीं दोन हजार मैलाच्या रणक्षेत्रावर एकाच वेळीं चढाई करून उत्तरेकडे लेनिनग्राड, मध्यभागीं मास्को व दक्षिणेंत क्रिमीया यांना जर्मन ग्रहणाचे वेध लावले. रशियावरील स्वारीची बातमी कांनीं येतांच चर्चिलनें जर्मनीविरूद्ध लढण्यासाठीं सर्व प्रकारच्या साहाय्याचें अभिवचन रशियाला दिलें. अमेरिकेनेंदेखील उधार उसनवार सवलतीचा फायदा ब्रिटनप्रमाणेंच रशियाला द्यावयाचे कबूल केलें. या युद्धकालीन गरजेंतून या तीन बड्या राष्ट्रांची मैत्री निर्माण झाली.

पाश्चिमात्य साम्राज्यवादी राष्ट्रांचा वारसा घेतलेल्या जपाननें, युद्धपूर्व कालांतच दुर्बळ व विघटित अशा चीनमध्यें आपलें हातपाय पसरले होते. पण जपानची साम्राज्यतृष्णा, चीनमधील प्रदेशावरच संतुष्ट झालेली नव्हती. आणि युद्धामुळें फ्रान्स ब्रिटन यासारखीं जपानच्या विश्वविजयी आकांक्षेस पायबंद घालणारी राष्ट्रें स्वसंरक्षणांत गंतलीं होतीं. अमेरिकाहि रशिया व ब्रिटन यांना मदत देण्यांत आपलें बरेचसें लक्ष वेंचीत होती. त्यामुळें जपानच्या दृष्टीनें हीच काय ती सुवर्णसंधि

होती. आणि तिचा फायदा घेण्यासाठीं जपाननें ७ डिसेंबर १९४१ रोजीं, पर्ल हारबरवर हल्ला करून अमेरिकेच्या पॅसिफिक नाविक दलाला जलसमाधि देण्याचा प्रयत्न केला. त्याच दिवशीं जपानी सैनिक मलाया व सयाममध्यें उतरलें. जपानच्या कृत्यामुळें तोपावेतों चालू असलेल्या युरोपीय युद्धाचें स्वरूप बदलून तें खऱ्या अर्थानें विश्वयुद्ध झालें. कारण अमेरिकेनेंहि युद्धांत पदार्पण केलें. लगेच जर्मनी व इटली यांनीं जपानच्या बाजूनें अमेरिकेविरूद्ध युद्ध पुकारलें, व त्यामुळें युद्धांत दोन तट निश्चित दिसूं लागले.

युद्धाला सुरुवात होऊन प्रतिपक्षियांची तयारी होण्यापूर्वींच जपाननें प्रशांत महासागरांत चौफेर हल्ले चढवले. १९४१ व १९४२ च्या पूर्वार्धांत जपानी सत्ता, आग्नेय आशिया, फिलिपाईन्स, हिन्देशिया व इतर अनेक लहान लहान बेटें यांच्यावर स्थापित झाली. जपानी फौजा पूर्वेकडे आस्ट्रेलियाच्या तोंडाशीं येऊन पोहोंचल्या होत्या. तर पश्चिमेकडे जपानी विमानांची घरघर कलकत्यास ऐकूं येऊं लागली होती. ब्रिटिश साम्राज्याचा अतिपूर्वेकडील आधारस्तंभ समजला गेलेला सिंगापूरचा 'अभेद्य' सागरी तळ लक्षावधि सैनिकांसह जपान्यांच्या हातीं पडला होता.

१९४२ च्या मध्यपर्यंत अक्ष राष्ट्रांचीं पावलें वेगानें विजय मार्गावर पडत होतीं. रशियांत जर्मन फौजा कॉकेशसपर्यंत पोचल्या होत्या. आफ्रिकेंत रोमेलनें आलेक्झांड्रियाला धडक दिली होती. पाणबुड्यांचे हल्ले अविरतपणें चालू होते. इंग्लंड, अमेरिका व रशिया या तीन बलाढ्य राष्ट्रांनादेखील तो वेळपावेतों अक्ष फौजा अजिंक्य ठरल्या होत्या. सारें युरोपखंड हिटलरच्या फौजासाठीं गुलामाप्रमाणें खपत होतें. मध्यपूर्वेचें प्रवेशद्वार समजला जाणारा तुर्कस्थान जर्मनीकडे आशेनें पहात होता. दोस्त राष्ट्रांच्या भावी विजयाची आशा त्यांच्या चांगल्या हितचिंतकांनादेखील फारशी वाटत नव्हती. आणि याच सुमारांस युद्धाचा रंग झपाट्यानें बदलण्याच्या मार्गावर होता.

कॉकेशसच्या रोखानें दौडणाऱ्या फौजांना स्टॅलिनग्राडचा पूर्ण पाडाव करणें प्राप्त होतें. नेमकी तीच गोष्ट रशियन सैनिकांनीं जर्मनांना करूं दिली नाहीं. स्टॅलिनग्राडचा लढा म्हणजे एक वीररसाचें महाकाव्य आहे. शहराचा एकूणएक भाग जर्मनांच्या हातीं गेला असतांनादेखील रशियन सैनिक गनिमी काव्यानें सतत लढत राहिले. या त्यांच्या बलिदानांतूनच भावी विजयाची मूहूर्तमेढ रोवली गेली. १९४३ पासून रशियन फौजांनीं बचावाचें धोरण सोडून चढाई स्वीकारली. जून १९४१ ते जून १९४४ या तीन वर्षेपर्यंत प्रचण्ड जर्मन फौजांचा भार एकाकी रशियाला सहन करावा लागला. रशियन युद्धाच्या मानानें आफ्रिकेंतील व भूमध्य समुद्रांतील दोस्तांची चढाई म्हणजे लुटपुटीचा खेळ होता. स्टॅलिननें रूझवेल्ट व चर्चिल यांच्या मागें दुसरी आघाडी उघडण्याची निकड लावली होती.

लोकशाही राष्ट्रांचें युद्धभांडार म्हणून युद्धाच्या पूर्वार्धात अमेरिकेनें फार महत्त्वाची कामगिरी पार पाडली. युद्धांतील अंतिम यशाचा वांटा रशियन शौर्य, ब्रिटिश धैर्य याचप्रमाणें अमेरिकेचें साधनसहाय्य यांकडे जातो. १९४३ च्या मध्यांत अमेरिकेंत युद्धसाहित्याची प्रचण्ड निर्मिति सुरूं झाली. आणि अशा युद्धसामग्रीच्या सुसज्जतेमुळें दोस्तांना युद्ध जिंकणें सुलभ झालें. १९४३ च्या एप्रिल महिन्यांत आयसेन हॉवरच्या नेतृत्वाखालीं आफ्रिकेंत उतरलेल्या अमेरिकन फौजांनी जुलै महिन्यांत इटलींत पदार्पण केले. दोस्तांच्या आगमनाबरोबरच मुसोलिनीचें अधःपतन झालें. व या इटलीच्या हुकूमशहाला दोस्तांच्या तुरुंगांत खितपत पडावें लागलें. पण हिटलर आपल्या मित्राला विसरला नव्हता. याचें प्रत्यंतर जगाला लवकरच आलें. हिटलरच्या छत्रीधारी सैनिकांनीं अत्यंत साहसानें मुसोलिनीची सुटका केली. मुसोलिनीच्या नेतृत्वाखालीं उत्तर इटलींत नवें सरकार प्रस्थापित झालें. जर्मन फौजांनीं आपली आघाडी पुनः संघटित केली व इटलींतील युद्ध रेंगाळलें.

अमेरिकन व ब्रिटिश विमानांनीं जर्मनीवर १९४२ पासूनच वाढत्या प्रमाणावर बॉंब वर्षावास सुरूवात केली होती. प्रतिदिनीं त्याची तीव्रता व व्याप वाढतच गेला. जर्मन युद्धोत्पादनाच्या साऱ्या योजना यामुळें कोलमडून पडल्या. जर्मन विमानदलाला नवीन विमानांचा पुरवठा साहजिकच कमी पडला. याच सुमारास प्रशांत महासागरांत अमेरिकन नाविकदल आणि विमानदल यांच्या संयुक्त माऱ्यापुढें जपानची पीछेहाट सुरूं झाली होती. अक्ष राष्ट्रांचा पराभव आतां दृष्टीच्या टप्प्यांत आला होता. पण युरोपांत दुसरी आघाडी उघडल्याशिवाय हिटलरची युरोपवरील पकड सैल होणें शक्य नव्हतें.

६ जून, १९४४ रोजीं अत्यंत प्रचंड प्रमाणावर इंग्लंड अमेरिका व कॅनडा यांच्या संयुक्त फौजांनीं आपली युरोपवरील अभूततपूर्व चढाई सुरूं केली. सारी जग ज्याची वाट पहात होतें त्या दुसऱ्या आघाडीची नॉर्मंडीच्या रणक्षेत्रावर सुरुवात झाली. जर्मन फौजांनीं अत्यंत कडवा प्रतिकार करून पराक्रमाची शर्थ केली. पण विमानदलाची कमतरता, पंचमस्तंभी कारवाया, घातपाती कृत्यें, स्थानिक जनतेचा असहकार यामुळें जर्मनांची पीछेहाट होत गेली. हिटलरनें निराश होऊन आपल्या ठेवणींतील V¹ आणि V² हीं अत्यंत संहारक रॉकेट शस्त्रें लंडनविरुद्ध उपयोगांत आणलीं. पण आतां दोस्त फौजांनीं जर्मनीभोंवतीचे आपले फांस पूर्णपणें आवळत आणल्यामुळें, ती मरणापूर्वीची शेवटचीच धडपड ठरली, व विजयी दोस्त फौजा भर वेगानें बर्लीनच्या रोखानें धांवूं लागल्या. स्टॅलिनग्राडपासून सुरुवात झालेली रशियन प्रतिचढाई अप्रतिहतपणें जर्मन फौजांचा बींमोड करीत होती. त्यामुळें जर्मनीला रशियांतूनच नव्हे तर पोलंड, रुमानिया, बल्गेरिया हंगेरी या बाल्कन राष्ट्रांतून स्वदेश-संरक्षणा-साठीं माघार घेणें अपरिहार्य टरलें. परंतु दोन्ही बाजूंच्या चढाईमुळें जर्मनीची ससेहोलपट होऊन ३० एप्रिल, १९४५ रोजीं हिटलरनें बर्लिन लढवत आपला देह ठेवला. व विजयी दोस्तांनीं आठ दिवसाच्या आंत ॲड्

डोयनिटझ्च्या सरकारास संपूर्ण शरणागति पत्करण्यास भाग पाडलें. अशा रीतीनीं ६ वर्षे चालू असलेल्या युरोपांतील रणसंग्रामाचा शेवट झाला.

जर्मनीच्या पराभवानंतर दोस्तांनीं सर्व लक्ष जपानवर केंद्रित केलें. अमेरिकन बॉंबवर्षावामुळें जपान अगदीं टेकीस आला होता. आग्नेय आशिया, फिलिपाईन, चीन, मांचूरिया या सर्व प्रदेशांतून जपानचें उच्चाटन झालें. ६ ऑगस्ट, १९४५ रोजीं हिरोशिमावर अमेरिकेनें पहिला 'ॲटम बॉंब' टाकला. ९ ऑगस्टला नागासाकिवर दुसरा बॉंब टाकण्यांत आला. १४ ऑगस्ट रोजीं जपाननें शरणागति पत्करली व युद्ध संपलें.

दुसऱ्या महायुद्धानें जगाच्या मानवी व साधनसंपत्तीचा केलेला नाश इतका प्रचण्ड आहे कीं त्याची आंकडेवारी लावणें अशक्यप्राय आहे. या नरसंहारांत सर्व राष्ट्रांतील मिळून १॥ कोटींच्यावर सैन्य कामास आलें. हें युद्ध सर्वंकष स्वरूपाचें असल्यानें निरपराधी नागरिकहि यांतून सुटणें शक्य नव्हतें. असे निरपराधी नागरिक स्त्रिया व मुलें यांची हत्या एकट्या रशियांत ८० लक्षांवर गेली. युद्धमान राष्ट्रांनीं, प्रत्यक्ष केलेल्या खर्चाचा आंकडा ५७७०० कोटी रुपयांच्यावर गेलेला आढळून येईल. आणि तरीदेखील या तऱ्हेच्या आंकड्यांनीं या युद्धानें नुकसानीचें यथार्थ मूल्यमापन कधींच करतां येणार नाहीं. हिटलरच्या चार वर्षांच्या युरोपवरील अधिराज्यांत, बळी पडलेल्या लक्षावधि ज्यू, पोलीष, झेक, फ्रेंच इत्यादि दुर्दैवी कुटुंबाची मोजदाददेखील करणें मानवी प्रयत्नांच्या पलिकडचें आहे. युद्धानें निर्माण केलेला निर्वासितांचा प्रश्न, ७ वर्षांनंतरदेखील तितक्याच तीव्रतेनें आजहि युरोपांतील राष्ट्रांना भेडसावीत आहे. बॉंबवर्षावानें झालेली शहरांची अपरिमित हानि, विशेषत: औद्योगिक व राहण्याचीं ठिकाणें, या बाबतींत आजहि भरून आलेली नाहीं. सामाजिक दृष्ट्या झालेली हानि तर, मानवी इतिहासांत अजोड अशीच आहे. अनाथ व अनौरस बालकांचा प्रश्न, अपंग व निराश्रित सैनिकांचा

प्रश्न इत्यादि त्यांतील उदाहरणें म्हणून देतां येतील. परंतु या दोन्हीपेक्षांहि बिकट आणि उद्वेगजनक असा प्रश्न, राष्ट्रप्रेमानें प्रेरित होऊन आपल्या कौमार्याचें हवन करणाऱ्या तरुणींचा आहे.

गेल्या महायुद्धाप्रमाणेंच यावेळींदेखील पराभूत जर्मनीचे तुकडे पडले. पण यावेळची विभागणी ही दोस्त राष्ट्र व रशिया यामध्यें झाली. पूर्व जर्मनी रशियांकित असून पश्चिम जर्मनीवर अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स या त्रयींचा अंमल चालू आहे. पण १९१९ मधील विभागणीपेक्षां १९४५ ची विभागणी अगदीं निराळया स्वरुपाची आहे. जपानचा पराभव करण्यासाठीं ज्या अभिनव संहारक अस्त्राचा उपयोग अमेरिकेनें केला त्याचे अति भयानक परिणाम आजहि हिरोशिमा व नागासाकी येथील जनतेला भोगावे लागत आहेत. अणुशक्तीचा उपयोग भीषण असू शकतो याचें प्रत्यंतर हिरोशिमा येथील नुकसानीवरून सहज लक्षांत येतें. ८० हजार लोक प्राणास मुकले, १४ हजार बेपत्ता झाले, व ४० हजार जखमी व अपंग झाले. ५ हजार चौरस मैल जागा सपाट झाली. ९० हजार इमारतीपैकीं ६२ हजार जमिनदोस्त झाल्या, आणि उरलेल्या मोडकळीस आल्या. जपानचा पराभव करण्यासाठीं अणुबॉबचीच आवश्यकता होती हें, कोणीहि विचारवन्त मान्य करणार नाहीं. अशा परिस्थितींत सहस्रावधि निरपराधि नागरिकांना, ज्या नरकयातना सहन करणें भाग पडलें त्याची नैतिक जबाबदारी कोणावर ?

प्राचीन काळापासून, युद्धाचा शेवट, जेत्यांनीं पराजितांकडून खंडणी घेण्यांत होत असे. खंडणी देण्याचें एक कारण, युद्ध करण्याचा नैतिक गुन्हा जणू पराजितानींच केला असें समजण्यांत येई. पहिल्या महायुद्धांत ( १९१४–१९१८ ) युद्ध गुन्ह्यांची नैतिक जबाबदारी "कैसरवर लादून त्याला फांशीं द्यावें" अशी केवळ मागणी करण्यापर्यंत विजयी दोस्त राष्ट्रांची मजल गेली. पण दुसऱ्या महायुद्धांत विजयी

राष्ट्रांनीं युद्ध संपतांच, युद्ध गुन्हेगार म्हणून ‘ जित ’ राष्ट्रांतील अनेक वरिष्ठ लष्करी व राजकीय नेते यांच्यावर आपल्याच न्यायासनासमोर खटले भरले. पूर्व योजनेंप्रमाणें त्यांना दोषी ठरवून त्यांचा ‘ बळी ’ घेतला. युद्ध करणें हा अखिल मानवतेविरुद्ध केलेला अक्षम्य गुन्हा असला तरी, पराभूत होणें हा कांहीं गुन्हा नव्हे ! आणि या दृष्टिकोनांतून वरील प्रश्नाकडे पाहिल्यास, सत्तेच्या जोरावर, जेत्यांनीं न्यायाच्या नांवांखालीं जित नेत्यांचें बळी घेणें कितपत योग्य ठरेल ? या दृष्टीनें जपानी युद्ध-गुन्हेगारांना शिक्षा देण्याविषयीं भारतीय न्यायाधीशानें दाखविलेली वृत्ति प्रसंशनीय ठरते.

पहिल्या महायुद्धाची इतिश्री, वर्षाच्या आंत व्हर्सायच्या तहांत झाली. परंतु २रें महायुद्ध संपून आज ८ वर्षें लोटलीं तरीदेखील तहाची भाषासुद्धां ऐकूं येत नाहीं. कारण युद्धकाळांत, गरजेच्या पोटीं निर्माण झालेली रशिया, अमेरिका, ब्रिटन यांची मैत्री युद्धसमाप्तीबरोबरच लयास गेली. ही मैत्री अल्पायुषी ठरण्याचें एक कारण म्हणजे, अमेरिकेनें रशियापासून लपवून ठेवलेलें अणुशक्तीचें रहस्य. परंतु त्याहिपेक्षां महत्त्वाचें कारण म्हणजे साम्यवादी रशिया आणि लोकशाही राष्ट्रें यांच्या जीवनविषयक दृष्टिकोनांनीं वाढीस लागलेला फरक व सत्ताराजकारणांत यशस्वी होण्यासाटीं परस्परांची चाललेली धडपड यांमुळें शांतता परिषद भरवून दुसऱ्या महायुद्धाचें अधिकृतरीत्या रीतसर सूप वाजवणें आजहि अशक्य झालें आहे.

*

प्राचीन ग्रीक नगरराज्यांतील शासनव्यवस्थेपासून तो विसाव्या शतकांतील इंग्लंड अमेरिकेच्या राज्यव्यवस्थेला लोकशाही असें सर्वसाधारण नांव देण्यांत येतें. पण याचा अर्थ या सर्व काळीं आणि सर्व स्थानीं अस्तित्वांत असलेली लोकशाही एकाच स्वरूपाची आहे असें समजणें चूक होईल. आधुनिक लोकशाहीचा विकास गेल्या तीन शतकांत झाला आहे. विशेषत: फ्रेंच राज्यक्रांतीनंतर लोकशाही विचारांचा पगडा युरोपियन जनतेच्या मनावर अधिकाधिक बसलेला दृष्टीस पडतो. फ्रेंच राज्यक्रांतीच्या तत्त्वत्रयीपैकीं स्वातंत्र्य व समता या दोन मूलभूत आधारावर लोकशाहीची उभारणी झालेली असते. पण या शद्बाचे निश्चित अर्थ काय या विषयीं मात्र आजदेखील विचारवंतांत एकवाक्यता नाहीं. स्वातंत्र्य आणि समता यांचा अर्थ राजकीय क्षेत्रापुरताच मर्यादित आहे, असें कांहींचें म्हणणें आहे. पण समता म्हणजे केवळ राजकीय अधिकारांची समान वाटणी नसून आर्थिक क्षेत्रांतदेखील समता असावयास हवी असा दुसऱ्यांचा आग्रह आहे. अर्थात्‌च लोकशाहीच्या स्वरूपाकडे पाहण्याच्या या दोन दृष्टिकोणांत भरपूर फरक आहे.

इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स या तीन राष्ट्रांना लोकशाही राज्यव्यवस्थेचीं प्रमुख उदाहरणें मानण्यांत येतात. या राष्ट्रांत आज तरी आर्थिक समता प्रस्थापित झालेली नाहीं. आणि ती नाहीं यासाठीं या राष्ट्रांना लोकशाही समजणें चुकीचें आहे असें आर्थिक समतावादी प्रतिपादन करतात. पण लोकशाहीचा अर्थ केवळ आर्थिक समता प्रस्थापित करणें इतक्यापुरताच मर्यादित केल्यास आजवर घडलेल्या लोकशाहीच्या ऐतिहासिक विकासाकडे डोळेझांक करावी लागेल. लोकशाही राज्यव्यवस्थेचें विकासवादी स्वरूप गेल्या तीन शतकांत एक प्रकारें सिद्ध झालें आहे.

इंग्लंडच्या राज्यसत्तेचीं सर्व सूत्रें या अवकाशांत सावकाशपणें कां होईना पण निश्चित रीत्या वरिष्ठ व धनिक वर्गाकडून दलित व निर्धन वर्गाकडे जात असलेलीं दिसून येतात. दुसऱ्या महायुद्धांत संकटकाळीं राष्ट्राला तारक ठरलेल्या रणझुंजार चर्चिलचें नेतृत्व ब्रिटिश जनतेनें युद्ध संपतांच झुगारून दिले. व्यक्तिपूजेच्या आहारीं न जातां ॲटलीसारख्या सामान्य व्यक्तित्व असलेल्या नेत्याच्या हातीं राष्ट्राचीं सूत्रें सोपवलीं. या घटनेचा अर्थ ब्रिटिश जनता ही लोकशाहीच्या तत्त्वांना ओळखते, व तदनुसार आवश्यक ते बदल घडवून आणण्याची समयज्ञता दाखवते असा केल्यास तें चूक होईल कां? आजहि इंग्लंडमध्यें आर्थिक समता प्रस्थापित झालेली नाहीं. पण त्याचा अर्थ ब्रिटन लोकशाहीला पारखे आहे असा करणें कितपत योग्य ठरेल?

लोकशाहीच्या या विकासवादी स्वरूपामुळें कालपर्यंत सत्तेचा स्पर्श ज्यांना झाला नव्हता असे नवे वर्ग आणि नवे वंश आज लोकशाही राज्यव्यवस्थेंत समान अधिकाराचें स्थान मिळवूं शकले आहेत. अमेरिकेचें उदाहरण या दृष्टीनें उद्बोधक आहे. १९व्या शतकाच्या शेवटीं ज्यांची गुलामगिरी नष्ट करण्यांत आली त्या नीग्रो जनतेला श्वेत वर्णीयांच्या बरोबरीचें स्थान प्राप्त व्हावें असा प्रयत्न चालू आहे. आजहि नीग्रो जनता पूर्णपणें श्वेत वर्णीयांच्या बरोबरीनें आपले अधिकार वापरूं शकते असें म्हणतां यावयाचें नाहीं. पण एक गोष्ट मात्र निश्चित दिसून येते कीं अमेरिकेंतील विचारवंत आणि सत्ताधारी वर्ग यांना नीग्रोंच्या समान अधिकारांची जाणीव अत्यंत तीव्रतेनें झाली आहे. त्यामुळें नीग्रोंना अन्याय करणारे लोकशाहीविरोधी अनेक निर्बंध आज भराभर नष्ट होत आहेत. प्रो. मॅकीव्हरसारखे जुन्या वळणाचे राजकीय विचारवंतदेखील अमेरिकन लोकशाही वर्णभेदाच्या ढासळणाऱ्या पायावर उभी राहूं शकत नाहीं असा गंभीर इषारा देत आहेत.

राजकीय स्वातंत्र्याची आणि अधिकारांची मातब्बरी कितीहि असली तरी आर्थिक सुरक्षितता असल्याशिवाय राजकीय स्वातंत्र्य हवेसें कसें वाटेल ? आर्थिक सुरक्षिततेमुळेंच राजकीय अधिकार संपादन करण्याकडे व संपादित अधिकार उपभोगण्याकडे धनिक वर्ग लक्ष पुरवूं शकला. याउलट हाती असलेल्या राजकीय अधिकारांकडे ढुंकून पाहण्याची शुद्धदेखील निर्धनावस्थेमुळें कनिष्ट वर्गांना राहिली नाहीं. कारण सर्वनाशक दारिद्र्यामुळें जीवन निर्वाहासाठीं सतत धडपडणें हेंच त्याचें जीवनध्येय झालें. पण आर्थिक सुरक्षिततेसाठीं राजकीय स्वातंत्र्याचा बळी द्यावा लागला तरी त्यांत फारसें बिघडत नाहीं असें मानणें अनिष्ट आहे. कारण संपादित स्वातंत्र्य एकदां नष्ट झाल्यावर केवळ आर्थिक सुरक्षितता अनंत स्वरूपीं मानवी मनाचें समाधान करूं शकत नाहीं. आर्थिक सुरक्षिततेच्या पोटीं संपूर्ण मानवी जीवनाचें नियंत्रण करण्याची ईर्षा राज्यकर्त्यांत उत्पन्न होते. याचाच अर्थ सर्वसामान्य जनतेला आर्थिक सुरक्षिततेसाठीं राजकीय, वैचारिक व सांस्कृतिक गुलामगिरी पत्करावी लागते. आर्थिक सुरक्षितता व राजकीय स्वातंत्र्य या दोघांचा व्यक्तिविकासाच्या दृष्टीनें समन्वय करणें आजच्या लोकशाही राज्यव्यवस्थेला आवश्यक झालें आहे. हा समन्वय साध्य करण्यासाठीं लोकशाही समाजवादाचा अंगिकार करणें उपयुक्त ठरेल. लोकमतानें निवडून दिलेल्या सार्वभौम विधिमंडळाकडून विधिनियम संमत करून राष्ट्राच्या मूलभूत उद्योगधंद्यांचें, खाणींचें व पतपेढ्या व विमा कंपन्या यांचें राष्ट्रीयीकरण करतां येईल. याच मार्गानें समाजातील धनिक वर्गाच्या अतिरिक्त संपत्तीचा उपयोग आर्थिक विषमतेची तीव्रता कमी करण्याकडे करतां येईल. आणि हें सर्व कार्य कसलाहि रक्तपात अथवा अत्याचार किंवा सामाजिक उलथापालथ न होतां शांततामय मार्गानें घडून येऊं शकतें. हें केवळ स्वप्नरंजन नाहीं, कारण १९४५ ते १९५० या काळांत ब्रिटनमध्यें मजूर पक्षानें असा प्रयोग यशस्वीपणें केला होता आणि हाच लोकशाहीचा मार्ग आहे.

लोकशाहीच्या तत्त्वप्रणालीचें प्रत्यक्षांत दिसणारें स्वरूप देशकाल परिस्थितीप्रमाणें विविध व वैचित्र्यपूर्ण बनलें आहे. इंग्लंड, फ्रांस व अमेरिका या तीन प्रमुख राष्ट्रांतील लोकशाहीदेखील एकाच सांच्याची वा समान धर्तीची नाहीं. प्रत्येक राष्ट्राच्या ऐतिहासिक, राजकीय उत्क्रांतीचा त्या त्या देशांतील लोकशाहीच्या शासनव्यवस्थेवरच केवळ नव्हे, तर तत्त्वज्ञानावरदेखील परिणाम झाला आहे. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत या तीन लोकशाही राष्ट्रांचीं तोंडें भिन्न दिशांना दिसत आहेत. ब्रिटनमध्यें लोकशाहीच्या मार्गानें आर्थिक समता प्रस्थापित करण्यासाठीं राष्ट्रीयीकरणाचें तत्त्व मान्य करण्यांत आलें आहे. तर अमेरिकेच्या दोन प्रमुख राजकीय पक्षांचें इतर बाबतींत मतवैचित्र्य असलें तरी अनिर्बंध भांडवलशाही अर्थव्यवस्था कायम टिकविण्याच्या बाबतींत मतैक्य आहे. अमेरिकन जनतेच्या मतें लोकशाहीच्या मूलभूत आधारला-व्यक्तिस्वातंत्र्याच्या विकासाला अनिर्बंध भांडवलशाही आवश्यक आहे. फ्रान्समध्यें इंग्लंड आणि अमेरिका या राष्ट्रापेक्षां निराळीच अनेकपक्षीय लोकशाही अस्तित्वांत आहे. जनतेच्या राजकीय आकांक्षा योग्य रीतीनें व्यक्त होण्यासाठीं केवळ दोनच पक्ष अपुरे ठरतात. राजकीय प्रश्नांकडे पाहण्याचे केवळ दोनच दृष्टिकोण असतात हें फ्रेंच जनतेला मान्य नाहीं. यामुळेंच अनेक पक्षांची आवश्यकता फ्रेंच लोकशाहीला वाटते.

लोकशाहीचीं हीं त्रिविध स्वरूपें या प्रकरणांत आढळतील. या देशांतील लोकशाहीचा विचार केल्यानंतर असें निश्चित वाटूं लागते कीं लोकशाही हा केवळ शासनसंस्थेचा एक विशिष्ट प्रकार नसून तो एक जीवनविषयक दृष्टिकोण आहे. एवढेंच नव्हे तर या जीवनविषयक दृष्टीकोणांत अनेक उपप्रकार संभवतात. लोकशाहीच्या मूलभूत सिद्धान्तावर या राष्ट्रांचें एकमत असलें तरी ते सिद्धान्त अंमलांत आणण्यासाठीं योजण्यांत येणारे मार्ग भिन्न असूं शकतात. वस्तुतः साधनांविषयीं समानता आवश्यकच आहे असा लोकशाहीचा आग्रह नाहीं. प्रत्येक

व्यक्तीला तिच्या व्यक्तित्वाचा संपूर्ण विकास करण्यासाठीं आवश्यक तें वातावरण व परिस्थिती निर्माण करणें या अंतिम ध्येयाविषयीं मात्र सर्व राष्ट्रांत एकवाक्यता असली पाहिजे.

## ब्रिटन

१८ व्या व १९ व्या शतकांत सागर सम्राज्ञी म्हणून जगाचें नेतृत्व करणाऱ्या ब्रिटनचें व त्याच्या साम्राज्याचें २० व्या शतकांतील जागतिक राजकारणांत असलेलें स्थान फार निराळें आहे. औद्योगिक क्रांतीची सुरुवात ब्रिटनमध्यें प्रथम झाली. यामुळें ब्रिटनला बाकीच्या युरोपीय राष्ट्रांपेक्षां आपला विकास करण्याची संधि फार मोठ्या प्रमाणांवर मिळाली. त्याचप्रमाणें औद्योगिक व शास्त्रीय प्रगतीच्या जोरावर ब्रिटननें आपलें साम्राज्य त्रिखंडांत स्थापन केलें. ज्या साम्राज्यावर सूर्य कधींहि मावळत नसे इतका प्रचण्ड भूविस्तार असलेलें अन्य साम्राज्य आधुनिक काळांत झालें नाहीं. ब्रिटननें मिळवलेलें हें साम्राज्य अपघातानें मिळवलेलें आहे. त्यांत योजनाबद्धता नव्हती असा एक प्रवाद आहे. परंतु हें विधान अर्धसत्य आहे. साम्राज्यांतील बराचसा भाग हा प्रयत्नपूर्वकच मिळवलेला होता. ब्रिटनचें जागतिक राजकारणांतलें अग्रेसर स्थान त्याच्या साम्राज्यावर आणि त्या साम्राज्याचें संरक्षण करणाऱ्या दिग्विजयी सागरसामर्थ्यावर अवलंबून होतें.

विसाव्या शतकांत वरील दोन्ही गोष्टींत महत्त्वाचे बदल घडून आले. ब्रिटिश साम्राज्याचें स्वरूप अनेकविध होतें. त्यांत प्रामुख्यानें श्वेतवर्णीयांच्या वसाहती व श्वेतेतरांचे परतंत्र देश असे दोन भाग पाडतां येतील. पहिल्या प्रकारांत १६ व्या व १७ व्या शतकांत ब्रिटनमधील साहसी निर्वासितांनीं धार्मिक छळामुळें आपला देश सोडून नव्या जगांत निर्माण केलेल्या वसाहतींचा अंतर्भाव होतो. हिंदुस्थान, ब्रह्मदेश, सिलोन इत्यादि देश हीं दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें आहेत. पहिल्या महायुद्धांत ब्रिटिश

साम्राज्यांतील स्वायत्त वसाहतींनीं ब्रिटनला मदत केली होती. पण त्या नंतरच्या काळांत त्यांच्या व ब्रिटनच्या धोरणांत फरक पडूं लागला. व त्यांचे ब्रिटनशीं असलेले संबंध दुरावूं लागले. दुसऱ्या महायुद्धानंतर आशियांतील राष्ट्रवादी उद्रेकाचे परिणाम ब्रिटिश साम्राज्याला भोगावे लागले. ब्रिटनची हिंदुस्थान, पाकिस्तान आणि ब्रह्मदेश सिलोन या देशावरील राजकीय सत्ता नष्ट झाली. ब्रिटिश साम्राज्यांत अवघ्या तीस वर्षांच्या अवधींत घडून आलेलें हें स्थित्यंतर एका दृष्टीनें जागतिक राजकारणांतील ब्रिटनच्या घसरगुंडीचें निदर्शक आहे. ब्रिटिश राष्ट्राची ही घसरगुंडी होण्याचें मुख्य कारण प्रचण्ड लोकसंख्या आणि अमूप साधनसामुग्री यांचा त्या राष्ट्रांत असलेला अभाव होय. विमानविद्येच्या प्रगतीमुळें ब्रिटनचें दिग्विजयी सागरी सामर्थ्य आज अपुरें ठरलें आहे. इतकेंच नव्हे तर साम्राज्यांतर्गत देशांकडून होणारा अन्नधान्याचा पुरवठा युद्धकाळांत फार मोठ्या प्रमाणावर बंद पाडण्याची शक्यता विमानविद्येमुळें निर्माण झाली. ब्रिटनसारख्या लहानशा बेटांत असलेली दाट लोकवस्ती आणि औद्योगिक कारखानें हीं शत्रूच्या हवाई हल्ल्यांपुढें टिकाव धरूं शकत नाहींत.

पहिल्या महायुद्धानंतर निर्माण झालेल्या जागतिक परिस्थितींत ब्रिटीश मुत्सद्यानीं केलेलें राजकारण त्या राष्ट्राच्या पूर्वापार चालत आलेल्या इभ्रतीला न शोभणारें झालें. या काळांत ब्रिटिश मुत्सद्यांसमोर दोन मार्ग मोकळे होते. सामुदयिक संरक्षणाच्या तत्त्वाचा ( Collective security ) प्रामाणिकपणें अंगिकार करून नवीन निर्माण झालेल्या राष्ट्रसंघाला सामर्थ्यसंपन्न करणें व अशा समर्थ राष्ट्रसंघाच्या द्वारें जागतिक शांतता व आंतरराष्ट्रीय सहकार्य यांचा लाभ युद्धोत्तर जगाला मिळवून देणें. दुसरा मार्ग म्हणजे पूर्वापार चालत आलेले सत्ताराजकारणांतील सत्तेच्या समतोलपणाचें ब्रिटिश धोरण, व्हर्सायच्या तहाची अंमलबजावणी करून यशस्वी करणें. पण या दोन्ही पर्यायांपैकीं एकाचाहि निश्चित स्वीकार या काळांतील दिवाळखोर ब्रिटिश मुत्सद्यांनीं केला नाहीं. सुरुवातीपासूनच

राष्ट्रसंघाला संपूर्ण पाठिंबा देण्याचें टाळून त्याच्या भावी अपयशाचें त्यानीं बीज रोविलें. विजयी व जर्मनद्वेष्ट्या फ्रान्सच्याविरुद्ध पराभूत जर्मनीला ब्रिटनची सहानुभूति व अप्रत्यक्ष सहाय्य सतत मिळत गेलें. याचा एक परिणाम म्हणजे फ्रान्सनें इटलीला दिलेलें उत्तेजन होय. राष्ट्रसंघाच्या या दोन प्रमुख राष्ट्रांच्या परराष्ट्रीय धोरणांत निर्माण झालेल्या या अंतर्विरोधामुळें युद्धोत्तर काळांत सामुदायिक संरक्षणाच्या तत्त्वाला तिलांजलि मिळाली. ज्या साम्राज्यावर कधींहि सूर्य मावळत नसे अशा साम्राज्याचे भाग्यविधाते इतके अल्पबुद्धि व परिस्थितिपराङ्मुख असावेत याचें कोणालाहि आश्चर्य वाटेल. पण या काळांत विशेषतः १९३१ नंतर भांबावलेल्या ब्रिटिश जनतेनें आपल्या राष्ट्राचें भवितव्य हुजूर पक्षांतील अत्यंत प्रतिगामी, साम्यवादी क्रांतीची धास्ती घेतलेल्या व फॅसिस्ट सर्वाधिकारशाहीचें घातक स्वरूप ओळखूं न शकलेल्या 'क्लिव्हडेन' गटाच्या हातीं दिलें होतें हें सत्य कोणालाहि नाकारतां येणार नाहीं.

१९३६ मध्यें आठव्या एडवर्डनें राज्यत्याग केल्यानंतर हुजूर पक्षाच्या नेतृत्वाची जबाबदारी नेव्हिल चेंबर्लेनवर पडली. जागतिक राजकारणांतील अत्यंत कठीण काळांत इंग्लंडचें नेतृत्व या मृदुप्रकृति व शांतताप्रेमी मुत्सद्याला करावें लागलें. राष्ट्राच्या नेतृत्वाला आवश्यक असणाऱ्या, सत्ताराजकारणाचें सूक्ष्म ज्ञान, प्रतिपक्षियांचें कुटिल डावपेच ओळखण्याची कुशाग्र बुद्धि, व प्रभावी व्यक्तिमत्व, यांपैकीं कोणत्याच गुणांची देणगी दुर्दैवानें चेंबर्लेनला मिळाली नव्हती. दुसऱ्या महायुद्धापूर्वी परिस्थितिपराङ्मुख नेतृत्वामुळें इंग्लंडनें लज्जास्पद शरणागतीचें धोरण स्वीकारलेलें दिसून येतें. अर्थात् या शरणागतीच्या धोरणासाठीं अथवा इंग्लंडच्या लष्करी दुर्बलतेविषयीं केवळ चेंबर्लेनला जबाबदार धरणें वस्तुस्थितीला सोडून होईल. अपमानास्पद म्युनिच् करार करून परत आलेल्या चेंबर्लेनचें ब्रिटिश जनतेनें विजयी वीरा-प्रमाणें स्वागत केलें होतें. याचा अर्थ तत्कालीन बहुसंख्य जनतेला चेंबर्लेनचें धोरण नापसंत नव्हतें असाच करावा लागेल. मजूर पक्षाच्या युद्धविरोधी

नेत्यांनीं ब्रिटनच्या शस्त्रास्त्रवाढीला सतत केलेला विरोध हा देखील विसरतां येत नाहीं. तरीदेखील चेंबर्लेन हा ब्रिटनमधील सत्ताधारी हुजूरपक्षांतील अत्यंत प्रतिगामी व परिस्थितिपराङ्मुख 'शहामृगी' वृत्तीच्या 'क्लिव्डेन' गटाचा खराखुरा प्रतिनिधि होता. वास्तववादी चर्चिलनें हिटलर व मुसोलिनीविरुद्ध अनेकदां धोक्याचे इषारे दिले होते. पण शरणागतीच्या धोरणामुळें युद्ध टाळतां येईल या भोळसट समजुतीच्या मागें लागून चेंबर्लेननें युरोपीय लोकशाहीची, ब्रिटिश जनतेची व स्वतःची वंचना केली. १९४० मध्यें फ्रान्समध्यें जर्मन चढाई सुरु होतांच चर्चिलच्या हातीं इंग्लंडचीं सूत्रें सोंपवण्याखेरीज चेंबर्लेनला गत्यंतर राहिलें नाहीं.

१९४० च्या मे महिन्यांत चर्चिलनें इंग्लंडचें नेतृत्व स्वीकारलें. वास्तववादी दृष्टीनें साऱ्या राजकारणाचा विचार, प्रचण्ड आत्मविश्वास, भावी काळाला भेदणारीं द्रष्टेपणाची देणगी, अमोघ वक्तृत्व, संकटराशि कोसळत असतांनाहि भावी यशाविषयीं वाटणारा चिवट व जबर आशावाद इत्यादि गुणांनीं युक्त असें चर्चिलचें असामान्य व्यक्तित्व आहे. डंकर्कच्या पराभवानंतर एकाकी ब्रिटनला जर्मन वावटळीपासून वांचविण्याचें जास्तींत जास्त श्रेय भावी इतिहासकार चर्चिलच्या अजोड नेतृत्वाला देतील. १९४१ सालीं जर्मनीनें रशियावर हल्ला करतांच रशियनद्वेष्ट्या चर्चिलनें ज्या तत्परतेनें साम्यवादी रशियाला मदतीची अनाहूत हमी दिली, ती त्याच्या वास्तववादी मुत्सद्देगिरीची द्योतक होती. पण सामर्थ्यसंपन्न अमेरिका युद्धांत पडल्याशिवाय जर्मनीचा पराभव करणें अशक्यप्राय आहे याची सर्वांत अधिक जाणीव चर्चिलला होती. जपाननें अमेरिकेविरुद्ध युद्ध पुकारून एक प्रकारें चर्चिलवर अतोनात उपकार केले. अमेरिका युद्धांत पडतांच चर्चिलचा आत्मविश्वास शतगुणित झाला व भावी यशाविषयीं निःशंकपणें प्रयत्न करणें त्याला शक्य झालें.

दुसऱ्या महायुद्धानंतर १९४५ च्या निवडणुकींत ब्रिटिश जनतेनें मजूरपक्षाला प्रचण्ड पाठिंबा देऊन चर्चिलचें युद्धकालीन लढाऊ नेतृत्व

शांततेची लढाई जिंकण्यासाठीं कुचकामी आहे असे दर्शविले. चर्चिलच्या आजवरच्या यशस्वी राजकीय आयुष्यांतील हा पहिला अनपेक्षित पराभव होता. पण सर्वसामान्य जनतेचें लक्ष युद्धकाळांतच राष्ट्राची पुनर्घटना समाजवादी तत्त्वावर करण्याच्या मार्गाकडे आकृष्ट झालें होतें. युद्धभूमीवर लढणाऱ्या लक्षावधि सैनिकांनीं हुजूर पक्षाच्या बुरसटलेल्या धोरणाचा पाठपुरावा करणें अशक्य होतें. उदारमतवादी पक्ष संपुष्टांत आला होता. या परिस्थितींत असामान्य कर्तृत्व, अमोघ वक्तृत्व अथवा प्रभावशाली व्यक्तिमत्व यांची देणगी नसलेल्या पण प्रामाणिक, निष्ठावान् व सर्वसामान्य जनतेच्या आकांक्षांशीं समरस होणाऱ्या ॲटलीचें नेतृत्व ब्रिटिश जनतेनें स्वीकारलें. युद्ध संपतांच ब्रिटनसारख्या पुराणप्रिय व साम्राज्यवादी राष्ट्रानें मजूरपक्षाच्या समाजवादी धोरणाचा केलेला स्वीकार हा अनेक दृष्टींनीं सूचक होता. युद्धकालीन सोव्हिएट रशियानें प्रगट केलेलें सामर्थ्य, तेथील जनतेचा कडवा प्रतिकार व साम्यवादी समाजव्यवस्थेचें नवें दर्शन यांमुळें समाजवादी विचारांची लाट जगभर पसरली. त्याचाच ब्रिटिश जननेवरहि परिणाम झाला. खिळखिळें झालेलें साम्राज्य, अविरत बॉंबहल्ल्यांमुळें नष्ट झालेले कारखाने आणि दुर्धर आर्थिक परिस्थिति यांमुळें राष्ट्राची पुनर्घटना करण्यास जुनें हुजूरपक्षीय नेतृत्व उपयोगी पडणार नाहीं असें ब्रिटीश जनतेला दिसून आलें.

हिटलर द्रष्टा होता कीं नाहीं याविषयीं एकमत होणें शक्य नाहीं. पण जर्मन चढाईपूर्वी हिटलरनें जर्मन सैनिकांना उद्देशून केलेल्या भाषणातील ब्रिटन व फ्रान्सविषयींचें त्याचें भविष्य बऱ्याच अंशीं सत्य ठरलें आहे. सागरसम्राज्ञी ब्रिटनचा नक्षा या युद्धानें पार उतरला. साऱ्या पृथ्वीवर पसरलेल्या साम्राज्याचें संरक्षण करण्यासाठीं ब्रिटनला अमेरिकेकडे तोंड वेंगाडावें लागलें. ब्रिटन हा युद्धकाळांत अमेरिकेचा एक सैन्यतळ बनला. युद्धाचें नेतृत्व अमेरिकेच्या हातीं गेलें. युद्धकाळांत स्वीकारलेली ही स्थिति युद्धोत्तर काळांत अधिकच मानहानिकारक झाली. ब्रिटिश

आर्थिक स्थैर्याचा डोलारा केव्हांच कोसळला, व अमेरिकेच्या कर्जावर दिवस कंठण्याची वेळ पहिल्या महायुद्धापर्यंत जगाचे धनको असलेल्या या मानधन राष्ट्रावर आली. पण एवढ्यानेंच इंग्लंडचें नष्टचर्य संपलें नाहीं. हिटलरनें भाकित केल्याप्रमाणें जागतिक सत्ताराजकारणांत ब्रिटनचें सारें महत्त्व नष्ट होऊन तें तिसऱ्या दर्जाचें एक आश्रित राष्ट्र बनलें. जगाच्या राजकारणांत आज न्यूयार्क व मास्को यांना असलेलें महत्त्व लंडनपेक्षां कितीतरी पटींनीं अधिक आहे. आंतरराष्ट्रीय परिस्थितीच्या दडपणाला नमूनच ब्रिटननें आपल्या पूर्वेकडील साम्राज्यावर उदक सोडण्याचें टरविलें. युरोपीय साम्राज्यवादी राष्ट्रांतील केवळ ब्रिटननेंच काळाचीं पावलें ओळखून हिंदुस्थान, पाकिस्तान, ब्रह्मदेश व सिलोन यांना स्वातंत्र्य देऊन, या नवोदित राष्ट्रांची कृतज्ञता, भावी व्यापाराची सुरक्षितता व राष्ट्रकुटुंबाचें स्थैर्य इत्यादि गोष्टी साधल्या. ब्रिटननें केलेल्या या धाडसी प्रयोगांत अनेक धोके होते. पण तें स्वीकारूनदेखील ब्रिटननें हें पाऊल टाकलें, आणि तें यशस्वी ठरलें. या धाडसी प्रयोगाचें सारें श्रेय मजूरपक्ष व ॲटली यांना द्यावें लागतें.

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत ब्रिटिश राष्ट्रकुटुंबाचें राजकारणांतील महत्त्व कमी होण्यासाठीं अनेक कारणें घडलीं. ब्रिटिश राष्ट्रकुटुंब घटनात्मक दृष्टीनें पाहतां एकात्म नाहीं. त्यांत अनेक प्रकारची भेसळ आहे. आर्थिक व भौगोलिक दृष्ट्यादेखील तें स्वयंपूर्ण आणि एकसंध नाहीं. युद्धाच्या दृष्टीनें विचार करतां लष्करी सामर्थ्याचें एकसूत्रीकरण व तदनुसार राष्ट्रकुटुंबाच्या निरनिराळ्या सदस्यांकडे कामाची विभागणी हा देखील प्रकार आढळून येत नाहीं. याचें एक कारण ब्रिटनची लष्करी दुर्बलता हें तर आहेच. पण त्याचबरोबर आधुनिक युद्धांच्या विश्वव्यापी व सर्वंकश स्वरूपामुळें ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, कॅनडा व कांहीं प्रमाणांत हिंदुस्थानादि देश यांनीं स्वसंरक्षणासाठीं ब्रिटनऐवजीं अमेरिकेकडे पहावें, हें स्वाभाविक आहे. दुसऱ्या महायुद्धाचा ताजा अनुभवदेखील असाच आहे. अमेरिकेच्या लष्करी सहाय्याखेरीज एकाकी व दुर्बल ब्रिटनला

प्रशान्त महासागरांतील या सर्व राष्ट्रांचें संरक्षण करणें कदापि शक्य झालें नसतें.

१९४५ सालीं सत्तारूढ झालेल्या मजूर पक्षानें ब्रिटिश लोकशाहीला अधिकाधिक लोकाभिमुख करण्याच्या दृष्टीनें समाजवादी कार्यक्रम हातीं घेतला. ब्रिटिश नभोवाणी, बँक ऑफ् इंग्लंड, कोळशाच्या खाणी, लोखंड आणि पोलादाचे कारखाने इत्यादींचें राष्ट्रीयीकरण करण्यांत आलें. तसेंच जनतेच्या आरोग्यासाठीं वैद्यकीय व्यवसायाचें एक प्रकारें राष्ट्रीयीकरण करून मजूर पक्षानें सर्वसामान्य ब्रिटिश नागरिकाला विनामूल्य वैद्यकीय मदतीची सोय करून दिली. मजूर पक्षाला अंतर्गत कारभारांत बरेंच यश मिळालें पण आंतरराष्ट्रीय राजकारणांत विशेषतः-मध्यपूर्वेंत-मजूरपक्षाचें धोरण यशस्वी झालें नाहीं. याचा परिणाम १९५० मध्यें झालेल्या सार्वत्रिक निवडणुकीवर होऊन मजूर पक्षाचें बहुमत कमी झालें. वर्षांच्या अवधींतच मजूर पक्षाला सार्वत्रिक निवडणुकी घेणें भाग पडलें. या निवडणुकींत हुजूरपक्षानें विजय मिळवला. पुन्हां एकदां ब्रिटनचें नेतृत्व चर्चिलनें स्वीकारलें. चर्चिलच्या नेतृत्वाखालीं ब्रिटन आपलें गेलेलें वैभव परत मिळवूं शकेल अशी अपेक्षा ब्रिटिश जनताच काय पण हुजूर पक्षदेखील करीत नाहीं. प्रत्येक राष्ट्राच्या जीवनांत येणारा वैभवाचा काळ कांहीं शतकें टिकला तरी तदनंतर त्या राष्ट्राला उतरती कळा लागते. व्यवहारी ब्रिटिश जनतेला या ऐतिहासिक सत्याचें विस्मरण झालेलें नाहीं. त्यामुळें आजच्या या पडत्या काळांतसुद्धां ब्रिटन मोठ्या कौशल्यानें व स्वाभाविक रीत्या नव्या परिस्थितीशीं जुळतें घेण्याचा प्रयत्न करीत आहे. अमेरिका व सोव्हिएट रशिया यांच्या प्रचण्ड सामर्थ्याची बरोबरी करणें आज ब्रिटनला अशक्य आहे. लोकसंख्या व साधनसामुग्री या दोन्ही बाबतींत ब्रिटन दुबळें आहे, आणि हें दौर्बल्य मानवी उपायांनी नष्ट होणारें नाहीं. वास्तविक पहातां ब्रिटनचें जागतिक राजकारणांतील सध्याचें स्थान त्या राष्ट्रानें अनेक शतकांच्या ऐतिहासिक विकासांत निर्माण केलेल्या लोकशाही मूल्यांवर

अवलंबून आहे. परमतसहिष्णुता, स्वातंत्र्याची अभिलाषा व सृजनशील लोकशाही या बाबतींत ब्रिटनचें अग्रेसरत्व कोणीहि नाकारूं शकत नाहीं. आणि त्यांतच ब्रिटनचें मोठेंपण सामावलेलें आहे.

## फ्रान्स

स्वातंत्र्य, समता व बंधुता यांचा उद्‌घोष करीत आलेल्या फ्रेंच राज्यक्रांतीनें युरोपला आधुनिक लोकशाहीचे पहिले धडे दिले, असें मानलें जातें. पण फ्रान्समध्यें मात्र लोकशाहीची वाढ ब्रिटनप्रमाणें अप्रतिहतपणें झाली नाहीं. फ्रेंच लोकशाहीच्या मार्गांत नेपोलियन बोनापार्ट, तिसरा नेपोलियन, प्रशियन चढाई, पहिलें व दुसरें महायुद्ध हे अडथळे सतत येत गेले. त्यामुळें फ्रेंच लोकशाहीला विकसित होण्यासाठीं सवडच सांपडली नाहीं. पहिल्या महायुद्धापूर्वींच्या राजकारणांत ब्रिटनचें सत्तेच्या समतोलनाचें तत्त्व होतें. तर फ्रेंचांचें सारें परराष्ट्रीय राजकारण बिस्मार्क-निर्मित जर्मनीला हतप्रभ करण्यासाठीं प्रयत्न करण्यांत सांठवलेलें होतें. इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांची एकजूट फ्रान्सनें जर्मनीविरुद्ध केली होती. फ्रान्स व जर्मनी यांच्या वैरपरंपरेला गेल्या दोन महायुद्धांत पुन्हां एकदां उजळा मिळाला. पण जर्मनीविषयीं द्वेष व त्या द्वेषापोटीं वैर यांच्या मुळाशीं असलेलें खरें कारण जर्मनीच्या वाढत्या लोकसंख्येविषयीं फ्रेंचाना साहजिकपणें वाटणाऱ्या भीतींत आहे. राष्ट्राचें सामर्थ्य विपुल साधनसामुग्रीप्रमाणेंच त्या साधनांचा शांततेच्या काळांत व त्यापेक्षांहि युद्धकाळांत उपयोग करणाऱ्या मानवी संपत्तीवर अवलंबून असतें. या दृष्टीनें पहातां विलासप्रिय फ्रान्सची लोकसंख्येच्या दृष्टीनें होणारी पुच्छ प्रगती व जर्मनीची सातत्यानें वाढणारी लोकसंख्या यामुळें युरोपचें नेतृत्व जर्मनी बळकावणार याविषयीं फ्रेंचांच्या मनांत कधींच संशय नव्हता. पहिल्या महायुद्धांत अमेरिकेच्या मदतीनें फ्रान्स व इंग्लंड या राष्ट्रांनीं जर्मनी व तिच्या दोस्तांचा पराभव केला. या पराभवामुळें फ्रेंच राष्ट्राचें

युरोपच्या नेतृत्वाचें स्वप्न प्रत्यक्षांत उतरलें. लष्करी दृष्ट्या जर्मनीला जमीनदोस्त करण्यांत आलें. ऑस्ट्रियन साम्राज्याचे अनेक तुकडे पाडण्यांत आले. फ्रेंच वर्चस्वाला अनुकूल असलेल्या झेकोस्लोव्हाकिया या नव्या राष्ट्राची पाचर जर्मनी व जर्मन भाषिक ऑस्ट्रिया यामध्यें मारून स्वयंनिर्णयाचें तत्त्व सोईस्कररीत्या विसरण्यांत आलें. जर्मनीवर अगणित सुवर्णखंडणीचा बोजा लादण्यांत आला. जर्मन वसाहती, इंग्लंड व फ्रान्स यांनीं बळकावल्या. इतकें झालें तरी फ्रेंच राष्ट्रवाद्यांच्या दृष्टीनें व्हर्सायचा तह हा सौम्य स्वरूपाचा होता. कारण अमेरिका, ब्रिटन व इतर लहान राष्ट्रें यांनीं त्या तहाला 'फ्रेंचतहाचें' स्वरूप येऊं दिलें नाहीं. फ्रेंचांची जर्मनीचा ऱ्हाईनलँड आंत बळकावण्याची मनीषा त्यांनीं हाणून पाडली. पण सर्व गोष्टींचा विचार करतां पहिल्या महायुद्धाच्या शेवटीं युरोपांतील सर्वांत बलिष्ठ राष्ट्र असेंच फ्रान्सचें वर्णन करावें लागेल. पराभूत जर्मनी निराश्रित व दीन अवस्थेंत होता. साम्यवादी क्रांतीमुळें सुरू झालेल्या यादवी युद्धानें रशिया क्षीण झाला होता. इटली हें युरोपीय राजकारणांतलें दुय्यम दर्जाचें प्यादें होतें. अशा स्थितींत फ्रेंचवर्चस्वाला साऱ्या युरोपमध्यें प्रतिरोध करणारी कोणतीच शक्ति अस्तित्वांत नव्हती.

युरोपचें नेतृत्व हातीं आलेल्या युद्धोत्तर फ्रान्सचें सारें परराष्ट्रीय राजकारण सुरक्षितता या एका बिंदूभोंवतीं घोटाळत असे. सुरक्षिततेचा फ्रेंचांचा अर्थ अगदीं सोपा होता. जर्मनीला राजकीय व लष्करी दृष्ट्या कायमचें खच्ची करणें, जर्मनीभोंवतीं व्हर्साय-निर्मित राष्ट्रांचें कडें उभें करणें व फ्रान्सचें लष्करी सामर्थ्य वाढवणें असें त्याचें त्रिविध स्वरूप होतें. युद्धोत्तर काळांत पहिल्या कांहीं वर्षांत फ्रान्सनें जर्मनींत दुही माजविण्याचा प्रयत्न केला. पण जर्मन राष्ट्रवादामुळें फ्रेंच प्रयत्न अयशस्वी ठरले. व्हर्सायच्या तहाच्या सर्व लष्करी व आर्थिक अटींचें तंतोतंत पालन जर्मनीकडून झालें पाहिजे असा अट्टाहास फ्रान्सनें केला. जर्मनीनें

नुकसानभरपाई चुकविली या सबबीवर फ्रेंच सैन्यानें १९२३ मध्यें रूहरप्रांत व्यापला हें वरील धोरणाचें एक प्रत्यंतर होतें.

रशियन राज्यक्रांतीमुळें फ्रान्सचा जर्मनविरोधी मुख्य आधार नष्ट झालेला असला तरी, जर्मनीला हतबल ठेवण्यांत ज्यांचा फायदा होता अशा बेल्जम, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, रुमानिया या लहान राष्ट्रांचे कडे जर्मनीच्याविरुद्ध उभारण्यांत फ्रान्सला यश आलें. जर्मनीविषयींच्या भीतीमुळें फ्रान्सनें निःशस्त्रीकरणाला हात राखून मान्यता दिली. फ्रान्सच्या संरक्षक न्यूनगंडानें पछाडलेल्या परराष्ट्रीय धोरणाचा युरोपीय राजकारणावर विचित्र परिणाम झाला. इंग्लंड व फ्रान्स या जुन्या दोस्त राष्ट्रांच्या परराष्ट्रीय धोरणांत निर्माण झालेल्या अंतर्विरोधामुळें लोकशाही राष्ट्रांची शक्ति कमी झाली. फ्रेंचांच्या आडमुठ्या धोरणामुळें जर्मन लोकशाहीचा अंत ओढवला आणि त्या लोकशाहीच्या चितेंतून हिटलर व नाझी जर्मनीचा भस्मासुर उत्पन्न झाला. हिटलरच्या आक्रमक राजकारणाला व जर्मनीच्या वाढत्या लष्करी सामर्थ्याला फ्रेंचांनीं आपल्या परंपरागत संरक्षक धोरणासाठीं तरी कडवा विरोध करावयास हवा होता. पण वस्तुस्थिति मात्र उलट होती. वाढत्या सामर्थ्याबरोबर जर्मनीचें धोरण अधिकाधिक आक्रमक होत गेलें. तर फ्रेंचांनीं सातत्यानें पडखाऊ धोरण स्वीकारलें.

हिटलरच्या उदयानंतरचें फ्रान्सचें राजकारण अत्यंत विलक्षण, गुंतागुंतीचें व भावी परिणामाच्या दृष्टीनें अत्यंत घातक स्वरूपाचें ठरलें. कोणत्याहि राष्ट्राचा उत्कर्ष अथवा विनाश हा त्या राष्ट्रांतील जनतेवर अधिकांश अवलंबून असतो. पहिल्या महायुद्धानंतर फ्रेंच जनतेचें नैतिक अधःपतन अतिशय वेगानें झालें. राष्ट्रांतील तरूणांचा बळी युद्धदेवतेला अर्पण केल्यानंतर फ्रान्समध्यें विवाहयोग्य तरुणांचा दुष्काळ पडला. त्याचा परिणाम अनिर्बंध वैषयिक जीवनांत आणि मोठ्या प्रमाणावर झालेल्या

वर्णसंकरांत घडला. आफ्रिकेंतील मोरोक्को व सेनेगाली सैनिकांच्या गळ्यांत फ्रान्सच्या सुंदर ललनांचे पाश पडले. विलासासाठीं फ्रेंचांची ख्याति प्रथमपासूनच जगभर होती. विलासप्रियता, वर्णसंकर, पहिल्या महायुद्धांत झालेला वंशक्षय, इतरांच्या कृपेनें लाभलेलें युरोपचें नेतृत्व व या सर्वांच्या जोडीला कठीण परिस्थितींत घातक ठरणारी अनेक पक्षीय लोकशाही यांचा एकत्रित परिणाम म्हणजे फ्रेंच वर्चस्वाचा दुःखद अंत होय. फ्रेंच लोकशाहींत इंग्लंड अमेरिकेपेक्षां अधिक पक्ष–गट शब्द योग्य ठरेल–असत. व या गटांचें परस्परांशीं सहकार्य अगर विरोध हा समानतत्त्वांपेक्षां स्वार्थावर अधिक अवलंबून असतो. इंग्लंड व अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण बऱ्याच अंशीं पक्षातीत असतें. पण राजकीय गटबाजीमुळें फ्रान्सचें परराष्ट्रीय धोरण नेहमीच चंचल व दुबळें ठरलें.

फ्रेंच मुत्सद्दी व लष्करी तज्ञांवर संरक्षक न्यूनगंडाचा इतका जबरदस्त पगडा बसला होता कीं त्याचा परिणाम मॅजिनो ही लष्करी संरक्षक तटबंदी जर्मनीच्या संभाव्य आक्रमणाच्या भीतीनें बांधण्यांत झाला. अब्जावधि फ्रॅन्क्सचा चुराडा त्यासाठीं करण्यांत आला. आक्रमक लष्करी सामर्थ्य वाढवण्याकडे लक्ष दिलें नाहीं. पण दुसऱ्या महायुद्धांत फ्रेंचांची ही अजिंक्य समजली जाणारी तटबंदी कुचकामाची ठरली. फ्रान्समध्यें डाव्या व उजव्या गटाच्या धोरणांत इतर कांहीं फरक असला तरी जर्मनी व इटलीच्या आक्रमक धोरणाला खंबीर विरोध करण्याऐवजीं मऊ, बोटचेपें धोरण त्यानीं स्वीकारलें. १९३६ नंतरच्या जनता आघाडीला ( Popular front ) देखील या दोषांतून वगळतां येत नाहीं. ब्लमच्या नेतृत्वाखालीं याच पक्षानें कम्युनिस्टांच्या दडपणाखालीं फ्रेंच कामगार-वर्गासाठीं ४० तासांचा आठवडा केला. त्यावेळीं हिटलरचें जर्मन कामगार ६० तास खपून जर्मनीला शस्त्रास्त्र–संपन्न बनविण्यांत गर्क झाले होते. यापेक्षांहि दुसरी महत्त्वाची घटना म्हणजे इटलीच्या ॲबिसीनीयावरील आक्रमणाला प्रभावी विरोध करण्याऐवजीं फ्रान्स, इंग्लंडच्या मदतीनें

ॲबिसीनीयाचें दान करून इटलीला संतुष्ट करण्यासाठीं धडपडत होता. १९३६ मध्यें स्पेनच्या प्रस्थापित सरकारविरुद्ध फ्रँकनें बंड उभारतांच जर्मनी व इटली यांनीं बंडखोराना यंत्रज्ञ, शस्त्रास्त्रें व पैसा यांचा भरपूर पुरवठा करण्यांत मागेंपुढें पाहिलें नाहीं. साम्यवादी रशियानें स्पेनच्या प्रस्थापित सरकारला मदत दिली. पण तथाकथित महान् लोकशाही राष्ट्रें मात्र स्पेनमधील लोकशाहीचा खून पडेपर्यंत तटस्थता समितीचा मानभावीपणा करण्यांत गुंग झाली होतीं. या त्यांच्या कृतीमुळें फॅसिस्ट राष्ट्रगटाचें सामर्थ्य सारखें वाढत होतें. पण या वस्तुस्थितीकडे त्यांचें दुर्लक्ष झालें. 'विनाशकाले विपरीतबुद्धिः' या पलीकडे आपल्या पायावर स्वतःच्याच हातानें धोंडा पाडून घेण्याच्या वृत्तीला काय म्हणतां येईल?

यानंतरच्या काळांत हिटलर व मुसोलिनीच्या तंत्रावर चालायचें याशिवाय फ्रेंच परराष्ट्रीय धोरणाला स्वतंत्र अस्तित्व राहिलें नाहीं. व्हर्सायच्या तहाच्या चिंधड्या करीत जर्मनीनें प्रथम सक्तीच्या लष्करी शिक्षणाचा कायदा १९३५ मध्यें केला. १९३६ मध्यें ऱ्हाईनलँडचें पुनर्लष्करीकरण केलें. १९३८ मध्यें ऑस्ट्रिया गिळला. तरीदेखील फ्रेंचांची काळझोप संपली नाहीं. पोलंडशीं केलेल्या दोस्तीचें पुनरुज्जीवन आणि सोव्हिएट रशिया व झेकोस्लोव्हाकिया यांच्याशीं केलेला परस्पर मदतीचा तह हे अपवाद वगळले तर शरणागतीचें धोरणच चालू राहिलें. जर्मनीच्या वाढत्या आक्रमक सामर्थ्याला योग्य वेळीं पायबंद न घातल्यामुळें फ्रान्सच्या जुन्या दोस्तांनीं आपली फ्रेंचांच्या दोस्तींतून सुटका करून घेतली. बेल्जियमनें १९३६ मध्यें फ्रान्सशीं असलेले लष्करी तह संपल्याची व स्वतःच्या संपूर्ण तटस्थतेची घोषणा केली. युगोस्लाव्हिया, रुमानिया, हंगेरी व बल्गेरिया या बाल्कन राष्ट्रांनीं जर्मनीचें वाढतें सामर्थ्य पाहून जर्मनीला अनुकुल असें धोरण स्वीकारलें. या राष्ट्रांना हवी असलेली कच्च्या मालासाठीं बाजारपेठ जर्मनीनें पुरविली. वरील सर्व घटनांचा अर्थ इटली व जर्मनी यांच्या कूटनीतीपुढें फ्रेंच परराष्ट्रीय खातें हतबल व निष्प्रभ ठरलें.

म्युनिच करार हा लोकशाही राष्ट्रांच्या शरणागतीचा परमोच्च बिंदु होय. चेंबलेनच्या शरणागतीच्या धोरणाला संपूर्णपणें मान तुकवून फ्रान्सनें स्वतःच्या अत्यंत विश्वासू मित्रराष्ट्राचा बळी, हिटलरला संतुष्ट राखण्यासाठीं दिला. पण म्युनिचमध्यें केवळ झेकोस्लोव्हकियाचाच खून पडला असें नसून फ्रान्सनें लक्षावधि प्राणांची आहुति देऊन पहिल्या महायुद्धांत मिळवलेला विजयदेखील नष्ट झाला. चर्चिलनें म्हटल्याप्रमाणें इंग्लंड व फ्रान्स यांना युद्ध वा मानहानि यांत मानहानि स्वीकारावीशी वाटली. पण त्यामुळें त्यांच्या नशिबांतील युद्ध मात्र टळणार नाहीं. चर्चिलची ही भविष्यवाणी केवळ आठ महिन्यांतच खरी ठरली. हिटलरच्या पोलंडवरील हल्ल्यानें दुसऱ्या महायुद्धाला सुरुवात झाली. तरीहि फ्रान्सचे लावल व बॉनेसारखे स्वार्थांध व राष्ट्रघातकी नेते पोलंडचा झेकोस्लोव्हाकिया करून हिटलरला खूष करतां येतें कीं काय या प्रयत्नांत मश्गूल होते. पण त्यांच्या प्रयत्नांना यश आलें नाहीं. ३ सप्टेंबर, १९३९ रोजीं ब्रिटननें जर्मनीविरुद्ध युद्धपुकारलें. आणि फ्रान्सला युद्धघोषणा करण्याखेरीज गत्यंतर उरलें नाहीं. किंकर्तव्यमूढ व ध्येयशून्य नेते, गोंधळलेली व बावरलेली आणि परस्पर अविश्वास, द्वेष, स्वार्थ यांनीं शतशः भंगलेली फ्रेंच जनता, संरक्षणाच्या वेडानें पछाडलेलें सैन्य, आणि अपुरी युद्धसामुग्री या साधनांसहित फ्रेंच लोकशाही सर्वंकष युद्धाच्या खाईंत उतरली. या सर्वांचा परिणाम १० मे, १९४० रोजीं यंत्रचलित जर्मन सेनेनें सेडन येथें फ्रेंचांची फळी फोडतांच अवघ्या महिनाभरांत फ्रान्सचें पतन झालें. २२ जून, १९४० रोजीं मार्शल पेतॉनें फ्रेंच राष्ट्रप्रमुख या नात्यानें युद्धतहकुबीवर सही केली, व 'व्हिशी राजवट' जन्माला आली. आजवरच्या हाडवैऱ्याला मित्र समजून स्वतःच्या मित्रांचा विश्वासघात करून मदत करण्याचें कार्य व्हिशी राजवटीनें केलें. या एकाच गोष्टीवरून फ्रान्सचें राजकीय जीवन युद्धपूर्व काळांतच किती किडलेलें होतें याची कल्पना येऊं शकते. पण व्हिशी म्हणजे सर्व फ्रान्स नव्हे याची कल्पना जर्मन सत्ताधाऱ्याना होती. इंग्लंड-

मध्यें असलेला फ्रेंच सेनानी दगॉल, त्यासारखे असलेले अनेक अज्ञात राष्ट्रभक्त यांनीं युद्धकाळांत राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं जे सतत प्रयत्न केले त्यामुळें व्हिशीचा कलंक थोड्या प्रमाणांत कां होईना पुसला गेला. फ्रान्सला मुक्त करण्याच्या या प्रयत्नांत देखील अंतर्गत यादवीचें चित्र उमटलें होतें. विजयी अँग्लोअमेरिकन सेनेबरोबर दगॉलनें फ्रान्सच्या भूमीवर पुनः एकदा पाय ठेवला. त्यावेळेपासूनच ही दुही उत्तरोत्तर वाढत गेली. युद्धोत्तर काळांत फ्रान्स युद्धपूर्वकाळापेक्षांहि अधिक खंडित व विस्कळित झाला.

युद्धोत्तर फ्रान्स हें एके काळीं महान् असलेल्या फ्रेंच राष्ट्राचें भूत आहे. आजदेखील फ्रान्सचा उल्लेख जगांतील मोठ्या राष्ट्रांत करण्यांत येतो. पण ती वस्तुस्थिति नसून तिचा केवळ आभास आहे. रणभूमी बनल्यामुळें फ्रान्सचें अतोनात आर्थिक नुकसान झालें. त्यांत नाझी फौजांच्या चार वर्षें सोसलेल्या खर्चाची भर पडली. सामाजिक स्थैर्याचा आधार असलेला मध्यमवर्ग नष्ट झाला. फ्रान्सच्या नेत्यांना अमेरिकेत जाऊन भिकेसाठीं झोळी पसरावी लागली आणि या दुर्धर अवस्थेंतच फ्रान्सच्या चौथ्या गणराज्याचा जन्म झाला. फ्रान्सच्या इतिहासांत मंत्रिमंडळाचें अल्पायुष्य हें कांहीं नाविन्य नाहीं. कारण सर्वसाधारण फ्रेंच मंत्रिमंडळाचें आयुष्य अधिक तर आठ महिन्याचें असतें, असा गेल्या सत्तर वर्षांचा अनुभव सांगतो. युद्धोत्तर काळांतील प्रचण्ड अडचणींतून मार्ग काढून राष्ट्राचें पुनरुज्जीवन करण्यासाटीं विधिमंडळांत हुकमी बहुमत असलेल्या सुसंघटित पक्षाच्या हातीं राष्ट्राचें नेतृत्व राहणें अत्यंत आवश्यक असतें. पण फ्रान्सच्या राजकीय जीवनांत अस्तित्वांत असलेले अंतर्विरोध इतके प्रबळ व इतक्या प्रमाणांत आहेत कीं अशातऱ्हेचा सुसंघटित पक्ष व त्याचें स्थिर मंत्रिमंडळ निर्माण होणें संभवनीय नाहीं. आज फ्रान्समध्यें दगॉलचा मास्कोविरोधी आर्. पी. पी. पक्ष, मास्कोप्रेरित कम्युनिस्ट पक्ष, भूमिगत चळवळयांचा एम्. आर्. पी. पक्ष, कॅथॉलिक पक्ष सोशॅलिस्ट आणि रॅडिकल सोशॅलिस्ट पक्ष इतक्या पक्षोपपक्षांची

गर्दी झाली आहे. अशा स्थितींत फ्रान्समध्यें स्थिर लोकशाही निर्माण होण्याचा संभव फार कमी आहे. याद्दष्टीनें १९४६ ते ५२ या अवधींत फ्रान्समध्यें १८ वेळां मंत्रिमंडळे कोलमडून पडली हा इतिहास बोलका आहे.

आंतरराष्ट्रीय राजकारणांतील फ्रान्सच्या स्थानाचा विचार करतां त्या राष्ट्राच्या अंतर्गत राजकारणांतील डाव्या व उजव्या गटाच्या राजकीय द्वेषाग्नींत फ्रान्सचें भवितव्य केव्हां होरपळून निवेल हें सांगणें कठीण आहे. मॉस्को व वॉशिंगटन यामधील सत्तेचा तराजू युद्धाऐवजीं शांततेकडे झुकवण्यासाठीं फ्रान्सचा एक स्वतंत्र सबल लोकशाही या नात्यानें उपयोग होण्याचा संभव फार कमी. उलट पक्षीं फ्रान्समध्यें कम्युनिस्ट क्रांति झाल्यास अमेरिका-निर्मित पश्चिम युरोपच्या अटलांटिक युनियनची इतिश्री होईल. फ्रान्समध्यें एका बाजूस कम्युनिस्टांचें बळ वाढत आहे. तर दुसऱ्या बाजूस द गॉलच्या नेतृत्वाखालीं फ्रान्समधील कम्युस्टविरोधी शक्तींची एकजूट होत आहे. या दोघांच्या झगड्यांत फ्रान्सची लोकशाही कशी टिकून रहावयाची हा मोठाच अवघड प्रश्न आहे. आज फ्रान्स, ब्रिटन या जागतिक राजकारणांत कालपर्यंत प्रथम दर्जाच्या ठरलेल्या राष्ट्रांचें भवितव्य, त्या राष्ट्रांतील जनतेच्या अगर त्यांच्या नेत्यांच्या हातीं नसून मॉस्को व वॉशिंगटनमधील जागतिक परिस्थिति व राजकीय ध्येयांचे गुलाम बनलेल्या आणि विसाव्या शतकाच्या गतिमानतेला आवरूं न शकणाऱ्या कांहीं मूठभर लोकांच्या हातीं आहे.

## अमेरिका

### संयुक्त संस्थानें.

२० व्या शतकांतील अत्यंत प्रबळ, अति संपन्न, प्रचण्ड उत्पादन शक्ति असलेलें, वैज्ञानिक प्रगतींत अग्रेसर व साधनसामुग्रीनीं विपुल म्हणून आज जग संयुक्त संस्थानांना ओळखत आहे. १७७६ सालीं ब्रिटिशांशीं

झगडून आपलें स्वातंत्र्य मिळविणाऱ्या तेरा वसाहतींचें भावी स्वरूप इतकें प्रचंड वैभवशाली होईल याची कल्पना कोणालाहि नव्हती. १९ व्या शतकांत युरोपमधील राष्ट्रें, आपसांतील युद्धें व आशिया आफ्रिका यांतील भूप्रदेश काबीज करण्यांत गुंग झालीं होतीं. त्यावेळीं प्रशान्त महासागरांतील हें नवोदित राष्ट्र विशेष गाजावाजा न करतां भावी वैभवाचा मार्ग आक्रमण करीत होतें. १८६१ सालीं झालेल्या यादवी युद्धांतून तावून सुलाखून निघालेलें अमेरिकन राष्ट्र हें पूर्वींपेक्षां अधिक बलिष्ठ व अधिक संघटित झालें. नव्या जगाची प्रतिनिधि असलेली अमेरिका ही अनेक विरोधाभासाचें अत्यंत चमत्कृतिपूर्ण मिश्रण आहे. उच्चतम व्यक्तिस्वातंत्र्य व अत्यंत हीन नीग्रोद्वेष, राजकीय लोकशाही व आर्थिक मिरासदारी (oligarchy), इंद्राला लाजविणारें औदार्य, व चोरांचे बादशहा (robber barons), सामाजिक सहकार्य व राक्षसी लोभ, कुत्र्यामांजरांसाठी टोलेजंग दवाखाने व निग्रोंना जिवंत जाळण्यासाठीं द्वेषानें वेडे झालेले गोरे अमेरिकन—वरीलप्रमाणें अमेरिकेतील विरोधाभासाची यादी ही जितकी मोठी तशीच विचारी माणसास गोंधळांत टाकणारी आहे. अमेरिकेचें हें विविध, वैचित्र्यपूर्ण व अनेकदां बुद्धीला अनाकलनीय ठरणारें स्वरूप उत्पन्न होण्यास, त्या राष्ट्राचा इतिहास कारणीभूत आहे. १८ व्या व १९ व्या शतकांत, साऱ्या युरोपांतील परस्परविरोधी मतांचें, प्रवृत्तींचे लक्षावधि युरोपीय निर्वासित (emigrants) हे आपल्या साऱ्या पूर्वग्रहांना घेऊन अमेरिकेंत आले. अनेक भाषा, अनेक पंथ, अनेक राजकीय गट यांच्या परिस्थित्य-नुरुप घडलेल्या मिश्रणांतून अमेरिकन राष्ट्राचा जन्म झाला आहे.

१९ व्या शतकांत अमेरिकेच्या साऱ्या धोरणाचें सार खालील तीन गोष्टींत सामावलेलें होतें. अमेरिकेनें युरोपशीं व्यापार करावा पण युरोपांतर्गत राजकीय भानगडीपासून पूर्णपणें अलिप्त रहावें; युरोपियन राष्ट्रांशीं अमेरिकेनें व्यापार करावा, पण अमेरिकेच्या अंतर्गत राजकारणांत कसलाहि हस्तक्षेप करूं नये; अमेरिकन व युरोपियन राष्ट्रांनीं आशियायी

राष्ट्रांशीं व्यापार करावा, पण त्या राष्ट्रांच्या भानगडींत दोघांनींहि पडूं नये. मन्रोप्रणीत या तीन तत्वांचा अंगिकार अमेरिकेनें १९ व्या शतकांत केला. १९१४ पर्यंत त्या तत्त्वांची अंमलबजावणी अमेरिकेनें कसोशीनें केली. पण २० व्या शतकांत या तत्त्वानुसार राजकारण चालविणें अशक्यप्राय ठरलें. कारण वैज्ञानिक प्रगतीमुळें साऱ्या जगाचें स्वरूप इतकें लहान झालें आहे व राष्ट्राराष्ट्रांचें संबंध इतक्या निकट स्वरूपाचे आहेत किं कोणत्याहि राष्ट्रानें अलिप्तता धोरणास कितीहि चिकटून राहावयाचें म्हटलें तरी तें अशक्य आहे. इतकेंच नव्हे तर, जागतिक परिस्थिति, अमेरिकेचें वाढतें सामर्थ्य व युरोप व आशिया यांच्या राजकारणांत नाखुषीनें कां होईना अमेरिकेला घ्यावा लागलेला भाग, यामुळें जगाचें नेतृत्व करण्याची जबाबदारी अमेरिकेच्या शिरावर २० व्या शतकांत पडली.

अमेरिकेच्या तटस्थतेचा पहिला भंग पहिल्या महायुद्धांत झाला. त्यापूर्वी अमेरिकन जनता तटस्थतेच्या व स्वास्थ्याच्या स्वप्नांत रमली होती. हें स्वप्न १९१४ पर्यंत टिकण्याचें कारण सागरसाम्राज्ञी ब्रिटनचें अटलांटिक-मधील अजिंक्य आरमारी वर्चस्व, युरोपमधील सत्तेचा समतोलपणा, व कोणाहि एका अगर अधिक युरोपीय व आशियायी राष्ट्रांची अमेरिका जिंकण्याची पूर्ण असमर्थता. ब्रिटिश साम्राज्यवादाचा धोका अमेरिकेला कधींच वाटला नाहीं. कारण ब्रिटिश भांडवलशाहीची इच्छा, अमेरिकेच्या सहकार्यानें साऱ्या जगाचा व्यापार आपल्या हातीं ठेवण्याची होती. युरोपांतील सत्तेचा समतोलपणा राखण्यासाठीं अमेरिकेला कांहींच कष्ट पडत नव्हते. त्याचा सर्व भार ब्रिटनच्या माथीं होता आणि ब्रिटननें ती जबाबदारी १९ व्या शतकांत उत्कृष्टपणें पार पाडली. २० व्या शतकांतील पहिल्या दशकांत सत्तेचा समतोलपणा कायम राहणें दिवसानुदिवस बिकट होऊं लागलें. कारण, नवोदित जर्मन राष्ट्रानें, १८७० मध्यें, फ्रेंचांची कंबर मोडल्यानंतर बिस्मार्कच्या प्रभावी नेतृत्वाखालीं युरोपच्या राजकारणांतील आपलें स्थान खूपच बळकट केलें. जोंपर्यंत ब्रिटिश राष्ट्र,

युरोपांतील कोणत्याहि एका राष्ट्राला इतरांपेक्षां अधिक बलिष्ठ होऊं न देण्यांत यशस्वी ठरलें, तोंपर्यंतच अमेरिकेची तटस्थता व जगाची शांतता त्या काळांत टिकून राहिली.

पहिलें महायुद्ध सुरू होतांच अमेरिकेनें आपली तटस्थता जाहीर केली व दोन्ही युद्धयमान राष्ट्रगटांना दारूगोळा व युद्धोपयोगी सामान पुरवून स्वतःची तुंबडी भरण्याचा उद्योग सुरू केला. पण युद्धयमान राष्ट्रांच्या परस्परांना नामोहरम करण्याच्या प्रयत्नांत जर्मन पाणबोटींनीं अमेरिकन गलबतें बुडविण्याचा सपाटा सुरू केला. अमेरिकन मालमत्ता व अमेरिकन नागरिकांचें जीवित धोक्यांत येतांच तटस्थतावादी अमेरिकन जनतेनें युद्धाच्या बाजूनें कौल दिला. १९१७ सालीं फ्रान्सच्या रणांगणावर उतरलेल्या ताज्या दमाच्या अमेरिकन पलटणी, हें दोस्तांच्या अंतिम विजयाचें प्रमुख कारण होतें. अमेरिकेच्या प्रचण्ड साधन सामुग्रीच्या ओघापुढें ३–३॥ वर्षें लढत असलेल्या जर्मनी व इतरांचा टिकाव लागणें अशक्यच होतें. रशियन राज्यक्रांतीमुळें जरी जर्मन फौजा पूर्व रणांगणावरून पश्चिम आघाडीकडे आल्या, व त्याच प्रमाणांत दोस्तांच्या बाजूला रशियाचें बळ कमी पडलें, तरीदेखील अमेरिकेची लष्करी, आर्थिक व आरमारी मदत मिळतांच विजयाचें पारडें दोस्तराष्ट्रांकडेच झुकलें. विल्सनच्या ध्येयवादानें राष्ट्रसंघाची निर्मिति केली, तर कुटिल क्लेमेन्सोच्या जर्मनविरोधी व स्वार्थी धोरणाचा परिपाक व्हर्सायचा तह अत्यंत अपमानकारक व निर्दय करण्यांत झाला. लॉईड जॉर्ज व क्लेमेन्सो यांच्या जाळयांत ध्येयवादी विल्सन सांपडला. विल्सनच्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा सोईस्कर अर्थ लावून त्यांनीं जर्मनीभोंवतीं लहान राष्ट्रांचें एक कडें उभें केलें. विश्वस्तांच्या भूमिकेचा फसवा आव आणून पूर्वीच्या जर्मन साम्राज्याचे लचके त्यांनीं तोडले. दोस्त राष्ट्रांनीं युद्ध जिंकलें, पण शांतता गमाविली. शांततेची लढाई हरण्याचें सर्वांत अधिक श्रेय अमेरिकेला जातें. कारण १९२० सालीं अमेरिका जगांतील सर्वांत बलाढ्य अतिसंपन्न

राष्ट्र होतें. अमेरिकेनें राष्ट्रसंघांत भाग घेण्याचें नाकारून केवळ राष्ट्रसंघाचाच मुडदा पाडला असें नसून जागतिक शांततेचाच बळीं घेतला. ध्येयवादी विल्सनच्या साऱ्या प्रयत्नांवर बोळा फिरवण्याचें कुटिल प्रयत्न जितके इंग्रज व फ्रेंच मुत्सद्यांनीं केले, तितकेंच किंबहुना त्याहून अधिक अमेरिकन अलिप्ततावाद्यांनीं केले.

१९२० ते १९३२ या १२ वर्षांत अमेरिकेंतील रिपब्लिकन पक्षानें निःशस्त्रीकरण व आंतरराष्ट्रीय सहकार्य यांच्या साह्यानें जागतिक शांतता प्रस्थापित करण्यासाठीं थोडेफार प्रयत्न केले. १९२१ मध्यें अमेरिकेनें ब्रिटनशीं आरमारी समतेचा ( Naval Parity ) तह केला. तर प्रशांत महासागरांत आपलें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याचा आग्रह सोडून अमेरिकेनें जपानला, शाटुंग व सैबेरियामधून मागें पाय घ्यावयास लावला, व खुल्या व्यापाराचें तत्त्व पुन्हां प्रस्थापित केलें. १९२८ मध्यें 'केलॉग पॅक्ट' करून युद्ध समाजबाह्य ठरविण्यासाठीं खटपट केली. याचप्रमाणें आरमारी परिषद व निःशस्त्रीकरण परिषद यांमध्येंहि भाग घेतला. मांचुरिया, प्रकरणीं राष्ट्रसंघाला साह्य दिलें. पण 'बुन्दसे गयी सो हौदसे नहिं आती' या उक्तिप्रमाणें राष्ट्रसंघांत भाग न घेऊन अमेरिकेनें बळी दिलेल्या जागतिक शांततेला टिकाऊ करण्याचे प्रयत्न यशस्वी ठरले नाहींत.

१९३२ मध्यें सतत १२ वर्षें चालू असलेल्या रिपब्लिकन राजवट संपून मोडकळीस आलेल्या अमेरिकन भांडवलशाहीला सांवरून धरण्याची जबाबदारी रूझवेल्टवर पडली. १९२९ मध्यें सुरू झालेल्या जागतिक मंदीच्या झंझावातांत अमेरिकन भांडवलशाही अगदीं खिळखिळी झाली होती, आणि रिपब्लिकन नेत्यांच्याजवळ, असल्या प्रसंगांतून पार पाडण्यास आवश्यक अशी कल्पनाशक्ति व धडाडी या दोन्हींचा अभाव होता. 'नवी योजना' ( New Deal ) मांडण्याची धडाडी अपंग रूझवेल्टनें दाखवली. स्वतःच्या शारीरिक दुर्बलतेवर त्यानें ज्या चिकाटीनें व मनोनिग्रहानें विजय मिळविला

होता, त्याच चिकाटीनें व मनोनिग्रहानें, अमेरिकेला मंदीच्या खोल गर्तेतून ओढून काढण्यासाठीं सारी शक्ति एकवटली. भांडवलशाही देशाला अपरिचित असा 'नवा डाव' मांडून रूझवेल्टनें सरकारी सहाय्यानें कच्च्या मालाच्या किंमतींची घसरगुंडी थांबवली. T. V. A. सारखी प्रचण्ड प्रमाणावर धरणें सुरुं करून बेकारी कमी केली. आयात जकाती वाढवून देशांतील पक्क्या मालाला उठाव मिळेल याची दखल घेतली. पण जागतिक राजकारणांत अमेरिकेचें धोरण फारसें बदललें नाहीं. कारण अलिप्ततावादी मताचा पगडा अमेरिकन लोकमतावर अजूनहि भरपूर होता. १९३४ मध्यें आंतरराष्ट्रीय मजूरसंघटनेत अमेरिकेनें भाग घेतला; पण आंतर-राष्ट्रीय न्यायालयाचें सभासदत्व मात्र अमेरिकन सिनेटनें धुडकावून लावलें.

निःशस्त्रीकरण परिषदेच्या बोजवाऱ्यानंतर अमेरिकेनें आपलें युद्धसामार्थ्य वाढविण्यास सुरुवात केली. १९३६ नंतर युद्धसामर्थ्यवृद्धीकरितां खर्ची पडलेले आंकडे भराभर वाढून आरमारी, हवाई व भूसैन्याची वाढ होऊं लागली. दक्षिण अमेरिकन संस्थानाना संयुक्तसंस्थानाविषयीं नेहमींच भीति वाटत असे त्या दृष्टीनेंदेखील रूझवेल्ट राजवटीनें नवे प्रयत्न केले. आंतर अमेरिका परिषद ब्यूनॉस आयर्समध्यें १९३६ मध्यें भरविण्यांत आली, व शांततेच्या रक्षणार्थ काय करावें याचा खल झाला. पण दक्षिण अमेरिकेच्या एकजुटीचीं स्वप्नें प्रत्यक्षांत साकार झालीं नाहींत. कारण दक्षिण अमेरिकेंत इटली व जर्मनीच्या हस्तकांचा सुळसुळाट झाला होता. अर्जेंटिनासारख्या राष्ट्रांत इटालियन संख्या भरपूर होती. परिणामत: लिमा परिषदेनें सूक्त विचारविनिमयाच्या इतकीच एकजुटीच्या कल्पनेला मान्यता दिली.

युरोपीय युद्ध सुरूं होतांच दक्षिण अमेरिकेंत अक्ष राष्ट्रांनीं आपले हातपाय पसरूं नयेत, व युद्धाच्या ज्वाला अमेरिका खंडाला लागूं नयेत यासाठीं संयुक्त संस्थानांच्या मुत्सद्यांची धावपळ सुरूं झाली.

पण जर्मनीच्या विद्युत्वेगानें झालेल्या विजयामुळेंच सर्व अमेरिकन राष्ट्रें हादरलीं; व त्यांनीं अमेरिकेच्या क्षेत्रांतील प्रदेशाविषयीं होणारा सार्वभौमत्वाचा कसलाहि बदल न स्वीकारण्याचें धोरण ठरविलें. संयुक्त संस्थानांचें नेतृत्व स्वीकारून अमेरिकेपासून चार हात दूर असा इषारा अक्षराष्ट्रांना दिला.

रूझवेल्टच्या १२ वर्षांच्या कारकीर्दींत प्रथमार्धांत अमेरिकन जनतेचें मत "आपलें काम बरें कीं आपण बरें, दुसऱ्याच्या भानगडींत पडावयाचें नाहीं, व ज्यामुळें पडावें लागेल तें कामच हातीं घ्यावयाचें नाहीं" असें अलिप्ततावादी होतें. युरोपीय युद्ध सुरू होतांच रूझवेल्टनें अमेरिकन कॉंग्रेसच्या द्वारां, रोखीच्या व्यवहाराचें तत्त्व युद्धमान राष्ट्रांना लागू केलें. अमेरिकेची सहानुभूति अर्थात्च लोकशाही राष्ट्रांकडे होती. परंतु युद्धांत पडावयाचें नाहीं या जनतेच्या अत्यंत आग्रही मतामुळें त्या सहानुभूतीचें रूपांतर प्रत्यक्षांत करण्यासाठीं रूझवेल्टला 'आस्ते कदम' जावें लागलें. रोखीच्या व्यवहाराच्या पुढील पायरी म्हणजे 'उधार उसनवार' कायदा होय. याचा उपयोग अर्थात्च सागरावर स्वामित्व असलेल्या ब्रिटनलाच होऊ शकत होता. फ्रान्सच्या पाडावानंतर एकाकी ब्रिटनविषयीं अमेरिकेंतील जनमत अधिकाधिक अनुकूल होऊं लागलें. आणि त्याचाच परिणाम म्हणजे अमेरिका, लोकशाहीचें 'युद्धसाहित्यभांडार' बनली. रशिया युद्धांत पडल्यानंतर अमेरिकेनें ब्रिटनप्रमाणेंच रशियालादेखील युद्धसाहित्याची भरपूर मदत केली. हें सर्व असूनसुद्धां अमेरिका आपल्याला 'तटस्थ' समजून या जागतिक युद्धापासून अलिप्त राहण्याची खटपट करीत होती. पण जपाननें केलेल्या विश्वासघातकी हल्ल्यामुळें अमेरिकेला हिरिरीनें युद्धांत पडल्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं.

अमेरिकेच्या युद्धपदार्पणामुळें साऱ्या युद्धाचा रागरंग पालटला अमेरिकेच्या युद्धसाहित्याच्या अखण्ड ओघामुळेंच हें युद्ध जिंकणें शक्य

झालें. युरोपांतील युद्धयमान राष्ट्रापेक्षां वरच्या दर्जाचें विज्ञानतंत्र, भौगोलिक सुरक्षितता, प्रचण्ड साधनसामुग्री व रूझवेल्टचें प्रभावी नेतृत्व यांमुळें अमेरिका सर्व बाजूंनीं सरस ठरली. रूझवेल्टच्या मुत्सद्देगिरीमुळेंच चर्चिल व स्टॅलिनसारख्या अत्यंत परस्परविरोधी राष्ट्रनेत्यांना एकत्र येऊन युद्ध जिंकणें शक्य झालें. पण युद्धाचा शेवट पाहण्याचें भाग्य त्याला लाभलें नाहीं. १३ एप्रिल, १९४५ रोजीं रूझवेल्टचा आकस्मिकरीत्या अंत झाला. जगाच्या इतिहासांत रूझवेल्टचें नांव अनेक दृष्टींनीं चिरस्मरणीय ठरेल. अमेरिकेच्या इतिहासांत रूझवेल्टच्या कर्तृत्वाला तोड नाहीं. १९३२ सालीं अमेरिकन राजकारणाची धुरा, अत्यंत बिकट परिस्थितींत अंगावर घेऊन यशस्वी रीत्या पार पाडण्याचें धैर्य त्यानें दाखवलें. १९३६ सालीं त्याची दुसऱ्या वेळीं झालेली निवड, अमेरिकन जनतेच्या त्याच्यावर असलेल्या प्रचण्ड विश्वासाची निदर्शक होती. अमेरिकेच्या इतिहासांत, तिसऱ्या वेळीं अध्यक्षपदीं उभें राहण्याचें 'पाप' आजवर कोणीं केलें नव्हतें. पण १९४० सालीं रूझवेल्टनें आजवरची प्रथा मोडून जनतेच्या त्याच्यावरील विश्वासाची कसोटीच पाहिली. पण त्या कसोटीस अमेरिकन जनता पूर्णपणें उतरली. रूझवेल्टच्या प्रतिस्पर्ध्यांचा प्रचण्ड पराभव झाला. पण याहिपेक्षां वरच्या दर्जाचें यश १९४४ सालीं चौथ्या वेळीं उभें राहून रूझवेल्टनें मिळवलें. १९३२ ते १९४५ या तेरा वर्षांच्या अत्यंत बिकट परिस्थितींत त्यानें अतिशय कार्यकुशलतेनें अमेरिकन राष्ट्रनौका हांकारली. चुकीच्या अलिप्ततावादी धोरणाला कायमची मूठमाती दिली. अमेरिकेच्या कर्तृत्वसीमा २० व्या शतकांत प्रशांत महासागरांत नसून त्या युरोप व आशियांत पसरल्या आहेत याची जाणीव जनतेला करून दिली. इतरांच्या रक्षणासाठीं नव्हे, तर अमेरिकन लोकशाहीला जिवंत ठेवण्यासाठीं यापुढें अमेरिकेला जागतिक राजकारणांत कायमचें पडणें भाग आहे. त्या दृष्टीनें पाहतां रूझवेल्टच्या प्रयत्नांनीं अमेरिकेला जागतिक राजकारणांत अग्रपूजेचा मान मिळाला.

१९४५ त झालेल्या रूझवेल्टच्या मृत्यूनें, अमेरिकेच्या उदारमतवादी धोरणास निराळी दिशा मिळाली. रूझवेल्टच्या व्यक्तित्वाच्या पार्श्वभूमीवर ट्रुमनचें व्यक्तित्व अगदीच फिकें पडतें. १९४४ च्या निवडणुकींत, प्रगतिशील वॅलेसला बाजूस सारून अमेरिकन भांडवलवाल्यांनीं केलेली ट्रुमनची उपाध्यक्षपदीं निवड ही पुढील धोरणाची जणूं नांदी होती. १९४५ ते ५१ या ट्रुमन राजवटींत अमेरिकन पुंजीपति व लष्करी अधिकारी यांचें महत्त्व अवास्तव वाढीस लागलें. अमेरिकन लोकशाहींतील बहुतेक सर्व मोक्याच्या जागा त्यांनीं अडविल्या. अर्थात्‌च त्याचा परिणाम अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणावर होणें क्रमप्राप्त होतें. रशियाशीं युद्धकाळीं जोडलेली मैत्री या व त्या धोरणांमुळें संपूर्ण नष्ट झाली इतकेंच नव्हे तर मार्शल योजना व इतर अमेरिकन खटपटीमुळें 'शीतयुद्धाला' प्रारंभ झाला.

राष्ट्रसंघाच्या निर्मितीप्रमाणेंच या युद्धाच्या शेवटीं संयुक्त राष्ट्रसंघटना घडविण्यांत अमेरिकेनें फार मोठा पुढाकार घेतला. संयुक्त राष्ट्रसंघाची सनद २५ जून, १९४५ रोजीं सॅनफ्रान्सिस्को येथें लिहिली गेली. संघटनेचें मुख्य कार्यालयदेखील अमेरिकेंत ठेवण्यांत आलें. या गोष्टीवरूनच अमेरिकेनें आपल्या पूर्वीच्या अलिप्ततावादी धोरणाचा त्याग निश्चितपणें केला हें सिद्ध होतें.

पहिल्या महायुद्धानें अमेरिकेला नव्या २१००० लक्षाधीशांची देणगी दिली होती असें म्हणतात. सर्वसामान्य अमेरिकन जनतेला पहिलें महायुद्ध म्हणजे एक पर्वणीच वाटली. संपत्ति, भरभराट, जागतिक महत्त्व यांची ती नांदी ठरली. जागतिक मंदीमुळें अमेरिकेच्या भरभराटीला व ऐश्वर्याला धक्का बसला तरी दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच अमेरिकेनें स्वतःस सांवरलें होतें. त्यामुळें दुसरें युद्ध सुरू होतांच, पूर्वीप्रमाणेंच, ही एक संपत्ति मिळविण्याची सुवर्णसंधि आहे असें अमेरिकेला वाटणें साहजिक होतें. युद्धसाहित्याच्या प्रचंड निर्मितीबरोबरच अमेरिकेच्या

औद्योगिक उत्पादनाची कार्यक्षमता व विस्तार अनेक पटींनीं वाढला. प्रत्यक्ष रणक्षेत्रापासून हजारों मैल दूर असल्यानें अमेरिकन उद्योगपतींना आपल्या कारखान्यांची वाढ निर्वेधपणें करतां आली. आज साऱ्या जगांत अमेरिकेएवढें प्रचंड उत्पादन करण्याचें सामर्थ्य कोणत्याहि राष्ट्राजवळ नाहीं. युद्धकाळांत उत्पादनतंत्राची कल्पनातीत वाढ झाली. नवे शोध लागले. मजुरांच्या कार्यक्षमतेंत झपाट्यानें वाढ झाली. साधनसामुग्री अमाप होतीच. या सर्वांचा परिणाम अमेरिकेचें जीवनमान पूर्वींपेक्षां वरच्या दर्जाचें होण्यांत झाला. साम्राज्यशाही पिळवणुकीनें दरिद्री झालेले आशिया व आफ्रिका, व युद्धानें होरपळलेला युरोप यांच्यांतील जनतेचें जीवनमान फारच खालावलें. यामुळें हा विरोधाभास फारच तीव्रतेनें जाणवतो.

उत्पादनाच्या विस्मयजनक वाढीपेक्षांहि अमेरिकेनें युद्धकाळांत केलेली शास्त्रीय प्रगति अधिक चिरस्मरणीय ठरली. आजपावेतों मानवी बुद्धीला अगम्य ठरलेलें 'अणुशक्तिचें कोडें' सोडवून अमेरिकन शास्त्रज्ञांनीं सर्वांवर मात केली. पण शास्त्रज्ञांनीं गांठलेल्या या अत्युच्च शिखराचें कौतुक करण्याऐवजीं सारें जग आज या भस्मासुराच्या पायीं साऱ्या मानवी संस्कृतीची राखरांगोळी होणार कीं काय या दारुण भीतीनें कांपत आहे. अमेरिकन जीवनांत भौतिकसुखवादाला मिळालेलें एकमेव स्थान, शास्त्रीय प्रगतीच्या जोरावर त्यांनीं जीवनाला दिलेली गति व भावी ध्येयाविषयीं अस्पष्ट कल्पना—या सर्वांमुळें अमेरिका विनाशाकडे जाणार कीं काय अशी शंका मनाला चाटून जाते.

अणुबॉंबचा उपयोग करून अमेरिकेनें आपल्या प्रशांत महासागरांतील प्रतिस्पर्ध्याला जमीनदोस्त केलें. पण अणुशक्तीच्या गुपितामुळें, आपल्या युद्धकालीन मित्रांशींदेखील अमेरिकेचें पटलें नाहीं. अमेरिका व रशिया यांच्यातील संघर्ष हा अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा आहे. कारण हा संघर्ष

केवळ या दोन राष्ट्रापुरताच मर्यादित राहिलेला नाहीं. आजपर्यंत या राष्ट्रांच्या जागतिक सत्ताराजकारणांत संघर्ष अस्तित्वांत नव्हते असें नाहीं. पण त्या संघर्षाचा व्यक्तीच्या दैनंदिन जीवनावर होणारा परिणाम अत्यंत अल्प होता. आज १९५३ मध्यें वैज्ञानिक प्रगतीनें, आर्थिक आवश्यकतेमुळें, विचारसाधर्म्यामुळें व नवीन निर्माण झालेल्या अणुयुगामुळें होणारा जागतिक संघर्ष व्यक्तिजीवन संपूर्ण ग्रासून टाकतो. याचमुळें अमेरिकेच्या जागतिक राजकारणांतील भूमिकेविषयीं विचार करणें आवश्यक ठरतें.

दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकन नेत्यांना अमेरिकेनें जागतिक राजकारणांतील अग्रेसर स्थान टिकवणें म्हणजे रशियाविरोध करणें असें वाटूं लागलेलें आहे. रशियाच्या वाढत्या वर्चस्वाला पायबंदी घालण्याची नैतिक जबाबदारी जणू आपणावर आहे, असें आज अमेरिकेला वाटतें. त्यामुळें युरोपमध्यें रशियाविरोधी पाश्चिमात्य राष्ट्रांचा गट अमेरिकेनें निर्माण केलेला आहे. सत्ताराजकारणांतील या डावांत अमेरिकेला थोडें फार यश मिळालें आहे. पण त्यासाठीं द्यावी लागलेली किंमत जबर आहे. रशियाविरोधी जागतिक आघाडींतील, अमेरिकेचे आशियांतील डावपेंच मात्र आजतरी अयशस्वी झालेले दिसतात. चीनमधील चँगच्या प्रतिगामी राजवटीला मिळालेला अर्धचंद्र हा अमेरिकेचा प्रचंड पराभव आहे. आशियांतील बाकीच्या राष्ट्रांतहि अमेरिकेला आपलें स्थान निर्माण करतां आलें नाहीं. कारण, केवळ रशियाविरोध वा साम्यवादद्वेष ही भावना आशियाई राष्ट्रांना महत्त्वाची वाटत नाहीं. उलटपक्षीं चीनच्या यशस्वी साम्यवादी क्रांतीनें, या देशांत स्वतःच्या प्रगतीसाठीं साम्यवादी अर्थव्यवस्थेचा स्वीकार करावा अशी भावना दिसून येते. त्यामुळें अमेरिकेचें कोरियांतील युद्धांत पदार्पण हें, कोरियन स्वातंत्र्यासाठीं नसून साम्यवादविरोधासाठीं आहे असें आशियांतील जनतेला वाटतें. अमेरिकेच्या नवचीनविषयक प्रतिगामी आडमुठ्या धोरणामुळें त्या संशयास बळकटी येतें.

आज जागतिक शांतता अमेरिका व रशिया या दोन राष्ट्रांवर अवलंबून आहे. अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण आज निश्चितपणें रशियाविरोधी झालेलें आहे. साम्यवादी क्रांतीची अवास्तव धास्ती घेतलेल्या अमेरिकेनें आज अंतर्गत राजकारणांत लोकशाहीविरोधी फॅसिस्ट मार्गाचा अवलंब केला आहे. (उदाहरणार्थ, 'अमेरिकाविरोधी' वर्तनासाठीं हजारों लोकांची चौकशी) अमेरिकेच्या अंतर्गत राजकारणांतील हालचालीवर परराष्ट्रीय धोरण आवलंबून आहे, परराष्ट्रीय धोरणावर जागतिक शांतता अवलंबून आहे. रशियाविरोधी मॅकॉर्थरला बडतर्फ केल्याबद्दल अमेरिकेंत झालेला गाजावजा पाहिला म्हणजे अमेरिकेंत रशियाविरोध किती खोलवर रुजला आहे याची कल्पना येते. याच अमेरिकन जनतेच्या हातीं जगाच्या शांततेची धुरा आहे. अमेरिकन जनता आपल्यावरील महान् जबाबदारी ओळखून जगाला शांततेचा लाभ करून देऊन आपलें कर्तव्य पार पाडतें कीं अणुयुद्धाच्या मानवीसंस्कृतिविध्वंसक खाईत जगाला लोटते हीच दुसऱ्या शतकाच्या उत्तरार्धांतील सर्वांत मोठीं समस्या आहे.

१९५२ सालीं अमेरिकेच्या अध्यक्षपदासाठीं निवडणुकी होऊन आयसेनहॉवर यांची अमेरिकन जनतेनें निवड केली. या निवडणुकीमुळें १९३२ सालापासून चालत आलेली डेमोक्रॅटिक पक्षाची राजकीय मक्तेदारी संपली. तसेंच आयसेनहॉवर यांना मिळालेलीं मतें हीं आजवर कोणाहि अध्यक्षाला मिळालेल्या मतांपेक्षां अधिक होतीं. आयसेनहॉवर हे दुसऱ्या महायुद्धांत दोस्त राष्ट्रांचे सरसेनापति होते. युरोपच्या रणक्षेत्रावर त्यांनीं दाखविलेल्या युद्धकौशल्यामुळें सर्वसामान्य नागरिकांत त्यांच्याविषयीं आदराची भावना होती. डेमोक्रॅटिक पक्षाच्या-विशेषत: ट्रुमन राजवटीच्या भ्रष्ट व लांचलुचपतखोर कारभाराचाहि जनतेला वीट आला होता. कोरियन युद्धांत झालेल्या मनुष्यहानीमुळें महिलावर्ग हैराण झाला होता. आयसेनहॉवर यांनीं अगदीं शेवटच्या घटकेस केलेल्या निवडणूकपूर्व कोरियाभाषणामुळें त्या वर्गानें आपलीं मतें रिपब्लिकन पक्षाला दिलीं.

आयसेनहॉवर यांच्या जागतिक व्यक्तिमत्त्वापुढें त्यांच्या प्रतिस्पर्ध्याचें गव्हर्नर स्टीव्हन्सन–व्यक्तित्व फिकें पडलें. रिपब्लिकन पक्षाला विधिमंडळांतदेखील, अल्प कां होईना, बहुमत मिळालेलें आहे.

रिपब्लिकन पक्षाच्या या यशामुळें अमेरिकेच्या अंतर्गत राजकारणांत बदल घडून येण्याची शक्यता आहे. पण आंतराष्ट्रीय क्षेत्रांत कांहीं महत्त्वाचे बदल घडून येतील असें दिसत नाहीं. एकतर अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण हें बऱ्याच अंशीं पक्षातीत बगलें आहे. आयसेनहॉवर हे विजयी सेनानी असले तरी क्रांतिकारक विचारांचे ध्येयवादी मुत्सद्दी असा त्यांचा लौकिक नाहीं. अस्तित्वांत असलेल्या परिस्थितींत कांहीं तपशीलाचे बदल घडून येणारच नाहींत असें नाहीं. उदाहरणार्थ, अमेरिकेच्या मदत योजनेंत आशियाऐवजीं युरोपला अधिक महत्त्व दिलें जाण्याचा संभव आहे. पण साम्यवादविरोध व सोव्हिएट रशियाचा विरोध अशा मूलभूत प्रश्नाविषयीं पूर्वीचेंच धोरण कदाचित् अधिक प्रकर्षानें चालू राहण्याचा संभव आहे.

आशियाई राष्ट्रांनी साम्यवादाचे विरोधासाठीं स्वतःचे मनुष्यबळ खर्च करावें. अमेरिकेकडून त्यांना तंत्रज्ञ, पैसा व युद्धसाहित्य यांची मदत मिळेल. पण मनुष्यबळ मिळणार नाही असे नवें धोरण आयसेनहॉवर यांनीं स्वीकारलें आहे. त्यानुसार फोर्मोसाच्या खाडींत असलेलें अमेरिकेचे ‘ सातवें आरमार ’ काढून घेण्यांत आले. यामुळें चँग कै-शेकला नवचीनवर छुपे हल्ले व चढाई करण्यास मोकळीक मिळाली आहे. या धोरणाचा एक उद्देश कोरियांतील कम्युनिस्टांचें दडपण कमी करण्याचा आहे. पण अमेरिकेच्या मदतीशिवाय चँगचे सैन्य नवचीनवर कितपत चढाई करूं शकेल हा विवाद्य प्रश्न आहे. पण या धोरणावरून अमेरिकेच्या नव्या राजवटीचे धोरण प्रशांत महासागरांतील राजकारणांत अधिक ताठर होत जाणार असें दिसतें.

# सर्वाधिकारशाही



आधुनिक सर्वाधिकारशाहीचा जन्म पहिल्या महायुद्धानंतर झाला. लोकशाहीचा मार्ग सुरक्षित करण्यासाठीं पहिलें महायुद्ध लढलें गेलें, असें म्हटलें जातें. विजयी ठरलेल्या राष्ट्रांना त्यांच्या लोकशाहीमुळें विजय प्राप्त झाला असा सार्वत्रिक समज पसरल्यामुळें लोकशाही राज्यतंत्राचा स्वीकार पराभूत व नवोदित राष्ट्रांनीं केला. अशा परिस्थितींत युरोपीय जनता लोकशाही राज्यव्यवस्थेकडून अनेक अपेक्षा करीत होती. पण तिच्या डोळ्यांवरील लोकशाहीच्या सर्वगुणसंपन्नतेची धुंदी युद्धोत्तर काळांतील आर्थिक अडचणींनीं लवकरच दूर केली. लोकशाहीची ऐतिहासिक परंपरा नसलेल्या राष्ट्रांत हें नवें बीज जोमदारपणें अंकुरणें अस्वाभाविकच होतें. तशांत युद्धोत्तर युरोप आर्थिक, सामाजिक व राजकीय अडचणींनीं ग्रस्त झाला होता. तेव्हां लोकशाहीची नाजूक राजकीय कसरत नवशिक्या राष्ट्रांना जमणें कठीणच होतें. युरोपांतील अनेक राष्ट्रांत गतवैभवाचीं स्वप्नें पाहणारा, नव्या लोकशाहीशीं निष्ठावंत नसलेला पण केवळ परिस्थितीमुळें तिचे गोडवे गाणारा अधिकारी वर्ग अस्तित्वांत होता. या नोकरवर्गानें लोकशाही राज्यतंत्राला खिळखिळें करण्याची सतत खटपट केली. सर्वाधिकारशाहीची सुरुवात मात्र युरोपच्या एका जुन्या लोकशाहींतच झाली.

१९२२ सालीं इटलींत झालेला सर्वाधिकारशाहीचा उदय भावी अनर्थाचें केवळ पूर्वचिन्हच होतें.. इटलीचें आर्थिक जीवन इतकें चंचल व असुरक्षित झालें होतें कीं, सर्वसाधारण जनतेला आर्थिक स्थैर्याची भरघोंस वचनें देणारा सर्वाधिकारी नेता लोकशाही मंत्र्यांपेक्षां अधिक पसंत होता. आर्थिक स्थैर्य मिळवण्यासाठीं एकवेळ राजकीय स्वातंत्र्य नष्ट झालें तरी चालेल अशी आत्मघातकी भावना युद्धोत्तर काळांतील वैफल्यांतून निर्माण झाली होती. युरोपीय लोकशाही उजव्या व डाव्या राजकीय

गटाकडून सतत होणाऱ्या हल्ल्यांना यशस्वी तोंड देण्यास कुचकामी ठरली. आणि या सर्वांचा परिणाम सर्वाधिकारशाहीला जनतेचा पाठिंबा मिळण्यांत झाला. जागतिक मंदीनंतर सर्वाधिकारशाहीचें पीक मध्य व पूर्व युरोपांतील बहुतेक सर्व राष्ट्रांत फोफावलें. पण त्यांतहिं कैसरच्या लष्करशाहीचा वारसा घेतलेल्या जर्मनींतील नाझी सर्वाधिकारशाही अधिक घातक ठरली.

व्यक्तीच्या स्वतंत्र व्यक्तिमत्वाला वाव देऊन तिची सर्वांगीण वाढ करणें हें राज्याचें ध्येय असावें असें लोकशाही गृहीत धरतें. राष्ट्रासाठीं व्यक्तीनें सर्वस्वाचा होम करणें, राष्ट्रजीवनाच्या यशांतच आपलें कल्याण मानणें, व स्वतंत्र व्यक्तित्वाचा कसलाहि हव्यास न धरणें यानेंच मानवी प्रगति होईल असें सर्वाधिकारशाहीचें मुख्य सूत्र आहे. मानवी जीवनाचें संपूर्ण नियंत्रण सांचेबंद रीतीनें करण्याकडे तिचें लक्ष असतें. यामुळें पक्षभेद राहूं शकत नाहींत. इतकेंच काय पण वैचारिक मतभेदाला देखील जागा उरत नाहीं. सर्वांनीं एकच विचार शासनप्रणीत आचार व निर्बंधित जीवन कंठणें हेंच जणूं सर्वांचें कल्याण आहे, असा प्रचार सर्वाधिकारशाही करतें. यामुळेंच सर्वाधिकारशाही राष्ट्रें विचारस्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या राष्ट्रांचा द्वेष करीत असतात. जबरदस्तीनें निर्माण केलेल्या वैचारिक ऐक्यांतून व निर्बंधित जीवनांतून आर्थिक स्थैर्य व सुरक्षित समाजजीवन निर्माण झाल्याचा भास होतो. पण दूरवर विचार करतां मानवी जीवन अशा प्रकारें सांचेबंद केल्यामुळें साऱ्या सृजनशील प्रवृत्ति नष्ट होण्याचा फार मोटा धोका आहे. समाज आणि व्यक्ति यांचे अन्योन्य संबंध काय असावेत हा प्रश्न आजहि विवाद्य आहे. समाज-जीवनासाठीं व्यक्ति कीं, व्यक्तिजीवनासाठीं समाज असा हा त्रिकट पेंच आहे. पण यांतून बाहेर पडण्यासाठीं व्यक्तिजीवनाचें स्वातंत्र्य नष्ट करणें हा सर्वाधिकारशाहीनें अंगिकारिलेला मार्ग मात्र योग्य व स्वीकारार्ह ठरूं शकत नाहीं. कारण हा उपाय म्हणजे रोग नष्ट करण्याऐवजीं रोग्यालाच नष्ट करणें होय. स्वतंत्र व्यक्तित्वाला वाव दिल्यामुळें मानवी बुद्धि आणि

कर्तृत्व यांना अधिक तेज चढतें. यांत केवळ इतकीच काळजी घेणें आवश्यक आहे कीं, व्यक्तीच्या कर्तृत्वाचा उपयोग समाजाच्या कल्याणाकरिता केला जाईल. हें घडून येण्यासाठीं व्यक्तिजीवन आणि समाजजीवन यात मूलभूत अंतर्विरोध नसून दोघांच्या समन्वयांतूनच मानवी प्रगतीचा मार्ग सुलभ होतो, याची शिकवण व्यक्तीला देणें आवश्यक आहे.

सर्वाधिकारी राज्यव्यवस्थेंत अधिकारारूढ पक्षच अस्तित्वांत असूं शकतो. विरोधी पक्षांना कायदेशीर अस्तित्व असूं शकत नाहीं. सत्ताधारी पक्षाकडे राष्ट्राच्या साऱ्या जीवनावर अनिर्बंध सत्ता गाजविण्याचे अधिकार एकवटलेले असतात. केवळ राजकीय क्षेत्रांतच नव्हे तर शास्त्र, कला, नीति, साहित्य, धर्म इत्यादि इतर क्षेत्रांतहि सत्ताधारी पक्षाचें वर्चस्वअसतें. समाज-जीवनाच्या या सर्वांगीण नियंत्रणांतूनच एक प्रचंड गुप्त पोलीस दलाची आवश्यकता निर्माण होते. कारण प्रत्येक नागरिकाच्या बारीकसारीक हालचालींवरदेखील पोलीसांना नजर ठेवावी लागते. न जाणो, थोडें फार दुर्लक्ष झाल्यास विरोधी पक्ष संघटित होऊन सत्तारूढ पक्षाच्या दडपशाहीचा प्रतिकार करतील. सत्तारूढ पक्ष, त्याचें विशिष्ट तत्त्वज्ञान, एकच जीवनविषयक दृष्टीकोण व हें सर्व अंमलांत आणणारें सर्वाधिकारी राज्यतंत्र यांचा परिपाक म्हणजे सर्वंकष राज्य होय.

इटली, जर्मनी व जपान या देशांतील सर्वाधिकारशाहीच्या स्वरुपांत देशकालपरिस्थितीप्रमाणें फरक आहे. मुसोलिनी व त्याचे अनुयायी राज्यालाच समाजाचें अंतिम सर्वस्व समजत असत. पण हिटलरच्या मतें सर्वंकष राज्य हें जर्मन वंशाच्या विकासाचें एक साधनमात्र आहे. नाझीं सर्वाधिकारशाही ही फॅसिस्टांप्रमाणें साम्यवादविरोधी व रशियाविरोधी असली तरी तिचा मुख्य आधार जर्मनांची वांशिक श्रेष्ठता व ज्यूंचा अमानुष द्वेष हा होता. या उलट मुसोलिनीचा वांशिक श्रेष्ठतेच्या तत्त्वावर विश्वास नव्हता, ज्यूद्वेष इटलींत कधींच रुजूं शकला नाहीं. जपानच्या

बाबतींत, मिकॅडो व त्याची शिंटोपंथीय विभूतिपूजा व चीन द्वेष यांना अधिक महत्त्व होतें. जपानी सर्वाधिकारशाही अधिकांशानें लष्करी सर्वाधिकारशाही होती. फॅसिस्ट किंवा नाझी यांच्याप्रमाणें ती एका सुसंघटित राजकीय पक्षाची सर्वाधिकारशाही नव्हती.

समाजजीवनावरील सर्वंकष नियंत्रणाच्या दृष्टीनें विचार करतां या तीन राष्ट्रांत जर्मनीला अग्रेसरत्वाचा मान द्यावा लागतो. हिटलर सत्तारूढ होतांच अनेक ज्यूविरोधी कायदे अंमलांत आणले गेले. पण त्यांपैकीं गतकालपरिणामीं विवाहविषयक कायदा हा नाझींच्या समाजजीवनावरील नियंत्रणाचें सर्वोत्कृष्ट उदाहरण मानतां येईल. या कायद्याप्रमाणें १९३३ नंतरचे सर्व जर्मन-ज्यू विवाह-ज्यांत स्त्री किंवा पुरुष ज्यू असतील-ते अवैध ठरविण्यांत आले. विवाह आणि कौटुंबिक जीवन हे सर्वत्र राष्ट्रांत व्यक्तीच्या आयुष्याचा खाजगी भाग समजले जातात. पण या खाजगी जीवनावरदेखील नाझी सर्वाधिकारशाहीनें नियंत्रण आणलें. तुलनेनें पाहतां इटली व जपान या देशांतील सर्वाधिकारशाही नाझीपेक्षां कमी सर्वंकष स्वरूपाची होती. इटलीच्या बाबतींत कॅथॉलिक धर्मपंथ व पोप यांचें अस्तित्व राज्याच्या सर्वंकष स्वरूपाला मर्यादित करी. जपानमध्यें ऐतिहासिक परंपरा व बुद्धधर्म यांच्या प्रभावामुळें सर्वंकष राज्याची कमाल मर्यादा गांठणें जपानी सत्ताधिशांना कधींच शक्य झालें नाहीं.

सर्वाधिकारशाहीचीं हीं तीन प्रमुख स्वरूपें वगळलीं तरी युरोपांतील व दक्षिण अमेरिकेंतील अनेक राष्ट्रांत सर्वाधिकारशाही राज्यव्यवस्थाच प्रस्थापित झाली होती. कुठें तिचें स्वरूप पक्षीय होतें, तर अन्य ठिकाणीं लष्करी होतें. रुमानियासारख्या एखाद्या देशांत राजसत्ता हीच सर्वाधिकारशाहींत विकसित झाली होती. पण या सर्व देशांतील सर्वाधिकारशाहीचें मूलभूत धोरण एकाच प्रकारचें आढळून येईल. समाजांतील धनिक वर्गाचा पाठिंबा, लोकशाहीविरोध, साम्यवाद व सोव्हिएट रशिया यांनां कडवा विरोध, संघटित कामगार चळवळी दडपणें, आत्यंतिक व आक्रमक

राष्ट्रवादी धोरण, सामान्यतः प्रस्थापित सामाजिक व्यवस्था टिकवून धरणें, विरोधी राजकीय गटांना व विचारांना नेस्तनाबूद करणें इत्यादि घटक सर्वाधिकारशाही राजवटींत सर्वत्र आढळून येत असत. फॅसिस्ट विचारप्रणालीचा उगम एका विशिष्ट देशांतील राष्ट्रवादी भावनांतून झालेला असला, तरी दुसऱ्या महायुद्धापूर्वी अनेक देशांतील फॅसिस्ट मनोवृत्तीच्या गटांमुळें फॅसिस्ट विचारसरणीला एक प्रकारें आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त झाले होतें. ब्रिटन फ्रान्स सारख्या लोकशाही राष्ट्रांतदेखील फॅसिस्ट पक्ष उघडपणें स्थापन करण्यांत आले होते. इटली, जर्मनी आणि जपान या त्रिकुटाच्या जागतिक राजकारणांतील वाढत्या वर्चस्वाबरोबर फॅसिस्ट विचारसरणीचा प्रसार जगभर वाढत गेला.

दुसऱ्या महायुद्धांत लोकशाही राष्ट्रें आणि सोव्हिएट रशिया यांच्या संयुक्त आघाडीपुढें फॅसिस्ट राष्ट्रांचा निभाव लागला नाहीं. पण जर्मनी, इटली आणि जपान यांच्या पराभवाबरोबरच फॅसिस्ट विचारसरणीहि नष्ट झाली असें मानणें चुकीचें ठरेल. दक्षिण अमेरिकेंतील राष्ट्रें, स्पेन, पोर्तुगाल, तुर्कस्थान इत्यादि देशांत सर्वाधिकारशाही पूर्वीप्रमाणेंच चालू आहे. पण पराभूत राष्ट्रांतदेखील फॅसिस्ट पक्षांचें पुनरुज्जीवन होण्याचा भरपूर संभव आहे. युद्धोत्तर काळांतील लोकशाही राष्ट्रांच्या वाढत्या सोव्हिएट विरोधी धोरणाबरोबर फॅसिस्ट राष्ट्रांना व पक्षांना अधिकाधिक उत्तेजन मिळत आहे. उदाहरणार्थ अमेरिकेनें स्पेनशीं स्वीकारलेलें अनुनयाचें धोरण किंवा पश्चिम जर्मनींत व इटलींत फॅसिस्ट–सदृश पक्षांना मिळणारा वाढता पाठिंबा या दाखल्यांवरून फॅसिस्ट विचारसरणी नष्ट झालेली नसून केवळ पराभूत झाली आहे. कदाचित संधि मिळाल्यास ती पुनः एकदां प्रस्थापित होण्याचा धोका आहे.

## जर्मनी

आधुनिक जर्मन राष्ट्राचें जनकत्व बिस्मार्कला देण्यांत येतें. बिस्मार्कच्या प्रयत्नामुळें संघटित झालेला जर्मनी हा युरोपांतील नेतृत्वाच्या स्पर्धेंत फ्रान्सला भारी ठरला. याचें कारण, बिस्मार्कची कडक शिस्त,

राष्ट्रीय उद्योगधंद्यांना संरक्षण देण्याचें नवें धोरण व प्रशियाची लष्करी परंपरा यांचा वारसा नव्या जर्मन राष्ट्राला मिळाला. सरकारी संरक्षणाखालीं जर्मन उद्योगधंद्यांनीं वेगानें प्रगति केली. या औद्योगिक प्रगतींतूनच जर्मनीच्या साम्राज्यतृष्णेचा उगम झाला. सामर्थ्यसंपन्न जर्मनीला, पराभूत फ्रान्स व व्यापारी इंग्लंड या राष्ट्रांजवळ प्रचण्ड साम्राज्यें असावींत याचें वैषम्य वाटे. दुसऱ्या कैसरनें जर्मनीचें नाविक व लष्करी सामर्थ्य वाढविण्यास सुरुवात केली. याचा परिणाम इंग्लंड व रशिया यांचें शत्रुत्व ओढवून घेण्यांत झाला आणि शेवटीं इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांची जर्मनीविरोधी एकजूट झाली. पहिल्या महायुद्धांत जर्मनीनें केवळ ऑस्ट्रियाशीं असलेल्या तहाकरितां भाग घेतला असे नाहीं, तर स्वतःच्या विश्वविजयी योजना सफल करण्याची ही एक सुवर्णसंधि आली आहे यान्न हेतूनें होय. पहिल्या महायुद्धांत जर्मनीनें प्रगट केलेलें प्रचंड लष्करी सामर्थ्य, वैज्ञानिक प्रगति व अलौकिक त्याग यांचा विचार केला तर जर्मनीला वाटत असलेली विजयाची खात्री अनाठायीं नव्हती असें म्हणावें लागतें. पण युद्धदेवतेनें दोस्तांच्या बाजूनें कौल दिला, व विश्वविजयाऐवजीं खंडित, अपमानित, छिन्नविछिन्न राष्ट्रजीवन जगण्याचें दुर्भाग्य जर्मनीच्या वांट्यास आलें.

व्हर्सायच्या तहान्वयें झालेली जर्मनीची दुर्धर अवस्था, गलितगात्र, निराश व अवमानित जनता आणि अगणित युद्धखंडणीचा असह्य बोजा अशा परिस्थितींत जर्मन लोकशाहीचा जन्म झाला. सोशल डेमोक्रॅट पक्षानें नव्या लोकशाहीची जबाबदारी स्वःताच्या शिरावर घेतली. पण नव्या राजवटीनें जुन्या नोकरशाहीवर विश्वास टांकला. या नोकरशाहीची निष्ठा जर्मन साम्राज्याशीं निगडित होती. नवजात, दुर्बल वैभवहीन लोकशाहीविषयीं त्यांच्या मनांत तिरस्काराशिवाय दुसरी भावना नव्हती. कदाचित् या परिस्थितींतदेखील लोकशाही यशस्वी झाली असती. पण १९२३ मध्यें खंडणी न पोहचल्याच्या निमित्तानें फ्रेंचांनीं ऱ्हूर प्रांत ताब्यांत घेतला.

जर्मन कामगारांनीं निषेधार्थ बैठा संप पुकारला. सारें उत्पादन थांबलें. कल्पनातीत चलनवाढ झाली. अखेर आर्थिक व्यवस्था कोलमडून पडली. जर्मनींतील मध्यम वर्ग नष्ट झाला. जें कार्य रशियांत क्रांतीनें घडून आलें तें जर्मनींत चलनवाढीमुळें झालें असें म्हणण्यांत येतें. सर्वसामान्य जनतेच्या मनांत अस्थिर आर्थिक परिस्थितीमुळें जीवनवैफल्याची भावना प्रकर्ष पावूं लागली.

१९२३ ते १९३३ या काळांत जर्मनीच्या अंतर्गत राजकारणांत फार महत्त्वाचे बदल घडून येत होते. सोशल डेमोक्रॅटस् व कम्युनिस्ट या दोन प्रमुख राजकीय पक्षानीं परस्परांशीं सतत यादवीं युद्ध चालूं ठेवलें होतें. धनिक वर्ग व लष्करी अधिकारी यांना राजकारणांत अधिक महत्त्व येऊं लागलें होतें. १९२० सालीं केवळ सात सभासदांसह स्थापन झालेल्या नाझी पक्षाकडे अनेकांनीं सोईस्कर व इतरांनीं नकळत दुर्लक्ष केलें. सोशल डेमोक्रॅटस् व कम्युनिस्ट यांच्या यादवी युद्धाला कंटाळलेली जनता हळूंहळूं हिटलरच्या प्रभावी व्यक्तिमत्वामुळें नाझी पक्षाकडे आकृष्ट होत होती. तरीदेखील नाझी पक्षाचे संख्याबळ वरील दोन पक्षांच्या मानानें अगदींच अपुरें होतें. १९२९ सालीं सुरू झालेल्या जागतिक मंदीचा फटकारा औद्योगिक जर्मनीला फार मोठ्या प्रमाणावर बसला. १९३२ साली जर्मन बेकारांची संख्या ६० लक्षांचेवर गेली. जर्मनीची दैन्यावस्था पराकोटीला पोंचली. अस्थिर व दुर्बळ लोकशाही या संकटकाळांत किंकर्तव्यमूढ झाली, यांत आश्चर्य तें कसलें ? जर्मनीच्या अध्यक्षस्थानीं वृद्ध जर्मन सेनानी हिंडेनबुर्गची स्थापना करून जर्मनजनतेनें जणू आपला लोकशाहीवरील अविश्वासच व्यक्त केला होता. जर्मन लोकशाहीच्या अयशस्वी परराष्ट्रीय धोरणानें तिची अप्रियता अधिक वाढीस लागली होती. वरील परिस्थितीच्या खतपाण्यावर आक्रमक राष्ट्रवादी नाझी पक्ष फार झपाट्यानें फोंफावला. जागतिक मंदीच्या लाटांवर हिटलर पुढें आला आणि १९३३ च्या जानेवारींत जर्मनीचा अधिकृत चॅन्सेलर झाला.

हिटलर विजयी होण्याचीं मुख्य कारणें—सोशल डेमोक्रॅटस् व कम्युनिस्ट यांनीं चालू ठेवलेलें हाडवैर, नोकरवर्गाची विचलित निष्ठा, जागतिक मंदी व तिचे दुष्परिणाम, साम्यवादाची धास्तीं घेतलेल्या धनिकवर्गाचा पाठिंबा, असंतुष्ट मध्यमवर्ग व अवमानित माजी सैनिक यांचा मिळालेला आधार, जर्मन मनाला प्रिय अशा व्हर्सायविरोधी घोषणा जर्मन तरुणांना आकर्षणारे लष्करी संघटनातंत्र व हिटलरचें अति आकर्षक वक्तृत्व—हीं होत. सत्ता हातीं येताच हिटलरनें आपल्या सर्व विरोधकांना काडीचीहि दयामाया न दाखवतां नेस्तनाबूद केलें. सर्वाधिकारशाहीचा नवा अवतार जगाला परिचित होऊं लागला. जर्मनांच्या खऱ्या खोट्या वांशिक श्रेष्ठतेच्या वेडापायीं हिटलरनें ज्यूंचा केलेला पद्धतशीर नायनाट जगाच्या इतिहासांत मानवी क्रौर्याचा एक नमुना म्हणून अजरामर राहील.

हिटलरच्या धूमकेतूवत् उदयाला जर्मन धनिकांचें व उद्योगपतींचें फार मोठें साहाय्य झालें होतें. त्यामुळें नाझी राजवटींत भांडवलशाही अनियंत्रित स्वरूपांत अस्तित्वांत राहील अशीच कोणाचीहि कल्पना होणें साहजिकच होतें. परंतु हिटलर व नाझी पक्ष यांना भांडवलशाहीचें फारसें सोयरसुतक नव्हतें. जर्मन राष्ट्राची लष्करी तयारी व जनतेची लढाऊ शक्ति प्रचंड प्रमाणांत वाढविणें यांसाठीं त्यांचे सारे प्रयत्न होते. या प्रयत्नांत साहय्यक ठरल्यास भांडवलशाहीला जगूं देण्यास त्याची हरकत नव्हती. पण भांडवलदारांचे गुलाम व हस्तक बनून राज्यकारभार करण्याची हिटलरची तयारी नव्हती. जर्मनीचें सारें उत्पादन व आर्थिक जीवन युद्धाभिमुख करण्यासाठीं नियोजनाचा अंगिकार करून हिटलरच्या सहकाऱ्यांनीं युद्धसाहित्याचें उत्पादन विस्मयजनक प्रमाणांत वाढवलें. याच परिस्थितीचा पुढें परिणाम म्हणजे जर्मन धनिकांना आणि उद्योगपतींना जीव बचावण्यासाठीं जर्मनी सोडून पळून जावें लागलें.

व्हर्सायचा तह अन्यायी होता, याची कबुली दोस्त मुत्सद्यांनीं देखील अनेक वेळां दिली आहे. जर्मनीच्या हिटलर पूर्व लोकशाही नेत्यांनीं देखील

सामोपचारानें त्यांतील अटी दूर करण्याचा वेळोवेळीं प्रयत्न केला होता. पण दुर्बल जर्मनीच्या विनंतीला मान देण्याची गरज दोस्त राष्ट्रांना वाटणें अशक्य होतें. व्हर्सायचा तह नष्ट करणें हें हिटलरचें ब्रीदवाक्य होतें. सत्ताधीश होतांच त्याने केलेल्या शांततेच्या घोषणा ही केवळ धूळफेंक होती. १९३४ मध्येंच जर्मनीनें राष्ट्रसंघांतून काढता पाय घेतला. १९३५ मध्यें जर्मनींत सक्तीच्या लष्करीकरणाचा कायदा जारी करून व्हर्सायचा तह नष्ट करण्यासाठीं हिटलरनें पहिलें पाऊल टांकलें. १९३६ मध्यें ऱ्हाईनलॅंडचें पुनर्लष्करीकरण करून जर्मनीच्या सार्वभौमत्वाला लागलेला डाग पुसण्यांत आला. हें धाडस करण्याचें धैर्य सार प्रांतांतील सार्वमतामुळें जर्मनीला प्राप्त झालें. सारमधील ९९% रहिवाशांनीं जर्मनींत सामील होण्याची इच्छा दर्शविली. याच काळांत इटलीनें ॲबिसीनीयावर केलेल्या आक्रमणामुळें व स्पेनमधील यादवी युद्धामुळें इंग्लंड व फ्रान्स जर्मनीकडे लक्ष देऊं शकत नव्हते. हिटलर व्हर्सायच्या तहाच्या चिंधड्या उडवीत असतांना इंग्लंड आणि फ्रान्स गप्प कां बसले असा प्रश्न उद्‌भवतो. पण जागतिक महायुद्धांची भीति, साम्यवादी क्रांतीची धास्ती व जर्मनीला अन्याय झाला आहे अशी जाणीव यांमुळें इंग्लंडनें जर्मनीच्या सामर्थ्यवाढीकडे दुर्लक्ष केलें.

हिटलरच्या परराष्ट्रीय धोरणाचें मुख्यसूत्र जर्मनीची शक्ति वाढवून जर्मनीला वैभवसंपन्न करण्यासाटीं लोकशाहीविरोधी राष्ट्रांची मैत्री जोडणें व हें करीत असतांना साम्यवादी रशियाच्या विरोधासाठीं जर्मनीचा उपयोग होईल अशी लालूच लोकशाही राष्ट्रांना दाखविणें असें होतें. या दृष्टीनें १९३६ मध्यें जर्मनीनें जपानशी 'ॲन्टी-कॉमिन्टर्न' तह केला. या तहामुळें ब्रिटन व फ्रान्समधील धनिक वर्गाची सहानुभूति जर्मनीकडे वळली. ॲबिसीनीयन प्रकरणापासून इटली व जर्मनी यांच्यांतील ऑस्ट्रियाविषयक तेढ कमी होण्याच्या मार्गास लागली होती. ॲबिसीनीयन युद्धांत युद्ध-साहित्याची मदत करून आणि नंतर ॲबिसीनीयावरील इटलीचें स्वामित्व मान्य करून जर्मनीनें इटलीची मैत्री संपादन केली. एक वर्षाच्या अवधींतच

इटलीनें 'ॲन्टीकॉमिन्टर्न' तहांत सामील झाल्याचें घोषित केलें. या नवीन दोस्तीचा पहिला अविष्कार स्पेनमधील यादवींत फ्रॅन्कोला यशस्वी करण्यासाठीं मदत करण्यांत झाला. जर्मनी व इटलीच्या मदतीशिवाय फ्रॅन्कोला स्पॅनिश लोकशाहीचा पाडाव करणें अशक्य होतें. फ्रॅन्कोचें आसन बळकट करून जर्मनीनें आपल्या जुन्या पिढीजात वैऱ्याला एकाकी करण्यांत यश मिळविलें.

हिटलरच्या आवडत्या घोषवाक्यांपैकीं 'साऱ्या जर्मनांचें एकीकरण' हें एक होतें. पण त्याला मूर्त स्वरूप देण्याचा जर्मन-ऑस्ट्रिया युतीचा १९३४ मधील प्रयत्न अपयशी ठरला होता. कारण मुसोलिनीनें त्याविरूद्ध लष्करी उपाययोजना करण्याची धमकी दिली होती. जर्मनीला बलिष्ठ इटलीशीं शत्रुत्व पत्करणें त्यावेळीं शक्य नव्हतें. पण चार वर्षांच्या अवधींत जर्मनी सामर्थ्यांत वरचढ झाला. १९३८ च्या मार्चमध्यें जर्मन फौजांनीं एकहि गोळी न झाडतां ऑस्ट्रिया काबीज करून ऑस्ट्रिया जर्मनी एकीकरण घडवून आणलें. मुसोलिनीनें स्वत: ब्रेनर खिंडींत येऊन हिटलरचें अभिनंदन केलें. लोकशाही राष्ट्रें पुन: एकदां हात चोळीत बसलीं. एका पाठोपाठ एक मिळविलेल्या राजनैतिक विजयांमुळें हिटलरचें व जर्मनीचें जागतिक राजकारणांतील वजन भराभर वाढूं लागलें. त्यावेळच्या तथाकथित लोकशाही नेत्यांची हिटलरच्या कृत्यांना अप्रत्यक्ष सहानुभूतीच होती. जागतिक साम्यवादी क्रांतीची त्यांना वाटत असलेली भीती, तोंपर्यंतच्या हिटलरच्या कृत्यांनीं त्यांना न लागलेली तोशीस, थोड्या फार प्रमाणांत व्हर्सायच्या अन्यायाचें परिमार्जन करण्याची प्रवृत्ति, सर्वाधिकारशाहीचें घातकी स्वरूप ओळखण्याची अनिच्छा, आणि रशियाविरोधी युद्धांत जर्मनीचा संभाव्य उपयोग यांमुळें हिटलरचा भस्मासुर अधिकाधिक बलशाली होत आहे याकडे त्यांचें दुर्लक्ष झालें.

१९१९ मध्यें उदयास आलेल्या झेकोस्लोव्हाकिया राष्ट्राला संरक्षक सीमा मिळाव्या म्हणून स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला बाजूला सारून लक्षावधि

सुडेटन जर्मनांची झेक आणि स्लोव्हाक या भिन्न समाजाबरोबर सांगड घालण्यांत आली. वर्धिष्णु जर्मनीच्या वैभवाबरोबरच सुडेटन जर्मनांच्या राष्ट्रवादी आकांक्षा जागृत झाल्या. ऑस्ट्रियन एकीकरणानंतर त्यांच्या जर्मन एकीकरणाची मागणी वाढीस लागली. या परिस्थितीचा फायदा घेण्यास हिटलर उत्सुक होताच. झेकोस्लोव्हाकियाच्या स्वातंत्र्याची ग्वाही फ्रान्स आणि रशिया यांनीं एका तहान्वयें दिली होती. पण फ्रान्सचे नेते वचन-पूर्तीसाठीं युद्धास सज्ज होण्यास तयार नव्हते. त्रयस्थ ब्रिटन आणि त्याचे मुख्य प्रधान चेंबर्लेन यांची या प्रश्नाविषयींची अनास्था फ्रान्सपेक्षांहि अधिक होती. त्यामुळें हिटलरनें सुडेटन जर्मनांच्या संरक्षणार्थ युद्धाचा धाक घालतांच चेंबर्लेन व डलादियर यांचें धाबें दणाणलें. फ्रान्स व ब्रिटन यांची युद्धतयारी अत्यंत शोचनीय होती. सर्वसामान्य जनता युद्धविरोधी व शांतताप्रिय होती. सत्ताधारी धनिक वर्गाला हिटलरशीं युद्ध नको होतें. याच परिस्थितीच्या पोटीं ब्रिटन आणि फ्रान्स यांनीं शरणागतीचें नामुष्कीचें धोरण स्वीकारून म्युनिक कराराला मान तुकविली, व लोकशाही झेकोस्लोव्हा-कियाचा जर्मन सर्वाधिकारशाहीला बळी दिला.

ऑस्ट्रियन एकीकरणाचा परिणाम झेकोस्लोव्हाकियाला एकाकी व दुर्बळ करण्यांत झाला. तर म्युनिकचा परिणाम पोलंडला शक्तिहीन करण्यांत आला डॅन्झीग आणि पोलिश कॉरिडॉर या दोन अन्यायाचें परिमार्जन केलें पाहिजे असा प्रचार जर्मनीनें तात्काळ सुरू केला. झेकोस्लोव्हाकियाच्या शवविच्छेदनांत पोलंडनें देखील मोठ्या आनंदानें भाग घेतला होता आणि आठच महिन्याच्या अवधींत तीच पाळी पोलंडवरहि आली.

पोलंडच्या प्रश्नावरून निर्माण झालेलें दुसरें महायुद्ध ६ वर्षें चालू राहिलें. युद्धाच्या शेवटीं हिटलरच्या जर्मनीची अक्षरशः राखरांगोळी झाली. जर्मनीचें विभाजन झालें. तिच्या अर्ध्या लोकसंख्येला सोव्हिएट रशियाच्या अंमलाखालीं जावें लागलें जर्मनीच्या शेजारी राष्ट्रांनीं आपल्या

राष्ट्रांतील जर्मन प्रजाजनांची हकालपट्टी केली. दोस्तांच्या बॉंब वर्षावामुळें जर्मनीची अपरिमित औद्योगिक हानि झाली. उरलेल्या औद्योगिक साधनसामुग्रीचा ती युद्धोत्पादक आहे या सबबीखालीं दोस्त फौजांनीं नाश केला. पराजित जर्मनीला अन्न, वस्त्र व आश्रय या जीवनाच्या प्राथमिक गरजा भागविणेंदेखील अशक्यप्राय झालें.

युद्धोत्तर काळांत जर्मनीची फाळणी होऊन औद्योगिक पश्चिम जर्मनी व त्यांतील पांचकोटि लोकसंख्या अमेरिका, फ्रान्स व इंग्लंड यांच्या लष्करी अंमलाखालीं आहे. दोन कोटी लोकसंख्येचा कृषिप्रधान पूर्व जर्मनी रशियांकित आहे. गेल्या ७ वर्षांत घडून आलेल्या सत्ताराजकारणांतील फेरफारामुळें आज लोकशाही राष्ट्रांना पश्चिम जर्मनीचा अनुनय करणें भाग पडत आहे. सोव्हिएटविरोधी आघाडी यशस्वी व्हावयाची असेल तर जर्मनीला वगळून चालणार नाहीं याची जाणीव अमेरिकेला झालेली आहे. जर्मनीचें मनुष्यबळ, साधनसामुग्री आणि औद्योगिक व शास्त्रीय विकास या तीनहि कारणांमुळें युरोपीय राजकारणांतील कोणतेहि डावपेंच जर्मनीची उपेक्षा करून यशस्वी होणें अशक्य आहे. रशियांकित पूर्व जर्मनींत अमेरिका विरोधासाठीं सोव्हिएट रशियानें असेंच नरमाईचें धोरण स्वीकारलें आहे. युद्धकालीन मित्रराष्ट्रांच्या दुहीचा फायदा जर्मनीला मिळत आहे. तिच्या युद्धोत्पादक कारखान्यांची मोडतोड थांबली आहे. इतकेंच नव्हे, तर औद्योगिक पुनर्वसनासाठीं मार्शल मदतयोजनेनुसार अमेरिकेचें आर्थिक व तांत्रिक साहाय्य मिळत आहे. अनेक वरच्या दर्जाच्या युद्धगुन्हेगारांची सुटका जाणूनबुजून करण्यांत येत आहे. रशिया-विरोध हा स्थायीभाव झाल्यानें लोकशाही-विरोधी प्रवृत्तींनादेखील प्रोत्साहन मिळत आहे. संपूर्ण नष्ट न झालेलें नाझी विचारांचें व पक्षाचें प्रच्छन्न पुनरुज्जीवन होत आहे. पराभूत जर्मनीविषयीं दोस्त राष्ट्रांना अवघ्यां सात वर्षांतच आपल्या घोषणा विसरून नवें धोरण स्वीकारावें लागत आहे. पण यांत आश्चर्य नाहीं. जागतिक राजकारणांत कोणतेंहि

राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचें कायमचें शत्रु अथवा मित्र नसतें. बदलत्या परिस्थितीनुसार कालचे शत्रु ते आजचे मित्र ठरतात व कालचे मित्र आजचे शत्रु ठरतात. वरील सर्व घडामोडींत एक धोका दिसून येतो. रशियाविरोध या कल्पनेच्या आवरणाखालीं पुनः एकदां जर्मनींत सर्वाधिकारशाही निर्माण होईल कीं काय? अर्थात् या प्रश्नाचें उत्तर आज तितकेसें जर्मनीच्या अंतर्गत राजकारणावर अवलंबून नसून आंतरराष्ट्रीय राजकारणांतील लोकशाही राष्ट्रांच्या डावपेंचावर अवलंबून आहे.

## इटली

प्राचीन बलशाली रोमन साम्राज्याचा वारसा आधुनिक काळांत दुर्बल पण महत्त्वाकांक्षी इटलीच्या वांट्यास आला. मॅझिनीच्या राष्ट्रवादानें प्रेरित झालेली इटालियन जनता कॅव्हूर-गॅरिबॉल्डीच्या प्रयत्नानें एकत्र आली. जर्मनी व इटलीचें राष्ट्रीय एकीकरण कालदृष्ट्या एकाच वेळीं झालें. पण या दोन राष्ट्रांच्या साधनसामुग्रींत, समाजांच्या कर्तृत्वशक्तींत व त्यांना लाभलेल्या नेतृत्वांत महदंतर होतें. इटलीजवळ मनुष्यबळाखेरीज इतर कसलीच साधनसामुग्री नव्हती. भौगोलिक दृष्ट्या इटलीचा लांबलचक किनारा अत्यंत असुरक्षित होता. भूमध्यसमुद्राच्या कोंडीतून बाहेर पडण्यासाठीं इटलीला ब्रिटनपुढें नमावें लागणें आवश्यक होतें. राष्ट्रीय परंपरेच्या दृष्टीनें इटालियन जनता अत्यंत शांतताप्रिय व अल्पसंतुष्ट समजली जाई. युद्धाच्या दृष्टीनें आवश्यक असणाऱ्या लोखंड, दगडीकोळसा, पेट्रोल, ॲल्युमिनीयम यांपैकीं कसल्याच प्रकारची खनिजसंपत्ति इटलीच्या वांट्यास आली नव्हती.

पहिल्या महायुद्धांत इटलीनें आपल्या मित्रांविरुद्ध लंडनच्या गुप्त तहानुसार दोस्त राष्ट्रांच्या बाजूनें भाग घेतला. 'दुसऱ्यांनीं जेरीस आणलेल्या शत्रूच्या पाठींत खंजीर भोसकून कांहीं लभ्यांश मिळतो का' असें बिस्मार्कनें इटलीचें वर्णन केलें आहे. दोन्ही महायुद्धांत या वृत्तीचा

आविष्कार झालेला दिसून येतो. पहिल्या महायुद्धांत दोस्त राष्ट्रांना इटलीची युद्धमदत फारच महागांत पडली. दुर्बल इटलीच्या संरक्षणासाठीं दोस्त पलटणी इटलीच्या आघाडीवर आणणें भाग पडलें. इटलीच्या शत्रुत्वापेक्षां मैत्रीच महागांत पडतें हाच अनुभव जर्मनीला दुसऱ्या महायुद्धांत आला.

व्हर्सायच्या तहांत विजयी राष्ट्र या नात्यानें घबाड मिळवण्यासाठीं इंग्लंड व फ्रान्स यांच्या जोडीस इटलीनें तयारी केली. पण युद्धासाठीं ज्यांची एक पिढी गारद झाली होती अशा फ्रान्सचे नेते, कावेबाज इंग्रज मुत्सद्दी आणि ध्येयवादी विल्सन यांनीं जणूं इटलीविरुद्ध कट केला होता. इटलीच्या तोंडाला पानें पुसण्यांत आलीं. निराश व भग्नहृदयी ओरलँडोला स्वतःच्या राष्ट्राची झालेली वंचना असह्य झाली. पण दुर्बलांच्या केविलवाण्या किंकाळ्यांना सत्ता-राजकारणांत महत्त्व नसतें. इटालियन जनतेला आपण युद्ध जिंकलें पण आपल्या नेत्यांनीं शांततेची लढाई गमाविली असें वाटणें स्वाभाविक होतें. याच भावनेंतून वैफल्याची वृत्ति फैलावली. लोकशाहीविरोधी जनमत वृद्धिंगत झालें, व सर्वाधिकारशाहीच्या जन्माची पूर्वतयारी झाली.

मुसोलिनी हा एक समाजवादी पत्रकार होता. पहिल्या महायुद्धांत इटलीनें दोस्तांच्या बाजूनें युद्धांत पडावें या मताचा त्यानें पुरस्कार केला. त्यामुळें युद्धविरोधी समाजवादी पक्षांत मुसोलिनीला स्थान उरलें नाहीं. इटली युद्धांत पडतांच मुसोलिनीनें रणक्षेत्रावर धांव घेतली. जखमी होऊन परत आल्यावर त्यानें 'पोपोलो द इतालिया' या नव्या पत्राला सुरुवात केली. त्याच्या समाजवादी मतांचें संपूर्ण परिवर्तन झालें होतें. त्याच्या नव्या कल्पनांनुसार त्यानें राष्ट्रवादी फॅसिस्ट संघटनेला सुरुवात केली. १९२०–२२ या काळांत युद्धोत्तर इटलीची अवस्था अत्यंत शोचनीय होती. विजयी राष्ट्र असून पराभूत देशाचें खडतर जीवन त्याच्या नशिबीं आलें होतें. लोकशाहीवरील निष्ठा अस्तंगत होण्याच्या पंथास लागली

होती. समाजवादी व साम्यवादी पक्षांच्या उठावामुळें धनिक वर्ग चिंताग्रस्त झाला होता. चलनवाढ, बेसुमार किंमती व राजकीय दिवाळखोरी यांचा परिणाम अस्थिर जीवनांत झाला. याच परिस्थितीचा फायदा घेऊन मुसोलिनीनें धनिकांच्या व उद्योगपतींच्या साहाय्यानें स्वतःची लोकशाही व साम्यवादविरोधी पक्षसंघटना वाढविली.

१९२२ च्या ऑक्टोबर महिन्यांत मुसोलिनी 'रोमवर चालून' गेला. दुर्बल लोकशाही मंत्रिमंडळानें प्रतिकाराचा यत्किंचित् प्रयत्न न करतां मुसोलिनीच्या हातांवर सत्तेचें उदक सोडलें. इटालियन लोकशाहीची इतिश्री झाली. तीन वर्षांच्या अवधींत मुसोलिनीनें सर्व विरोधी पक्ष बेकायदा ठरवून व प्रसंगीं त्यांच्या नेत्यांचे खून पाडून पूर्णपणें नष्ट केले. अनियंत्रित सर्वाधिकारशाहीचा पहिला युद्धोत्तर आविष्कार म्हणून जग कुतूहलानें या प्रयोगाकडे पहात होतें. इटलींत सर्वाधिकारशाही कांहीं अंशीं यशस्वी झाली पण या यशाचें कारण शासनप्रकारांत सांपडत नसून तें आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या गुंतागुंतींत शोधावें लागतें. युद्धोत्तर काळांत राष्ट्रसंघ व सामुदायिक सुरक्षितता यशस्वी करण्याची जबाबदारी फ्रान्स व इंग्लंडवर होती. पण त्यांच्या परराष्ट्रीय धोरणांत युद्धकालीन ऐक्य राहिलें नाहीं. फ्रेंचाचें सारें लक्ष जर्मनीला खच्ची करण्याकडे गुंतलें होतें. त्यामुळें इटलीच्या सामर्थ्यवाढीकडे डोळेझांक करण्याची किंबहुना प्रसंगीं मदत करण्याची फ्रेंचांची तयारी होती. उलटपक्षीं ब्रिटनचा ओढा पूर्वेकडील साम्राज्याचें द्वार असलेला भूमध्य समुद्र सुरक्षित राखण्याकडे असणें स्वाभाविक होतें. त्या दृष्टीनें ब्रिटनला इटलीची सामर्थ्यवाढ अनिष्ट वाटत असे. भूमध्य समुद्राच्या बाबतींत तरी ब्रिटननें आपल्या धोरणाचें प्रबळ—इटली-विरोध हें सूत्र ठेवलें होतें.

लोकशाही राष्ट्रांच्या परस्परविरोधी धोरणाचा पुरेपूर फायदा हिटलर व मुसोलिनीनें घेतला. व्हर्सायच्या तहामुळें इटलीच्या साम्राज्यवादी

महत्त्वाकांक्षा अतृप्तच राहिल्या होत्या. थोड्या फार प्रमाणांत इंग्लंड व फ्रान्स यांनीं आपल्या आफ्रिकेंतील ओसाड वाळवंटाचें दान इटलीला दिलें होतें. पण रोमन साम्राज्याच्या वैभवाचीं स्वप्नें पडत असलेल्या मुसोलिनीचें समाधान झालेलें नव्हतें. त्यानें १९३५ मध्यें आफ्रिकेंत उरलेल्या एकुलत्या एक कृष्णवर्णीय राष्ट्रावर आक्रमण केलें. राष्ट्रसंघाचा सभासद असलेल्या चिमुकल्या ॲबिसीनियावर बॉंब व विषारी वायु यासहित हल्ला केला. रासतफारीच्या केविलवाण्या विनंतीचा फ्रान्स, ब्रिटन आदि राष्ट्रांनीं अव्हेर केला. मुसोलिनीचें हें आक्रमण हा केवळ ॲबिसीनीयाच्या जीवनमरणाचा प्रश्न नसून राष्ट्रसंघाच्या अस्तित्वाचा प्रश्न होता. आक्रमणाला पायबंद घालण्याची आलेली ही सुवर्णसंधि लोकशाही राष्ट्रांनीं वाया घालविली. त्यावेळीं इटलीला रोखठोक विरोध झाला असतां तर कदाचित् दुसरें महायुद्ध टळलें असतें. राष्ट्रसंघ बलिष्ठ झाला असता, व सामान्य जनतेला शांतता आणि सौख्यमय जीवन लाभलें असतें. पण लोकशाहीच्या नेत्यांनीं कर्तव्यपराङ्मुख होऊन आर्थिक बहिष्काराचें नाटक सुरू केलें, व २ वर्षांच्या अवधींतच इटलीच्या ॲबिसीनीयावरील स्वामित्वाला मान्यता दिली.

वरील प्रकरणांतूनच इटलीची जर्मनीशीं वाढती मैत्री निर्माण झाली. सुरुवातीला मुसोलिनीला वडीलकीचा मान मिळत असे. पण त्याच्या लक्षांत येण्यापूर्वीच वाढत्या लष्करी सामर्थ्याबरोबर अग्रपूजेचा मान जर्मनीकडे वळणें क्रमप्राप्त होतें. कालांतरानें मुसोलिनी हा जर्मन सत्ताधिकाऱ्यांच्या हातांतील एक बाहुलें बनला. फ्रॅंकोला मदत करण्यांत इटलीनें जर्मनी-बरोबरच भाग घेतला होता. पण जर्मन युद्धसाहित्य, तंत्रज्ञ आणि स्वयंसैनिक यांची बरोबरी करणें इटलीला शक्य झालें नाहीं. परिणामतः स्पेनमध्यें इटलीऐवजीं जर्मनीचें वर्चस्व वाढलें. मुसोलिनीवरील वाढत्या जर्मन प्रभावाचें दुसरें उदाहरण म्हणजे ऑस्ट्रियन एकीकरणाचें होय.

म्यूनिक करार घडवून आणणाऱ्या चौराष्ट्र परिषदेंत हिटलरच्या सर्व मागण्यांना पाठिंबा देण्यापलीकडे मुसोलिनीला दुसरें काम नव्हतें. जर्मन वर्चस्वाच्या आक्रमक दडपणाखाली इटली पुरेपूर सांपडला होता. वंशश्रेष्ठतेच्या साऱ्या कल्पनांना त्याज्य ठरविणाऱ्या मुसोलिनीला हिटलरच्या आज्ञावजा विनंतिनुसार इटलींत ज्यूविरोधी मोहीम आंखावी लागली.

पोलंडवरील जर्मन आक्रमण चालू असतांना मुसोलिनीनें महायुद्ध टाळण्याची खटपट केली होती. कारण युद्धतयारीच्या दृष्टीनें इटलीची परिस्थिति अगदीं निकृष्ट होती. पण फ्रान्स व इंग्लंड यांनीं पोलंडवरील आक्रमण थांबल्याखेरीज कोणत्याहि शांतता योजनेला मान देण्याचें नाकारलें. इटली लगेच युद्धांत पडेल अशीच अपेक्षा होती. पण इटलीची तटस्थता हिटलरला अधिक फायदेशीर होती. त्यामुळें इटली तटस्थ राहिला. फ्रान्सच्या पाडावानंतर इटलीनें केलेलें युद्धपदार्पण त्या राष्ट्राच्या आजवरच्या परंपरेस शोभणारेंच होतें. दुसऱ्या महायुद्धांत दोस्तसैन्याकडून मार खाणें व स्वसंरक्षणसुद्धां जर्मन फौजाकडून करून घेणें हीच इटलीची कामगिरी ठरली. आफ्रिकेंतील मार्शल ग्रॅझीयानीच्या पराभवापासून तों मुसोलिनीच्या १९४२ तील पदच्युतीपर्यंत इटालियन पराभवांची मालिकाच चालू होती. पदच्युत व बंदिस्त मुसोलिनीची जर्मन छत्रीधारी सैनिकांनीं सुटका केल्यानंतर उत्तर इटलींतील त्यांचें आसन जर्मनसामर्थ्यावरच अवलंबून होते. तें नष्ट होतांच मुसोलिनीचें पतन अपरिहार्य होतें. फॅसिस्टविरोधी गनिमी सैनिकांनीं त्याचा केलेला अमानुष वध व त्याच्या प्रेताची केलेली विटंबना या गोष्टी त्याची अप्रियता किती वाढली होती याच्या निदर्शक आहेत. त्याचबरोबर इटालियन जनतेच्या चंचल राजकीय चारित्र्यावरही प्रकाश टाकणाऱ्या आहेत.

प्राचीन रोमन वैभवाच्या दिवा-स्वप्नांत गुंग असणाऱ्या मुसोलिनीचें सत्ताराजकारणांतील महत्त्वाच्या तत्त्वांकडे दुर्लक्ष झालें. निर्धन, मागासलेल्या,

भर्मभोळया व शांतताप्रिय इटलीला युरोपच्या राजकारणांत पहिल्या मानाचें स्थान मिळणें निसर्गतःच अशक्य होतें. कारण त्या मानासाठीं लागणाऱ्या साधनाचें इटलीजवळ दुर्भिक्ष होतें. पण खोट्या महत्त्वाकांक्षांच्या आहारीं जाऊन या नकली सीझरनें केवळ आपलाच नव्हे तर आपल्या राष्ट्राचाहि घात केला. दोस्तांच्या मदतीनें १९४३ त मार्शल बाडोग्लियोनें बंडाचा झेंडा उभारतांच वीस वर्षांत निर्माण केलेली फॅसिस्ट शासनसंस्था पत्त्याच्या बंगल्याप्रमाणें कोसळून पडली. बाडोग्लियोच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या नव्या इटालियन सरकारनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. पुन्हां एकदां इटलीच्या विश्वासघातकीपणाचा जगाला प्रत्यय आला. या विश्वास-घाताचें बक्षीस दोस्तांनीं इटलीला युद्धोत्तर काळांत मदत करून दिलें. युद्धगुन्ह्याच्या आरोपांतून इटलीला मुक्तता मिळाली

निर्धन असलेल्या इटलीचें रणक्षेत्र बनल्यामुळें तिची अर्थव्यवस्था जमीनदोस्त झाली. अगदीं प्राथमिक गरजा भागविण्यासाठीं देखील संपन्न अमेरिकेच्या तोंडाकडे आशाळभूतपणानें पाहणें इटलीला भाग पडलें आहे. युरोपांतील अनेक राष्ट्रांप्रमाणें इटली हें अमेरिका व रशिया यांच्या राजकीय बुद्धिबळांतील एक प्यादें झालें आहे. अमेरिकेनें आपल्या आर्थिक मदतीच्या जोरावर रशियावर मात केल्याचें इटलींत तरी दिसतें. कारण, इटलीतील साम्यवादी पक्षाला पूर्वीपेक्षां लोकांचा पाठिंबा कमी झालेला असून साम्यवादविरोधी पक्षांच्या हातीं जनतेनेंच १९४८ च्या निवडणुकींत सत्ता दिली आहे. पश्चिम युरोपच्या रशियाविरोधी आघाडींत आज इटलीला सन्मानानें सामील करून घेण्यांत आलें आहे. युरोपांतील तथाकथित लोकशाही आघाडी, सभासद राष्ट्रें लोकशाहीवादी आहेत याविषयीं जागरूक नसून तीं रशियाविरोधी आहेत किंवा नाहींत इकडेच अधिक लक्ष पुरवतें.

जागतिक राजकारणांत नव्या इटलीला कसलेंच महत्त्वाचें स्थान नाहीं. आफ्रिकेंतील आपल्या जुन्या वसाहती परत मिळाव्यात यासाठीं

केविलवाणी याचना करण्यापलीकडे युद्धजर्जर इटली काय करणार? युद्धोत्तर पुनर्वसनासाठी अमेरिकेच्या तंत्रानुसार वागणें इतकेंच इटलीचें सध्यां इतिकर्तव्य झालें आहे. पण इटलींत साम्यवादी क्रांति होणें पाश्चिमात्य राष्ट्रांना हितावह नसल्यानें इटलीला भूमध्य राजकारणांत थोडें फार महत्त्व आलेलें दिसतें. इटली साम्यवादी झाल्यास पाश्चिमात्य राष्ट्रांची ही बाजू लष्करी दृष्ट्या उघडी पडेल, व रशियन सैन्याला थोपवून धरणें अशक्य होईल. याचा अर्थ आजच्या जागतिक राजकारणांत इटलीचें महत्त्व केवळ अकरणात्मक आहे.

## जपान

१८५३ सालीं कमॉडॉर पेरीच्या तोफगोळयांनीं निद्रिस्त जपानची धुंदी खाडकन् उतरली. लहानशा बेटांत स्वतःला गुरफटून घेऊन राहण्याचें स्वातंत्र्य देखील नव्या जगांत शक्य नाहीं हें दृष्टोत्पत्तीस येतांच जपान ईर्षेनें सत्ता संपादनाच्या मागें लागला. 'मेइजी' क्रांतीमुळें सरंजामशाही जपानचें एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं आधुनिक, उद्योगप्रवण व सामर्थ्यशाली 'निप्पॉन'मध्यें रूपांतर झालें. पाश्चात्य कला, विज्ञान, औद्योगिक तंत्र या सर्वांचा जपाननें आपलें स्वत्व न सोडतां हिरीरीनें अंगिकार केला. जपानमध्यें घडून आलेल्या या कायाकल्पाची जाणीव १९०५ मध्यें रशियावर मिळविलेल्या विजयानें जगाला आली. जपानच्या या विजयाला अनेक दृष्टींनीं महत्त्व आहे. १८ व्या व १९ व्या शतकांत भौतिक संस्कृतीच्या व औद्योगिक सामर्थ्याच्या जोरावर पाश्चात्यांनीं गौरेतरांना गुलाम बनविले. त्यामुळें श्वेतवर्णीयांच्या वांशिक श्रेष्ठतेची खोटी व भ्रामक कल्पना जगभर पसरली. तिला आळा घालण्याचें कार्य या विजयानें केलें. आशियाई राष्ट्रांतील पददलित जनतेंत आत्मविश्वास निर्माण केला. आशियाई राष्ट्रवादाचे विचार फोफावूं लागले. जपानचें जागतिक राजकारणांतील वजन झपाट्यानें वाढलें.

ब्रिटन, अमेरिका, फ्रान्स या राष्ट्रांनीं नवोदित जपानचें प्रशान्त महासागरांतील विशेष स्थान मान्य केलें. १९१० मध्यें जपाननें कोरिया गिळला. पण युरोपियन राष्ट्रांनीं त्याला विरोध केला नाहीं. पहिल्या महायुद्धांत जपाननें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारून प्रशान्त महासागरांतील जर्मनांकित प्रदेश बळकावला. १९१५ मध्यें जपाननें चीनला आपल्या कुप्रसिद्ध २१ मागण्या सादर केल्या. बड्या राष्ट्रांचें लक्ष महायुद्धांत गुंतलें असल्यानें दुर्बल चीनला जपानच्या मागण्या मान्य कराव्या लागल्या. चिनी विजयामुळें जपानचें धाडस अधिकच वाढलें. १९१८ मध्यें जपाननें मांच्यूरिया, साखलीन बेट, पूर्व सैबेरिया इत्यादि प्रदेशावर आपलें प्रभुत्व स्थापन केलें. पण इंग्लंड–अमेरिकेच्या संयुक्त दडपणाखालीं जपानला थोडें फार नमतें घ्यावें लागलें. लाल सेनेनें जपानची सैबेरियांतून हकालपट्टी केली. पण जपाननें फारसे श्रम न करतां भरपूर कमाई केली होती. आर्थिक दृष्ट्या पूर्वेकडील बाजारपेठांत जपानी स्पर्धेपुढें ब्रिटिश आणि अमेरिकन उद्योगधंदे टेकीस आले होते. अमेरिका व इंग्लंड यांनीं जपानच्या नाविक सामर्थ्याला अनुक्रमें १०: १०: ७ या प्रमाणांत मान्यता दिली होती. या सर्व गोष्टींचा विचार करतां पहिल्या महायुद्धानंतर जपानचें नांव बड्या राष्ट्राच्या मालिकेंत कां आलें तें कळूं शकतें. युद्धोत्तर काळांतील जपानकडे वळण्यापूर्वीं कांहीं गोष्टींचा उल्लेख करणें अवश्य आहे. जपानमधील सरंजामशाही नष्ट झाली असली तरी आठ झायबत्सु घराण्यांच्या एकाधिकारी नियंत्रणाखालीं साऱ्या जपानच्या आर्थिक व औद्योगिक नाड्या केंद्रित झाल्या होत्या. जपानी समाजव्यवस्थेंत राजवंशाचें व मिकॅडोचें स्थान अनन्यसाधारण होतें. बौद्ध व ख्रिश्चन धर्म यांच्या जोडीला राजाला ईश्वरी अंश मानणाऱ्या राजपूजकांचा नवा शिंटो धर्म वाढीस लागला होता. अशा परिस्थितींत पाश्चात्य स्वरूपाच्या लोकशाहीनें जपानमध्यें मूळ न धरणें स्वाभाविकच होतें.

जागतिक मंदीचा परिणाम जपानमधील लोकशाहीविरोधी शक्ति संघटित व वृद्धिंगत होण्यांत झाला. सामाजिक व आर्थिक जीवनांतील अस्थिरता व असुरक्षितता यांचा परिणाम लष्कराचें व नाविक दलाचें राजकारणांतील महत्त्व वाढविण्यांत झाला. जपानची अर्थव्यवस्था ही पाश्चात्य उद्योगप्रधान राष्ट्रांप्रमाणें नाजूक प्रकृतीची झाली होती. मंदींतून मार्ग काढण्यासाठीं व सामान्य जनतेचें लक्ष अन्यत्र वेधण्यासाठीं लष्करी अधिकाऱ्यांनीं साम्राज्यवादी आक्रमणाचा मार्ग चोखाळण्यास सुरुवात केली. या मार्गांत विरोधी असलेल्या शांतताप्रिय मुत्सद्यांचें वेळप्रसंगीं खून पाडण्यांत आले. १९३१ मध्यें मुकडेन प्रकरणापासून सुरुवात होऊन जपाननें चार वर्षांच्या अवधींत संपूर्ण मांच्यूरिया व बराचसा उत्तर चीन आपल्या वर्चस्वाखालीं आणून तेथें नामधारी सरकारें उभीं केलीं. या सगळ्या प्रकरणांत राष्ट्रसंघानें केलेली अक्षम्य दिरंगाई, प्रबळ जपान-विरुद्ध दुर्बल चीनला मदत न देण्याचें बड्या राष्ट्रांचें धोरण व जपानचा राष्ट्रसंघ त्याग यांचा विचार केला म्हणजे सत्ताराजकारणांतील राष्ट्रसंघाचे व जपानचे परस्पर संबंध स्पष्ट होतात.

१९३६ मध्यें जपाननें जर्मनीबरोबर कम्युनिझमविरोधी तह केला. जपानच्या अंतर्गत राजकारणांत वृद्धिंगत झालेल्या एकांतिकतेचें तें एक लक्षण होतें. जपानमधील लष्करी अधिकाऱ्यांनीं स्थापन केलेल्या सत्तेचा तोंडवळा बहुतांशीं फॅसिस्ट सर्वाधिकारशाहीचाच होता. त्यामुळें जपानचें परराष्ट्रीय धोरण फॅसिस्ट राष्ट्रगटाला अनुकूल व लोकशाही राष्ट्रांना प्रतिकूल झालें. युद्धोत्सुक लष्करी अधिकाऱ्यांनीं सोव्हिएट रशिया व लोकशाही राष्ट्रें यांच्याशीं कुरापत काढणें इष्ट नसल्यानें चीन प्रकरण उपस्थित केलें. चीन-मधील अंतर्गत राजकारणांत कॉमिन्टॉंग व कम्युनिस्ट यांच्यांतील यादवी पराकोटीला पोंचली होती. त्यामुळें जपानला चीनमध्यें हातपाय पसरणें शक्य झालें. पण चीनच्या प्रचण्ड मनुष्यबळापुढें व विस्तारापुढें जपानचा टिकाव लागणें कठीण होतें. आणि अशा परिस्थितींत दुसरें महायुद्ध सुरू झालें.

चीन प्रकरणांत हात गुंतले असल्यानें जपाननें प्रथमतः संपूर्ण तटस्थता स्वीकारली. १९४१ मध्यें जपाननें रशियाशीं अनाक्रमणाचा तह केला. जागतिक राजकारणांतील अनेक कोड्यापैकीं हें एक आहे. कारण रशियाविरोध हा जपानचा स्थायीभाव होता. १९४१ सालीं सुरू झालेल्या जर्मन चढाईच्या वेळीं जपाननें रशियावर पूर्वेकडून स्वारी केली असती तर कदाचित् युद्धाचा निकाल फॅसिस्ट राष्ट्रांना अनुकूल लागण्याचा अधिक संभव होता. अमेरिकेंत तटस्थतेची भावना प्रबळ होती. अर्थात् आज असा विचार करणें केवळ स्वप्नरंजन आहे. १९४१ च्या डिसेंबर महिन्यात जपाननें पर्लहार्बरवर विश्वासघातानें हल्ला चढवून अमेरिकेच्या प्रशान्त सागरी दलाला जलसमाधि दिली. अमेरिका युद्धांत पडली. सुरुवातीच्या दोन वर्षांत जपानचें अधिराज्य फिलिपाईन्स, हिंदु-चीन, सयाम, मलाया, ब्रह्मदेश, हिंदेशिया आणि अनेक लहान मोठीं बेटें यांच्यावर स्थापन झालें. प्रशान्त महासागरांतून अँग्लो-अमेरिकनांची जणूं पूर्ण उचलबांगडी करण्याचाच जपानचा निर्धार होता. पण युद्धदेवता सतत जपानला अनुकूल राहिली नाहीं. १९४४ आणि १९४५ मध्यें जपानचें अल्पकालीन साम्राज्य संपुष्टांत येऊन खुद्द जपान सतत बॉंब वर्षावामुळें टेकीस आला. त्यांतच जर्मनीच्या शरणागतीची भर पडली. जपानचा पराभव अटळ झाला अणुबॉंबच्या प्रचंड विध्वंसामुळें जपानचें कंबरडें मोडलें. १४ ऑगस्ट, १९४५ रोजीं जपाननें संपूर्ण शरणागति पत्करली. २००० वर्षांची स्वातंत्र्याची अखंड परंपरा असलेल्या जपानला आणि मिकॅडोला अमेरिकन सेनाधीशांपुढें नमावें लागलें. मिकॅडोला युद्ध गुन्हेगार न ठरविण्याचें सोईस्कर औदार्य अमेरिकन नेत्यांनीं दाखवलें. अमेरिकेच्या लष्करी अंमलाखालीं एक नामधारी बाहुलें म्हणून त्याचें अस्तित्व टिकवण्यांत आलें.

जपानचा पराभव झाला पण आशियांतील युद्ध परिणामीं जपानपेक्षां दोस्त राष्ट्रांनाच महागांत पडलें. युद्धकाळांत जपाननें स्वतःच्या हितासाटीं वाढीस लावलेल्या श्वेतवर्णीयांच्या द्वेषाग्नींत राष्ट्रवादाच्या घृताचें सिंचन

होऊन युरोपीय साम्राज्यशाहीविरुद्ध सर्व आशियांत प्रचंड स्फोट झाले. या राष्ट्रवादी स्फोटांत श्वेतवर्णीयांच्या वर्चस्वाची, पाश्चात्य साम्राज्यशाहीची आणि प्रतिगामी राजकीय शक्तींची आहुति पडली. १८ व्या व १९ व्या शतकांत आशियांत आलेल्या युरोपला विसाव्या शतकांत मोठ्या नामुष्कीनें काढता पाय घ्यावा लागला. या प्रचण्ड ऐतिहासिक घडामोडींत अनेक आशियाई राष्ट्रें स्वतंत्र झालीं. चीनमधील प्रतिगामी कॉमिन्टाँग सत्ता संपुष्टांत आली. परतंत्रराष्ट्रांत स्वातंत्र्याच्या चळवळी उफाळल्या. या युगप्रवर्तक घटनांचें श्रेय कांहीं अंशीं जपानला द्यावें लागतें. जपानच्या प्रतिगामी साम्राज्य प्रसाराचा हा क्रान्तिकारक परिपाक होता.

जपानची आर्थिक व्यवस्था युद्धाच्या बोजानें अगोदरच खचली होती. अविरत बॉंबवर्षावामुळें औद्योगिक केंद्रांची अगणित हानि झाली होती. हिरोशिमा व नागासाकी यांच्या अणुविध्वंसानें त्यांत भर पडली. पराभवानंतर अनेक देशांत पसरलेल्या जपान्यांची हकालपट्टी जपानमध्यें झाली. वाढती लोकसंख्या, नष्ट झालेलें साम्राज्य, कोलमडलेली अर्थव्यवस्था आणि हताश झालेली जनता या परिस्थितींत जनरल मॅकार्थरच्या नेतृत्वाखालीं जपाननें पुनः एकदां लोकशाहीच्या प्रयोगाला सुरवात केली. लोकशाहीविरोधी असा झायबत्सु घराण्यांचा आर्थिक एकाधिकार, मिकॅडोची राजपूजा, सरंजामशाही कृषिव्यवस्था यांना तिलांजलि देऊन सार्वत्रिक मताधिकार लोकशाही राजकीय पक्ष, मजूर संघटना व अनिर्बंध निवडणुकी या लोकशाहीच्या आवश्यक घटकतत्वांना जपानी भूमींत रुजविण्याचें प्रयत्न चालू आहेत.

सोव्हिएट रशियानें ९ ऑगस्ट, १९४५ रोजीं जपानविरुद्ध युद्ध पुकारलें, व अवघ्या चार दिवसांतच जपाननें शरणागति पत्करली. रशियानें शेवटच्या क्षणाला युद्ध पुकारण्याची केलेली घाई ही भावी राजकारणाची निदर्शक होती. जपानचा पराभव एकट्या अमेरिकेनें केला त्यामुळें पराभूत जपानवर अमेरिकेचें अधिराज्य असावें, इतर दोस्त राष्ट्रांनीं फार तर सल्लागार म्हणून रहावें या विचारसरणीचें प्राबल्य अमेरिकेंत होतें.

रशियाविरोधी मॅकार्थरला जपानचा प्रशासक नेमण्यांत आलें. मॅकार्थरनें आपल्या राजवटींत रशिया अगर दोस्त राष्ट्रांना जपानच्या अंतर्गत व्यवस्थेंत कधींच ढवळाढवळ करून दिली नाहीं. अमेरिका व सोव्हिएट रशिया यांच्यांतील वाढत्या बेबनावामुळें पराभूत जपानचें महत्त्व वाढत आहे. रशियाविरोधीं आघाडींत पश्चिम जर्मनीप्रमाणें जपानला सामील करून नेण्यासाठीं अमेरिका उत्सुक झाली आहे. कारण चीनमधील साम्यवादी क्रांतीमुळें प्रशांत महासागरांतील सत्ता समतोलन नष्ट झालें. शिवाय अमेरिकेची सारी संरक्षणफळीच धोक्यांत आली. जपानला दुर्बळ ठेवल्यास रशियन सान्निध्यांमुळें तेथेंहि साम्यवादी क्रांति होण्याचा संभव वाढला आहे. उलटपक्षीं जपानला लष्करी दृष्ट्या सामर्थ्यसंपन्न करणें कितपत हितावह ठरेल याचा विचार अमेरिकन नेत्यांना भेडसावीत आहे. पराभूत जपान नागासाकी व हिरोशिमोचें अणुविध्वंसन विसरला नाहीं. अमेरिका-द्वेष कायम आहे. जपानची लोकसंख्या १० कोटींच्याजवळ आहे. आशिया खंडांत एकट्या जपानजवळच आधुनिक औद्योगिक तंत्र व अर्थव्यवस्था आहे. अशा परिस्थितींत पुनरुज्जीवित जपान रशियाविरोधाऐवजीं पुनः एकदां प्रशांत महासागरांत आपलाच प्रतिस्पर्धी बनून शह देईल कीं काय अशी धास्ती अमेरिकेला वाटतें. पण रशियाविरोधासाटीं जपानचें पुनर्लष्करीकरण करणें अमेरिकेला भाग पडत आहे. मॅकार्थर हा जपानच्या पुनर्लष्करीकरणाचा कट्टर पुरस्कर्ता होता.

सत्ता-राजकारणांतील विचित्र शय्या-मैत्रीचें पश्चिम जर्मनीप्रमाणेंच जपान हें चांगलें उद्बोधक उदाहरण आहे. नवोदित आशियाच्या नेतृत्वासाठीं नवचीन व भारत यांच्याप्रमाणेंच भविष्यकाळांत महत्त्वाकांक्षी व उद्योगप्रवण जपान प्रयत्न केल्याखेरीज राहणार नाहीं. आजचा पराभूत जपान असाच निर्धन व दुर्बल राहणें अशक्य आहे. बदलत्या जागतिक परिस्थितीचा स्वतःच्या राष्ट्राला बलसंपन्न करण्याकडे कसा उपयोग करावयाचा या कूट नीतीचे धडे जपानला नव्यानें द्यावयाची गरज आहे कां?

औद्योगिक क्रांति १७५० सालीं सुरू झाली, असें सामान्यतः मानण्यांत येते. त्या दृष्टीनें पाहतां बरोबर एक शतकानंतर मार्क्स व एंजल्स यांनीं १८४८ सालीं जगांतील मजूर वर्गाला एकजूट करण्याचें आवाहन केलें. तेव्हांपासून नव्या समाज रचनेच्या कल्पना व विचार अधिकाधिक प्रसार पावूं लागल्या. पण या नव्या समाजरचनेला मूर्त स्वरूप मिळण्यासाठीं १९१७ साल उजाडलें. भांडवलशाही समाजरचनेंत बहुसंख्य श्रमिक वर्गाची होणारी पिळवणूक, अत्यंत थोड्या धनिकांच्या हातीं केंद्रित होत जाणारें भांडवल, समाजाची शोषक व शोषित या दोन प्रमुख वर्गांत होणारी विभागणी आणि या दोघांचे अटळ असे वर्गकलह–यांतून मार्ग काढण्यासाठीं मार्क्सनें मजुरांना साम्यवादी क्रांतीचा मार्ग दाखविला. धनिक व वरिष्ठ सत्ताधारी वर्गाचा हृदयपालट होणें कालत्रयीं शक्य नाहीं. म्हणून त्याचें उच्चाटन व निर्मूलन करणें हेंच आवश्यक व म्हणून इष्ट आहे. हें निर्मूलन कायदेशीर मार्गांनीं करणें कधींच शक्य नाहीं. कारण राज्यसंस्था धनिक वर्गाची बटीक असते. तेव्हां शोषित वर्गाला सशस्त्र क्रांतीचाच एकमेव मार्ग उरतो. शोषक वर्गाची सत्ता व मत्ता नष्ट केल्यानंतर साऱ्या समाजाचें वर्गविहीन स्वरूप निर्माण होण्यास कोणतीच आडकाठी राहणार नाहीं, पण हें स्वरूप तात्काळ निर्माण होणें शक्य नाहीं. अनेक शतकें रुजलेली समाजव्यवस्था तडकाफडकी नाहींशी होऊं शकत नाहीं. अप्रत्यक्षरीत्या भांडवलशाही समाजरचनेचे परिणाम कांहीं काळ चालूच राहतील. ते समूळ नष्ट करण्यासाठीं क्रांतीनंतरच्या संक्रमण-काळांत मजूर वर्गाला सर्वशासक सत्ता केवळ आपल्याच हातीं ठेवावी लागेल. दुसऱ्या शब्दांत मजूरवर्गाची सर्वाधिकारशाही निर्माण करावी लागेल. पण हा संक्रमणकाल किती लांबेल याचा अंदाज मार्क्स अगर

त्याचे अनुयायी यांपैकीं कोणीच देत नाहींत. याच संक्रमणकाळांत निर्माण झालेली मजुरांची सर्वाधिकारशाही (प्रत्यक्षांत त्या वर्गाचें नेतृत्व करणाऱ्या कम्युनिस्ट पक्षाची व पक्षनेत्याची सर्वाधिकारशाही) सत्तापिपासू बनून सत्ता सतत आपल्याच हातीं राहावी याकरतां समाजविरोधी बनणार नाहीं याची तरी खात्री कोणाला देतां येईल? ध्येयवादी सत्ताधारी वर्ग किंवा पक्ष स्वतः होऊन सत्तेचाच त्याग करील अशी अपेक्षा बाळगणें योग्य असलें तरी संभाव्य मात्र कमी आहे. कारण आजवरच्या सत्तेच्या भस्मासुराचा ऐतिहासिक अनुभव मात्र या सोज्वळ अपेक्षेच्या विरुद्ध आहे. पण जगांत केवळ इतिहासाची पुनरावृत्तीच घडते, नवीन कांहीं घडतच नाहीं असें समजणेंहि चुकीचें होईल.

मार्क्सच्या अपेक्षेविरुद्ध साम्यवादी क्रांति इंग्लंड जर्मनीसारख्या औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रांत न होतां रशियासारख्या कृषिप्रधान व मागासलेल्या देशांत घडून आली. रशियन क्रांतिकारकांना जर्मनींत व इतर युरोपियन राष्ट्रांत लगेच क्रांति घडून येईल असें वाटत होतें. पण तसेंहि घडलें नाहीं. या अपेक्षाभंगांतून लेनिनच्या मृत्यूनंतर त्याच्या सहकाऱ्यांत मतभेद निर्माण झाले. विश्वक्रांतीचा पुरस्कर्ता ट्रॉट्स्की व रशियांत प्रथम साम्यवाद बळकट करण्याच्या योजनेचा पुरस्कर्ता स्टॅलिन या दोघांच्या संघर्षामुळें आंतरराष्ट्रीय साम्यवादाला निराळेंच वळण लागलें. क्रांतीनंतरच्या संक्रमणकाळांत मार्क्सप्रणीत तात्पुरती मजूर सर्वाधिकारशाही निर्माण होण्याऐवजीं क्रांतींत प्रमुख असलेल्या सुसंघटित असलेल्या कम्युनिस्ट पक्षाची कायमची सर्वाधिकारशाही निर्माण झाली. ३५ वर्षांनंतर देखील ही सर्वाधिकारशाही नष्ट होऊन सत्तेचीं सूत्रें सर्वसामान्य जनतेच्या हातीं जाण्याची यत्किंचित्‌हि चिन्हें दिसत नाहींत. मार्क्सप्रणीत विश्वक्रांतीचें ध्येय बाजूस सारून स्टॅलिनच्या नेतृत्वाखालीं रशियानें एका राष्ट्रांतील साम्यवादी समाजरचना निर्माण करण्याकडे अधिक लक्ष दिलें. साम्यवादी तत्त्वज्ञानाला स्टॅलिननें दिलेली कलाटणी म्हणजे क्रांतीचा घात आहे, असें

ट्रॉट्स्कींचें म्हणणें होतें. दुसऱ्या महायुद्धांत रशियांत झालेली राष्ट्रवादाची वाढ हीदेखील मार्क्सवादाला धरून आहे असें म्हणणें योग्य होईल कां? राष्ट्रवादाचें रोपटें साम्यवादी वातावरणांतहि जोमानें वाढूं शकतें. याचा अधिक निश्चित् पुरावा म्हणजे टिटोचा युगोस्लाव्हिया होय.

साम्यवादाचें आजचें स्वरुप समजण्यासाठीं साम्यवादी तत्त्वज्ञान व सोव्हिएट रशियानें राष्ट्र या नात्यानें केलेलें राजकारण यांत फारकत करावी लागते. सोव्हिएट रशियानें इतर देशांप्रमाणेंच आंतरराष्ट्रीय राजकारणांत देशहितासाठीं व सत्ताराजकारणास्तव ज्या अनेक सोईस्कर गोष्टी केल्या त्यांना साम्यवादाची कसोटी लावून चालणार नाहीं. किंबहुना तसा प्रयत्न केल्यास त्यांत विरोधाभास व कदाचित् तत्त्वच्युति आढळेल. युद्धपूर्व काळांतील रूसो-जर्मन अनाक्रमणाचा तह हें या विरोधाभासाचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून देतां येईल. आंतरराष्ट्रीय साम्यवादाची प्रगति व सोव्हिएट रशिया या राष्ट्राचें वैभव यांची सांगड घातली गेली आहे. सोव्हिएट रशियांतील नागरिकांना साम्यवाद व राष्ट्रनिष्ठा यांच्यांत संघर्ष आढळून येत नाहीं. पण रशियाबाहेरच्या देशांत साम्यवादनिष्ठा आणि राष्ट्रनिष्ठा यांच्यांत संघर्ष निर्माण होतो. वर उल्लेखिलेलें युगोस्लाव्हियाचें उदाहरण या दृष्टीनें उद्बोधक आहे. पण हा संघर्ष केवळ त्या देशापुरताच मर्यादित आहे असें नाहीं. तर पूर्व युरोपांतील सगळ्या साम्यवादी राष्ट्रांसमोर तो बिकट पेंच आहे. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत पाश्चात्य साम्राज्यवादाला आपण विरोध करीत आहों व अंतर्गत भांडवलदारांच्या क्रांतिविरोधी चळवळींना हाणून पाडण्याचें कार्य करीत आहोंत असें वाटेपर्यंत ठीक आहे. पण मास्कोच्या अर्थव्यवस्थेसाठीं स्वतःच्या राष्ट्राच्या हितविरोधी अशी अर्थव्यवस्था स्वीकारण्याचा प्रसंग ओढवल्यावर दोनच मार्ग संभवतात. पहिला सोपा मार्ग म्हणजे मास्कोचें म्हणणें मान्य करणें. दुसरा मार्ग अर्थात्च टिटोप्रमाणें बंडखोरी करून स्वतःच्या राष्ट्राचें हित साधणें. सोव्हिएट रशियाबाहेरील कम्युनिस्ट पक्षांना रशियाच्या सत्ताराज-

कारणांतील डावपेंचाप्रमाणें आपले तात्विक 'प्रबंध' अनेकदां बदलावे लागतात. उदाहरणार्थ जर्मन कम्युनिस्ट पक्षाचा आग्रह साऱ्या जर्मनीचें एकीकरण व्हावें असा आहे. पण सोव्हिएट रशियाच्या संमतीनें साम्यवादी पोलंडनें पूर्व जर्मनीचा एक मोठा लचका गिळतांच जर्मन कम्युनिस्ट पक्षाला पोलंडच्या कृत्याला मान्यता द्यावी लागते. इतकेंच नव्हे तर त्याचें समर्थन करावें लागतें.

१८४८ ते १९४८ या एका शतकांत साम्यवादी तत्त्वज्ञान जगभर पसरलें. मार्क्सच्या नंतर निर्माण झालेले कोणतेहि राजकीय विचार एकतर मार्क्सविरोधी असतात अथवा मार्क्सला अनुकूल असतात. पण मार्क्सला वगळून, त्याची उपेक्षा करून चालत नाहीं. गीता, बायबल, कुराण या धर्मग्रंथाप्रमाणें मार्क्सच्या 'कॅपिटल' या ग्रंथानें जगाच्या इतिहासाचा प्रवाह बदलविला. जगाच्या लोकसंख्येपैकीं सुमारें ⅓ लोकसंख्येने— ७० कोटी साम्यवादाचा अंगिकार केला आहे. साम्यवादाचें हें यश कशांत सांठविलेलें आहे याचा विचार केल्यास साम्यवादाच्या दोन प्रमुख विशेषांकडे लक्ष वेधतें. मार्क्सनें आपल्या तत्त्वज्ञानाची उभारणी शास्त्रीय आधारावर केल्याचें आग्रहानें प्रतिपादिलें. साम्यवादी अनुयायांना या शास्त्रीय आधारामुळें आपलें तत्त्वज्ञान इतर अशास्त्रीय तत्त्वज्ञानापेक्षां वरच्या दर्जाचें आहे असें प्रामाणिकपणें वाटतें. पण यापेक्षांहि महत्त्वाची गोष्ट म्हणजे मार्क्सचें विरोधविकासाचें तत्त्व. त्याच्या द्वारें त्यानें मानवी समाजाच्या विविध अवस्था पूर्वीच्या अवस्थेंतून संघर्षाच्या द्वारें निर्माण झाल्याचें पद्धतशीरपणें सिद्ध केलें. याचा अर्थ भांडवलशाहींतून साम्यवादी समाजरचना निर्माण होणें ही एक ऐतिहासिक अटळ घटना आहे. साम्यवादाच्या यशासाठीं झटणें म्हणजे इतिहासाच्या या स्वाभाविक व अपरिहार्य घटनेला परिणत करण्यांत सहभागी होणें होय, असा दुर्दम्य आत्मविश्वास साम्यवाद्यांना वाटतो. साम्यवादी हा मूलतः जबरा आशावादी असतो. संघर्ष, रक्तपात, क्रांति अनिवार्य असलीं तरी वर्गविहीन समाजरचना अस्तित्वांत आल्यानंतर

साऱ्या मानवजातीला अत्यंत सुखाचे व वैभवाचे दिवस येतील असा त्याला ठाम विश्वास वाटतो. अर्नाल्ड टॉयन्बी किंवा स्पेंग्लर यांच्याप्रमाणें पाश्चात्य संस्कृतीच्या भावी ऱ्हासाविषयीं तो निराश झालेला नाहीं. तुलनात्मक दृष्टीनें पाहतां साम्यवादविरोधी विचारवंतांत साम्यवाद्यांच्या ठिकाणीं असलेला हा आत्मविश्वास व आशावाद आढळून येत नाहीं. उलट मानवी समाजाचे प्रश्न आज घटकेस इतके बिकट झालेले आहेत कीं मानवी बुद्धि हे प्रश्न सोडविण्यांत कितपत यशस्वी होईल याची त्यांना जबरदस्त शंका वाटते. साम्यवादाच्या यशाचें कांहीं अंशीं कारण तरी लोकशाही राष्ट्रांतील आत्मविश्वासाचा अभाव आहे.

## रशिया

भूप्रदेश व लोकसंख्या या दोन्ही दृष्टींनीं युरोपांतील इतर सर्व राष्ट्रांपेक्षां प्रचण्ड असलेलें हें राष्ट्र पहिल्या महायुद्धापर्यंत औद्योगिक राजकीय व सांस्कृतिक दृष्ट्या अत्यंत मागासलेलें होतें. १९०५ मधील रूसो-जपान युद्धांत झालेल्या अनपेक्षित पराभवामुळें रशियाची लष्करी दृष्ट्या बरीच नाचक्की झाली. रशियन राजसत्ता अनियंत्रित व जुलमी होती. पहिल्या महायुद्धापूर्वी रासपुतीनसारख्या अनाचारी, दुर्व्यसनी व विकृत मनोवृत्तीच्या दुष्ट धर्मोपदेशकाचें झार व झरीना यांच्यावरील वर्चस्व पराकोटीला गेलें होतें. उदारमतवादी व लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्या समाजांतील वरच्या वर्गांना परिस्थिति बदलण्याची इच्छा असूनहि शक्ति नव्हती. शोषित श्रमजीवी वर्गाची सहानुभूति साम्यवादी पक्षाकडे होती. पण १९०५ च्या अयशस्वी उठावानंतर पुनः प्रयत्न करण्यास लागणारी संधि आलेली नव्हती. सामान्य जनतेच्या अनिच्छेची पर्वा न करतां झारनें आपल्या खोट्या आकांक्षांना बळी पडून पहिल्या महायुद्धांत भाग घेतला. रशियाच्या सैन्याची युद्धतयारी अत्यंत कमी दर्जाची होती. त्यांचे सेनानी निकृष्ट प्रतीचे होते. साधनसामुग्रीचा अभाव

होता, व रशियन सैनिकांच्या मनांत युद्धाविषयीं अप्रीति होती. या परिस्थितींत पूर्व आघाडीवर सुसज्ज जर्मनसेनेची गांठ पडतांच हिंडेनबुर्गनें त्यांची दाणादाण उडवावी यांत आश्चर्य नाहीं. उलट प्रचण्ड मनुष्यहानि, खाण्यापिण्याचे हाल, जखमी सैनिकांच्या योग्य शुश्रूषेचा अभाव हे सर्व असतांना रशियन फौजा १९१७ पावेतों तरी लढत राहिल्या हेंच आश्चर्याचें आहे. युद्धांतील पराभवांचे परिणाम युद्धक्षेत्रापुरतेच मर्यादित न राहतां त्यांचा सर्व समाजावर प्रभाव पडला. उपासमारीला कंटाळलेल्या कामगारांनीं सर्वत्र संप पुकारले. युद्धाला विटलेल्या सैनिकांनीं बंड उभारलें. देशव्यापी दंगेधोपे सुरू झाले आणि जगांतील पहिल्या दर्जाची अनियंत्रित सत्ता पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें कोलमडून पडली. १९१७ च्या मार्च महिन्यांत राज्यक्रांति होऊन झारला पदच्युत करण्यांत आलें. केरेन्स्कीच्या नेतृत्वाखालीं उदारमतवादी लोकशाही स्वरूपाची राजवट सुरू झाली. पण या राजवटीला बहुसंख्य जनतेचा पाठिंबा मिळू शकला नाहीं. कारण त्यांनीं युद्ध थांबविण्याचें नाकारलें व सर्वसामान्य जनता युद्धजन्य आपत्तींनीं इतकी जिकिरीला आली होती कीं युद्धविरोध हा तिचा स्थायीभाव झाला होता. नव्या राजवटीला शोषित वर्गांच्या प्रतिनिधींचें सहकार्य मिळणें अशक्य होतें. भांडवलदारी लोकशाहीनें त्यांचें समाधान होणारें नव्हतें. समाजक्रांति होऊन सत्ता शोषित जनतेच्या हातीं येईल व नवीन वर्गविहीन समाजव्यवस्था निर्माण होईल अशा विचारांनीं ते भारले होते. केरेन्स्की राजवटीचें आयुष्य केवळ सात महिन्यांचें ठरलें. १९१७ च्या नोव्हेंबर महिन्यांत लेनिनच्या नेतृत्वाखालीं बोल्शेव्हिक पक्षानें शेतकरी व मजुरांच्या मदतीनें उठाव करून सर्व सत्ता काबीज केली. एका दृष्टीनें रशियांतील या क्रांतीचें श्रेय जर्मन सेनानींना द्यावें लागतें. कारण रशियांतील पहिल्या क्रांतीनंतर रशियांत अधिक गोंधळ माजावा व शक्यतों रशियानें युद्धांतून अंग काढून घ्यावें या दुहेरी हेतूनें जर्मन सेनाप्रमुखांनीं स्वित्झर्लंडमध्यें निर्वासित असलेल्या लेनिनला

एक सीलबंद डब्यांतून रशियांत पोचतें केलें. जर्मनसेनाधिकाऱ्यांचा कयास खरा ठरला. रशियांत आल्यापासूनच लेनिननें बोल्शेव्हिक पक्षाची सूत्रें हातीं घेतलीं. साम्यवादी क्रांति यशस्वी होण्याचें अधिकांश श्रेय लेनिनच्या संघटनाचातुर्याला व अजोड नेतृत्वाला देण्यांत येतें. अर्थात्च जागृत झालेल्या रशियन जनतेच्या हार्दिक सहकार्याशिवाय लेनिन किंवा इतर कोणीहि क्रांति घडवून आणूं शकला नसता. केवळ सुसंघटित प्रभावी नेतृत्व क्रांतीला पुरेसें नसतें. या नेतृत्वाचा पाठपुरावा करणारी स्वत्वाची जाणीव झालेली क्रांतिप्रवण जनता आवश्यक असते. रशियांत या दोन्ही गोष्टींचा समन्वय लेनिनच्या हाताखालीं संघटित झालेल्या बोल्शेव्हिक पक्षांत दिसून येतो.

कोणत्याहि सामाजिक क्रांतीसाठीं अनेक गोष्टींची गरज असते. क्रांति-पूर्व रशियांत ही सर्व परिस्थिति अस्तित्वांत होती. स्वतःचे प्रश्न सोडविण्यास व आपल्या जीवनांत आवश्यक ते बदल घडविण्यास असमर्थ ठरलेली विघटित समाजरचना रशियांत निर्माण झाली होती. प्रस्थापित राजवटीला जनतेचा वाढताविरोध होता, व निराश झालेल्या जनतेची ही राजवट उलथून पाडण्यासाठीं असीम त्यागाची तयारी झाली होती. समाजाचें नेतृत्व करण्यास राजकीय सत्ताधारी वर्ग असमर्थ ठरला होता. त्या वर्गांतील अंतर्विरोधामुळें त्यांच्यांतील आत्मविश्वास व सृजनशीलता नष्ट झाली होती. वरील सर्व परिस्थितीचा योग्य उपयोग करून समाजावर आपलें नेतृत्व प्रस्थापित करण्यासाठीं संघटित झालेला बोल्शेव्हिक पक्ष अस्तित्वांत होता. या पक्षाचा स्वतःच्या तत्वज्ञानावर व तें तत्वज्ञान प्रत्यक्षांत आणावयाच्या कार्यक्रमावर अढळ विश्वास होता.

रशियांतील सरंजामी समाजरचना युरोपांत औद्योगिक क्रांति झाल्या-नंतर देखील जीवन्मृत स्थितींत अस्तित्वांत होती. या समाजरचनेंत बहुजनसमाजाचें जीवन दुःसह झालें होतें. मुठभर सरदार व धर्मगुरूंच्या

हातीं समाजाचीं सर्व सूत्रें होतीं. हा वर्ग बदलत्या परिस्थितींत समाजाचें नेतृत्व करण्यास नालायक ठरला होता. अन्य युरोपीय देशाप्रमाणें औद्योगिक व व्यापारी क्रांतीमुळें निर्माण होणारा नवा धाडसी व्यापारी व औद्योगिक मध्यम वर्ग रशियांत निर्माण झाला नव्हता. झारशाहीच्या अन्याय्य व जुलमी राजवटीमुळें जनता सत्ताविरोधी बनणें अगदीं साहजिक होतें. त्यांत युद्धजन्य आपत्तींची भर पडली. जनतेला कोणी त्राता उरला नाहीं. या नैराश्यमय परिस्थितीमुळें दुसरी कोणतीहि राजवट चालेल, झारशाही नको ही भावना निर्माण झाली. नवीन राजवट अस्तित्वांत आणण्यासाटीं कसलेहि कष्ट करण्याची जनतेची मानसिक तयारी झाली. याचा फायदा सुसंघटित बोल्शेव्हिक पक्षानें करून घेतला. या नव्या नेतृत्वाला टक्कर देण्याचें सामर्थ्य अधःपतित झारशाहींत नव्हतें. त्याच-प्रमाणें तें आत्मविश्वासशून्य व दुर्बल मंत्रिमंडळांतहि नव्हतें. ही पार्श्वभूमि लक्षांत घेतली म्हणजे मागासलेल्या रशियांत जागृत जनतेच्या सहकार्यानें लेनिन क्रांति घडवून आणूं शकला, यांत आश्चर्य वाटत नाही.

लेनिननें सत्ता हातीं घेतांच जर्मनीशीं ब्रेस्ट-लिटोव्हस्क येथें अत्यंत अपमानास्पद तह स्वीकारून प्रथम शांतता मिळविली. रशियानें युद्धांतून अंग काढून घेतलें याचें वैषम्य दोस्तांना वाटणें साहजिकच होते. कारण पूर्व आघाडींतून मोकळ्या झालेल्या जर्मन फौजांचा भार त्यांना पश्चिम आघाडीवर सहन करावा लागला. एवढेंच नव्हे तर घडून आलेल्या समाजक्रांतीमुळें त्यांच्या राष्ट्रांतदेखील बेदिली उत्पन्न होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. नव्या रशियानें झारशाहीच्या जुन्या परराष्ट्रीय कर्जांचा बोजा साफ अमान्य केला. या कृत्यामुळें भांडवलशाही राष्ट्रांचें धाबें दणाणलें. रशियांत धनिक व खानदानी वर्गाची उचलबांगडी करण्याचें व जरूर पडल्यास त्यांना नष्ट करण्याचें कडक धोरण मजुरांच्या सर्वाधिकार-शाहीनें स्वीकारलें. आजवर पिळल्या गेलेल्या दलित वर्गांनीं त्यांच्या निर्दय

शोषकांचा बळी घ्यावा हें कितीहि क्रूर वाटलें तरी क्रमप्राप्तच होतें. रशियांतील धनिक वर्गानें नव्या सत्तेविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें. श्वेत रशियनांच्या या प्रतिक्रांतीला पैसा आणि युद्धसाहित्य व प्रसंगीं युद्धतज्ज्ञांची मदत दोस्त राष्ट्रांनीं केली. कांहीं ठिकाणीं दोस्त फौजांनीं आक्रमणें करून रशियन भूमीवर ताबा मिळविला. १९१७ ते १९२१ पर्यंत रशियांतील साम्यवादी क्रांतीला अत्यंत खडतर परिस्थितींतून जावें लागलें. लाल फौजेला एकाच वेळीं निरनिराळ्या चौदा आघाड्यांवर श्वेतरशियन व दोस्त फौजा यांना तोंड द्यावें लागलें. पण ट्रॉट्स्कीचें क्रांतिकारी युद्धतंत्र, लाल सैनिकांचा अलोट पराक्रम व सामान्य जनतेचा संपूर्ण पाठिंबा यांच्या बळावर साम्यवादी सरकार विजयी झालें. १९२१ नंतरच साम्यवादी नेत्यांना यादवी युद्धांतून मोकळें होऊन राष्ट्राच्या पुनर्घटनेकडे लक्ष देणें शक्य झालें. साम्यवादाला त्वरित मूर्त स्वरूप देण्याच्या उत्साहात आरंभींच्या काळांत परिस्थितीकडे दुर्लक्ष्य झालें. व त्याचा परिणाम १९२३ च्या दुष्काळांत लक्षावधि माणसें मृत्युमुखीं पडण्यांत झाला. युद्धकालीन साम्यवादाला तिलांजलि देऊन लेनिनने ‘नवे आर्थिक धोरण’ (N. E. P.) स्वीकारलें. या धोरणानुसार भांडवलशाहीला कांहीं काळपर्यंत थोड्या प्रमाणांत जगूं देण्याची सवलत देण्यांत आली. रशियाच्या पुनर्घटनेला आवश्यक असलेल्या साधन निर्मितीचा प्रश्न त्या वेळींतरी भांडवलशाही मार्गानें सोडवावा लागेल असें लेनिनला अनुभवांतीं पटलें होतें. लेनिनचें नेतृत्व अधिक काळ लाभण्याचें भाग्य रशियाच्या नशिबीं नव्हतें. १९२४ मध्यें लेनिन मरण पावला. त्याच्या नश्वर देहापासून देखील अनुयायांना स्फूर्ति मिळावी म्हणून रासायनिक प्रक्रियेनें टिकविलेल्या त्याच्या प्रेताचें प्रदर्शन मास्कोच्या क्रांतिचौकांत करण्यांत आलें आहे.

लेनिनचा मृत्यु स्टॅलिन व ट्रॉट्स्की यांच्या संघर्षाची जणूं नांदी ठरली. लेनिनच्या या दोन सहकाऱ्यांत प्रथमपासूनच फारसें सख्य नव्हतें. साम्यवादी क्रांतीच्या जनकाच्या मृत्यूनंतर पक्षाचें व राष्ट्राचें नेतृत्व

कोणी करावें हा प्रश्न उत्पन्न होणें क्रमप्राप्त होतें. धूर्त स्टॅलिननें याविषयीं अंदाज बांधून पक्षाच्या संघटनेंतील स्वतःचें स्थान बळकट करून ठेवलें होतें. असामान्य बुद्धिमान् पण भावनावश ट्रॉट्स्कीचा कावेबाज व व्यवहारचतुर स्टॅलिननें पक्षांतर्गत राजकारणांत पराभव केला. वैयक्तिक संघर्षाखेरीज साम्यवादी क्रांतीच्या पुढील ध्येयधोरणाविषयीं या दोन पुढाऱ्यांत वैचारिक संघर्षहि होता. स्टॅलिनच्या मतें जागतिक क्रांतीला हात घालण्यापूर्वी रशियांत साम्यवादाचें स्थान अढळ करणें महत्त्वाचें व आवश्यक होतें. ट्रॉट्स्कीच्या दृष्टीनें जागतिक क्रांतीखेरीज भांडवलशाहीच्या गराड्यांतील एखाद्या राष्ट्रांत साम्यवादी क्रांति यशस्वी होऊं शकत नाहीं. स्टॅलिन-ट्रॉट्स्कीच्या संघर्षाचा परिणाम ट्रॉट्स्कीच्या हकालपट्टींत झाला. १९२७ सालीं सुरू झालेल्या त्याच्या वनवासाला १९४० सालीं झालेल्या मेक्सिकोंतील खुनामुळेंच विराम मिळाला.

निष्कंटक झालेल्या स्टॅलिननें आपल्या मतांनुसार रशियाच्या सर्वांगीण प्रगतीसाठीं प्रयत्न सुरू केले. १९२८ सालीं पहिली पंचवार्षिक योजना सुरू करण्यांत आली. औद्योगीकरणाचा हा एक अभिनव प्रयोग होता. प्रचण्ड धरणें, विद्युत्पादन, मूलभूत उद्योगधंदे, या सर्वांच्या निर्मितीला एकदम सुरुवात झाली. शेतीचें सामुहीकरण व यांत्रिकीकरण करण्यांत आलें. 'कुलक' जमिनदारांना नष्ट करण्यांत आलें. पंचवार्षिक योजनेचा भर उत्पादनसाधनें विकसित करण्याकडे होता. ग्राहकांना नित्य लागणाऱ्या वस्तूंच्या निर्मितीकडे दुर्लक्ष झालें. त्याचा परिणाम कांहीं भागांतून दुष्काळसदृश परिस्थिति निर्माण होण्यांत झाला. प्रचण्ड धरणें, अवाढव्य कारखानें, नवे लोहमार्ग यांच्या जोडीला काळी भाकरी मिळविण्यासाठीं लागणाऱ्या अर्धपोटी मजुरांच्या रांगा, सरकारी दुकानांतील शोभेसाठीं ठेवलेल्या चैनीच्या वस्तूकडे आशाळभूतपणें पाहणारे ग्राहक व व शेवटच्या पातळीला पोहोंचलेलें जीवनमान यांचेंहि दृश्य साम्यवादी रशियांत दिसत होतें. या प्रयोगाच्या वरवंट्याखालीं अनेक निरपराध

व निरुपद्रवी नागरिक भरडून निघाले. मग विरोधकांची काय कथा? क्रांतिविरोधी चळवळी दडपण्यांसाठीं अंमलांत आणलेली ‘लाल दडपशाही’ (Red Terror), राजकीय विरोधकांचा काटा काढण्यासाठीं निर्माण केलेले गुप्त पोलीस, दुराग्रही विरोधकांना वठणीवर आणण्यांसाठीं तयार केलेले नवे तुरुंग व त्यांत करण्यांत येणारे कैद्यांचे शास्त्रीय पण अनन्वित हाल या साऱ्या जालीम उपायांमुळें रशियांतील अंतर्गत प्रतिकार नष्ट झाला. अविरोध व सक्तीची खुशी ह्यामुळें पहिली पंचवार्षिक योजना यशस्वी झाली. रशियाची उत्पादनशक्ति कितीतरी पटीनीं वाढली. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेचा श्रीगणेशा मोठ्या उत्साहानें करण्यांत आला. या योजनेमुळें दुय्यम उद्योगधंद्यांची वाढ झाली. नित्योपयोगी वस्तूंचें उत्पादन वाढलें. शेतीच्या सामुहीकरणामुळें नाराज झालेल्या शेतकऱ्यांच्या असहकारामुळें खालावलेलें शेतीचें उत्पादनदेखील वाढीस लागलें. पहिल्या योजनेंत परकीय तज्ज्ञांवर अनेक बाबतींत अवलंबून राहावें लागत होतें. दुसऱ्या योजनेंत या अडचणीकडेदेखील लक्ष देण्यांत आलें. दुसऱ्या योजनेचा मूलभूत हेतु रशियाला औद्योगिक व आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण करण्याचा होता. मिळालेल्या यशाचें मान पाहतां हा हेतु सिद्धीस गेल्याचें दिसतें. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेचा हेतु रशियाची संरक्षणक्षमता वाढविणें व सर्वांगीण उत्पादनवृद्धि करणें हा होता. परंतु १९४१ मध्यें सुरू झालेल्या युद्धानें ती योजना स्थगित करावी लागली. उरल पर्वतांच्या प्रदेशांत निर्माण करण्यांत आलेल्या नव्या उद्योगकेंद्रांमुळें युद्धकाळांत रशियाला फार मदत झाली. नियोजन—पद्धतीच्या यशाचें मूल्यमापन इतर देशांनीं केलेल्या अनुकरणावरूनदेखील करतां येण्यासारखें आहे.

१९३४ सालीं झालेल्या किरॉव्हच्या खुनामुळें रशियांतर्गत स्टॉलिन विरोधाची बाहेरच्या जगाला कल्पना आली. किरॉव्हच्या खुनानंतर सर्वत्र धरपकडी करण्यांत आल्या. त्यांत लेनिनच्या वेळेपासून आघाडीवर असलेल्या अनेक क्रांतिकारकांच्यासुद्धां आहुति पडल्या. यांतूनच पुढें

जगभर गाजलेल्या मॉस्को खटल्याची उभारणी झाली. १९३६-३७ व ३८ सालीं चालू असलेल्या या खटल्यांनीं साऱ्या जगाचें लक्ष वेधून घेतलें. कारण, झिनोव्हिव, कॅमेनेव्ह, बुखारिन, गुप्तपोलीसप्रमुख यागोडा, मार्शल टुकाचेव्हस्की, रॅकोव्हस्की, रॉयकॉव्ह, इत्यादि अनेक अव्वल दर्जाच्या राजकीय व लष्करी वरिष्ठांवर क्रांतिविरोधी व राष्ट्रघातकी चळवळी केल्याचे आरोप ठेवण्यांत आले. पण यापेक्षांहि अधिक विस्मयजनक घटना म्हणजे सर्व आरोपींनीं कबुलीजबाब देऊन काल्पनिक वाटणारे हे आरोप बिनतक्रार मान्य केले. अनेकांना फांशी व इतरांना जन्मठेपेच्या शिक्षा झाल्या. स्टॅलिननें आपल्या विरोधकांचें अगदीं शब्दशः शिरकाण केले.

सोव्हिएट रशियाला अंतर्गत विरोधकाबरोबरच बाह्य विरोधालाहि सतत तोंड द्यावें लागलें. १९२१ नंतर शांतता लाभली असली तरी राष्ट्रांच्या संसारांत त्याला एखाद्या महारोग्यांप्रमाणें बहिष्कृत करण्यांत आले होते. निरीश्वरवादी, धनिकविरोधी, सर्व प्रचलित कल्पनांना अमान्य करणाऱ्या या मजुरांच्या राज्याचें स्वागत आर्थिक, व्यापारी व राजनैतिक बहिष्कारांनीं करण्यांत आलें. पण ही स्थिति सर्व काळ टिकणारी नव्हती. रशियाशीं असलेला फायदेशीर व्यापार कायमचा सोडण्यास इंग्लंड तयार नव्हतें. त्यामुळें १९२६ सालीं ब्रिटननें रशियाला राजनैतिक मान्यता देऊन पूर्वी केलेल्या व्यापारी तहांवर जणूं शिक्कामोर्तब केलें. इंग्लंडच्या पाटोपाठ इतर युरोपीय राष्ट्रांनीं रशियाला मान्यता दिली. पण अडेलतट्टू अमेरिकेनें १९३४ पर्यंत मान्यता देण्याचें टाळलें. भांडवलशाही व साम्यवाद हीं एकत्र गुण्यागोविंदानें नांदू शकतात असें भांडवलशाही राष्ट्रांना वाटत नव्हतें. त्यामुळें परस्पर अविश्वास व भीतिग्रस्तता यांचेंच वातावरण प्रभावी होतें.

१९१९ सालीं लेनिननें स्थापन केलेल्या 'कॉमिन्टर्न' च्या नेतृत्वाखालीं सर्व राष्ट्रांतील कम्युनिस्ट पक्ष कार्य करीत होते. प्रत्येक

राष्ट्रांतील कम्युनिस्ट पक्ष आपल्या ध्येयधोरणासाठीं मास्कोकडे लक्ष देत. परिणामतः रशियाच्या मैत्रीविषयीं सर्वत्र साशंकता होती. कम्युनिस्ट पक्षांनीं आपापल्या राष्ट्रांतील समाजवादी व लोकशाही पक्षांना निकराचा विरोध करण्याचें विध्वंसक धोरण अंमलांत आणलें होतें. पण जर्मनींतील नाझी विजयामुळें सारी परिस्थिती पालटली. रशियानें जनतेच्या संयुक्त शांतता-आघाडीची भाषा सुरू केली. फॅसिस्टविरोधासाठीं साम्यवादी, समाजवादी व लोकशाही पक्षांनीं एकजूट करणें आवश्यक आहे, या धोरणाचा पाठपुरावा सुरू केला. पण पूर्वेतिहासामुळें कम्युनिस्टांच्या या नव्या फॅसिस्ट-विरोधी घोषणा, म्हणजे भांडवलशाही उलथून पाडण्यासाठीं करण्यांत येणारा घरभेदीपणा आहे असा समज लोकशाही राष्ट्रांत पसरला.

नाझी विरोधाच्या समान उद्दिष्टामुळें फ्रान्स, रशिया व झेकोस्लोव्हाकिया यांच्यांत मैत्रीचा व परस्पर मदतीचा तह झाला. रशियानें १९३४ सालीं राष्ट्रसंघांत पाऊल टाकलें. फॅसिस्टविरोधासाठीं स्पेनमधील यादवींत एकाकी पडलेल्या लोकशाही सरकारला मुक्त हस्तानें मदत केली. पण याच काळांत लोकशाही राष्ट्रांनीं शरणागतीच्या धोरणाचा अंगिकार वाढत्या प्रमाणांत केला. म्युनिच् कराराच्या वेळीं स्टॅलिनला वगळून फ्रान्सनें मैत्रीच्या कराराचा तर भंग केलाच पण रशियाविरोधी युरोपची एकजूट करण्याचा जणूं तो प्रयत्न होता, असें रशियाला भासविलें. त्यामुळें १९३९ च्या उन्हाळयांत लोकशाही राष्ट्रांनीं केलेल्या वाटाघाटींना स्टॅलिनच्या दृष्टीनें फारशी किंमत उरली नाहीं. स्टॅलिननें मागीतलेल्या परस्पर साहाय्याच्या अटी लोकशाही राष्ट्रांना जड वाटल्या. पोलंडनें रशियन फौजांना पोलंडमध्यें येऊं देण्याचें नाकारलें. याउलट हिटलरनें केवळ अनाक्रमणाच्या मोबदल्यांत रशियाच्या सगळया मागण्या मान्य केल्या. २३ ऑगस्ट, १९३९ सालीं झालेल्या अनाक्रमणाच्या तहामुळें लोकशाही राष्ट्रांनीं रशियावर दुटप्पीपणाचा आरोप केला. पण हींच राष्ट्रें फॅसिस्ट भस्मासुराचा उपयोग रशियाचा परस्पर नाश करण्यासाठीं कसा होईल यासाठीं धडपडत होतीं.

रशिया-जर्मनीची ही विचित्र शय्या मैत्री अधिक काळ टिकणारी नव्हती. ब्रिटनच्या युद्धांत पराभूत झालेल्या हिटलरनें बलिष्ठ रशियाचा कांटा काढण्याचें नेपोलियनला न साधलेलें साहस केलें. दुसऱ्या महायुद्धांत लाल सेनेनें दाखवलेलें अचाट धैर्य, सामान्य जनतेनें केलेला असीम स्वार्थत्याग व स्टॅलिनचें नेतृत्व यांमुळें हिटलरचें साहस तर फसलेंच पण विजयी लाल सेनांनीं बर्लिनचा कबजा घेतला. या रशियन विजयांत अमेरिकेनें पुरविलेल्या साधनसामुग्रीचा मोठा हातभार आहे. पण लोकशाही राष्ट्रांची मैत्री रशियाला फारशी उपयोगी पडली नाहीं. १९४३ मधील स्टॅलिनग्राडच्या विजयापर्यंत विजयी जर्मन फौजांचा सारा भार रशियाला सहन करावा लागला. हा भार कमी करण्यासाठीं दुसरी आघाडी उघडण्यांत यावी या रशियाच्या आग्रही मागणीचा विचार दोस्तमुत्सद्यांनीं लांबणीयर टाकला. या चालढकलीच्या धोरणाचे सूत्रधार ब्रिटनचे कुटिल नीतिज्ञ चर्चिल हे होते. या धोरणामागील मुख्य हेतु रशियाची आपोआप होणारी खची चालू देऊन भविष्यकाळांतील साम्यवादी क्रांतीचा धोका टाळण्याचा होता. दुसऱ्या आघाडीशिवाय एकटा रशिया युद्ध जिंकेल असा संभव निर्माण होतांच दुसरी आघाडी उघडण्यांत आली. पराभवाची निश्चिती दिसूं लागतांच धूर्त जर्मन सेनानींनीं पश्चिम आघाडीवर प्रतिकाराचें धोरण सोडून देऊन दोस्त सैन्यांना जर्मनी व्यापण्यास मोकळीक करून दिली. पूर्वेकडील प्रतिकार मात्र बर्लिन पडेपर्यंत अत्यंत निकरानें चालू ठेवण्यांत आला. या धोरणामुळें जर्मनीचा अधिकांश भाग दोस्त सैन्यांच्या ताब्यांत राहिला. बर्लिनच्या पाडावानंतर आठ दिवसांतच जर्मनीनें संपूर्ण शरणागति पत्करली. पूर्व युरोपांतील बहुतेक सर्व राष्ट्रांत साम्यवादी क्रांति होऊन रशियानुकुल पक्षांच्या हातीं सत्ता आली.

विसाव्या शतकाच्या सुरुवातीला रानटी, मागासलेला आणि असंस्कृत अशा विशेषणांनीं रशियाची संभावना करण्यांत येत असे. १९१७ च्या क्रांतीनंतर अनेक वर्षेपर्यंत रशियाला संसर्गजन्य महारोग्याप्रमाणें वाळींत

टांकण्यांत आलें होतें. पण दुसऱ्या महायुद्धानें जागतिक सत्ताराजकारणांतील सारीच परिस्थिति पालटून टाकली. सामान्यपणें आशिया खंडांत रशियाचें वजन एकदम वाढलें. चीनमधील कम्युनिस्ट विजयानें त्यांत भर पडली प्रशांत महासागरांतून जपानसारखा प्रतिस्पर्धी हतबल झाल्यामुळें रशियाचें वजन अधिकाधिक वृद्धिंगत होणें स्वाभाविकच होतें. साम्यवादी समाजरचना आणि नियोजित अर्थव्यवस्था यामुळें रशियाच्या सामर्थ्यांत सर्वांगीण वाढ झाली. आशियाप्रमाणेंच युरोपांतहि अग्रपूजेचा मान रशियाला मिळत आहे. फ्रान्स, ब्रिटन, जर्मनी आणि इटली हीं युद्धपूर्व काळांतील महान् राष्ट्रें आज रशियाच्या तुलनेनें पाहतां दुय्यम दर्जाचीं ठरतात. १९१७ सालीं सुरू झालेल्या साम्यवादी क्रांतीनें आज जगांतील एक चतुर्थांश लोकसंख्येला व्यापलें आहे. ७० कोटी जनतेनें स्वीकारलेल्या या नव्या धर्माचें आद्यपीठ मास्को आहे व या नव्या विश्वव्यापी धर्माचा जगद्गुरु स्टॅलिन आहे.

१९५३ रोजीं झालेला स्टॅलिनचा मृत्यू ही जागतिक इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाची घटना आहे. स्टॅलिनच्या मृत्यूचे दूरगामी परिणाम काय होईल याविषयीं अंदाज बांधणे आज शक्य नाही. कारण ती घटनाच इतकी समकालीन आहे. पण लेनिनचा वारसा मिळालेल्या या लोहपुरुषानें २९ वर्षांच्या दीर्घ राजवटींत साऱ्या जगाचें लक्ष आकृष्ट केलें होतें. नियोजन युगाचा प्रवर्तक, साम्यवादाचा सर्वश्रेष्ठ कारागीर, अव्वल दर्जाचा सेनानी, अशा अनेक विशेषणांनी त्याला गौरविण्यांत येते. स्टॅलिनचें मोठेपण त्याच्या धीर गंभीर स्वभावांत आहे. पराभवानें तो खचला नाहीं किंवा विजयामुळें तो हुरळुन गेला नाही. सतत यशस्वी होत गेल्यामुळें त्याला देवत्वाप्रत पोंचविण्याची प्रवृत्ति अनुयायांत दिसते. पण ही एकांतिकता सोडून दिली तरी या असामान्य नेत्याचें जागतिक इतिहासांतील स्थान अग्रगण्य आहे हे त्याच्या शत्रूंनाहि मान्य करावें लागेल. जागतिक इतिहासाचें स्टॅलिनयुग संपलें पण नव्या युगाचे मानकरी कोण? आयसेनहॉवर,

मॅलेन्कॉव्ह, माव-त्से तुंग कीं आणखी इतर कोणी? भावी काळच याचें उत्तर देऊं शकेल.

स्टॅलिनच्या मृत्यूनंतर सोव्हिएट रशियांत सत्तासंपादनासाठीं यादवी सुरू होईल असें भाकित अनेक राजकारणतज्ञांनीं केलें होतें. मॅलेन्कॉव्ह, मोलोटॉव्ह व बेरीया या त्रिमूर्तींनीं रशियाच्या नेतृत्वाची जबाबदारी संयुक्तपणें उचलली होती. पण सर्वाधिकारशाहीला संयुक्त जबाबदारी ही फारशी आवडणारी गोष्ट नव्हे. सत्तासंपादन शांततेच्या मार्गानें झाल्यानंतर मॅलेन्कॉव्हनें आपल्या प्रतिस्पर्ध्यांचा–बेरीयाचा–कांटा काढण्यास फारसा अवधि लावला नाहीं. बेरीयाला पदच्युत करतांना त्याच्यावर करण्यांत आलेले आरोप अगदीं ठराविक स्वरूपाचे आहेत. 'भांडवलशाही व साम्राज्यवाद्यांचा नीच हस्तक' इत्यादि विशेषणांनीं 'प्रवदा' व इतर रशियन पत्रांनीं बेरीयाची संभावना केली. सोव्हिएट रशियाबाहेरच्या जगाला हें कधींहि न उलगडणारें कोडें असतें.

कालपर्यंत राष्ट्रभक्त व प्रथम श्रेणीचा कार्यकर्ता पदच्युतीनंतर अगदीं नीच राष्ट्रद्रोही ठरतो. केवळ बेरीयाची हकालपट्टी करून रशियांतील मॅलेन्कॉव्ह-प्रणीत शुद्धीकरण थांबलेलें नाहीं. बेरीया गटांतील अनेक वरिष्ठ अधिकाऱ्यांची उचलबांगडी करण्यांत आली आहे.

वरील घटनांमुळें सोव्हिएट रशियांतील परिस्थितीविषयीं कसलेहि अंदाज करणें शक्य होत नाहीं. रशियाचा नवा नेता मॅलेन्कॉव्ह हा आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत अज्ञात व्यक्तींपैकीं आहे. त्यानें रशियाबाहेरचें जग फारसें पाहिलेलें नाहीं. त्याची सर्व कर्तबगारी ही क्रांतीनंतरच्या काळांत पक्षसंघटनेंत विकास पावली आहे. मॅलेन्कॉव्हचें स्वतंत्र कर्तृत्व जगाला अजून अज्ञात आहे. पण स्टॅलीनच्या नेत्रदीपक पार्श्वभूमीवर तें कितपत उठून दिसेल हें सांगणें कठीण. पण त्याच्या शिरावर पडलेली जबाबदारी अत्यंत मोठी आहे. जागतिक शांतता टिकविणें ज्या दोन राष्ट्रांच्या हातीं आहे त्यांपैकीं एका राष्ट्रांचें धुरीणत्व त्याला मिळालें आहे. रशियाचा नवा सूत्रधार शांततेचा पुजारी ठरतो कीं रणचंडीचा प्रेषित होतो हें आज अज्ञात आहे.

## युगोस्लाव्हिया

पहिल्या महायुद्धानंतर जन्मास आलेल्या या राष्ट्रानें दुसऱ्या महायुद्धांत जर्मन आक्रमकांना ज्या धैर्यानें तोंड दिलें त्यामुळें युद्धकाळांतच जगाचें लक्ष या छोट्या राष्ट्राकडे आकृष्ट झालें होतें. युगोस्लाव्हियाच्या या जर्मनविरोधाचें खरें मूल्य, फ्रान्स, हॉलंड, बेल्जम या राष्ट्रांनीं स्वीकारलेल्या शरणागतीशीं त्याची तुलना केली म्हणजे लक्षांत येतें. या छोट्या राष्ट्राच्या कडव्या विरोधापुढें, गनिमी डावपेंचासमोर व अदम्य राष्ट्रप्रेमापुढें जर्मन सेनेला हात टेकावे लागले. या जर्मन विरोधाचें प्रमुख नेतृत्व युगोस्लाव्हियाच्या साम्यवादी पक्षाकडे विशेषतः टिटोकडे होतें. स्टॅलिनग्राडच्या विजयानें जर्मनसेनेची प्रगति थोपविण्यांत आली होती. तेव्हांपासून तो बर्लिनच्या पाडावापर्यंत टिटो व त्याचे स्वयंसैनिक यांनीं स्वतःच्या देशाला मुक्त करण्यासाठीं सतत प्रयत्न चालू ठेवले होते. जर्मन पराभवानंतर युगोस्लाव्हिया स्वतंत्र झाला. पूर्व युरोपांतील पोलंड, रुमानिया, हंगेरी, बल्गेरिया इत्यादि राष्ट्रांच्या मुक्ततेसाठीं रशियाची लाल सेना कारणीभूत ठरली होती. पण युगोस्लाव्हियानें मात्र स्वतःच्या प्रयत्नानें आपलें स्वातंत्र्य हस्तगत केलें होतें.

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या कालखंडांत युगोस्लाव्हिया पुनः एकदां जगाचें आकर्षणकेंद्र बनला आहे. साम्यवादी समाजरचनेचा स्वीकार करूनदेखील एखादें राष्ट्र सोव्हिएट रशियाच्या पंखाखालीं राहण्याचें नाकारूं शकतें, असें या छोट्या राष्ट्रानें जगाला दाखविलें आहे. साम्यवाद आणि सोव्हिएट रशियाचें साम्राज्यवादी धोरण हीं दोन्ही एकच समजणें चूक आहे. रशियाच्या हितासाठीं स्वतःच्या राष्ट्रहिताचा बळी देण्यास नाकारण्याचें धैर्य युगोस्लाव्हियानें दाखवलें. टिटोच्या साम्यवादी युगोस्लाव्हियाची साम्यवादी राष्ट्रगटांतून वरील अपराधासाठीं हकालपट्टी करण्यांत आली. टिटो व त्याचे सहकारी फॅसिस्ट असल्याचा व साम्राज्यवादी राष्ट्रांच्या हातांतील बाहुलें असल्याचा आरोप युगोस्लाव्हियावर लादण्यांत आला.

जागतिक सत्ता-राजकारणांत युगोस्लाव्हियाचें स्थान फार महत्त्वाचें आहे. कारण त्या राष्ट्राकडे लोकशाही राष्ट्रांची वाढती सहानुभूति व मदत जात आहे. युगोस्लाव्हिया साम्यवादी असला तरी सोव्हिएट रशियाविरोधी असल्यामुळें अमेरिकेच्या मदत योजनेंत त्याला स्थान मिळालें आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर पूर्व युरोपांत निर्माण झालेल्या सोव्हिएट राष्ट्रगटांत ही फूट पडल्यामुळें पोलादी पडद्यामागील हालचालींवर नवा प्रकाश पडला आहे. विशेषेंकरून सोव्हिएट रशियाच्या साम्यवादी राष्ट्रांशीं असलेल्या संबंधांविषयीं बाहेरच्या जगाला अधिक माहिती मिळूं शकली. साम्यवाद व त्याचें आंतरराष्ट्रीय स्वरूप आणि निरनिराळ्या साम्यवादी राष्ट्रांचा राष्ट्रवाद यांच्यांतील संघर्षाचा नवा प्रश्न उपस्थित झाला आहे. १९४५ पूर्वी हा प्रश्न उपस्थित होत नसे. त्या वेळीं फक्त सोव्हिएट रशियानें साम्यवादाचा स्वीकार केला होता. इतर राष्ट्रांतील साम्यवादी पक्ष क्रांतीच्या या स्फूर्तिस्थानाकडे आशेनें व श्रद्धेनें पाहत असत. सोव्हिएट रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाला साहाय्य करण्यानें जागतिक क्रांति व स्वतःच्या राष्ट्रांतील क्रांति जवळ आणीत आहों असें समाधान इतर राष्ट्रांतील साम्यवादी पक्षांना मिळत असे. पण युद्धोत्तर काळांत वरील स्थिति पालटलेली आहे. सोव्हिएट रशिया सोडून नवचीन, युगोस्लाव्हिया, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, हंगेरी, रुमानिया आणि बल्गेरिया इत्यादि राष्ट्रांनीं साम्यवादाचा स्वीकार केला आहे. या नवीन परिस्थितींत सोव्हिएट रशियाखेरीज इतर साम्यवादी राष्ट्रांना जागतिक राजकारणांत पावलें टाकतांना तारेवरची कसरत करणें प्राप्त झालें आहे. सोव्हिएट रशियाच्या धोरणाचा पाठपुरावा न केल्यास जागतिक क्रांतीशीं बेइमान झाल्याचा आरोप ओढवतो. याउलट रशियाची री ओढल्यास अनेकदां त्या त्या राष्ट्रांच्या हितसंबंधांचा सोव्हिएट रशियाच्या हितासाठीं बळी देण्याची पाळी येते. अशा प्रकारें राष्ट्रीय हितसंबंधांचा त्याग जागतिक क्रांतीच्या यशासाठीं सतत करण्याची तयारी साम्यवादी राष्ट्रांत दिसून येत नाहीं.

साम्यवाद व राष्ट्रवाद यांच्या या संघर्षांत राष्ट्रवादाचा पहिला विजय झाला आहे असें युगोस्लाव्हियाच्या उदाहरणावरून म्हणावेंसें वाटतें.

या सर्व संघर्षांत दोन व्यक्तींच्या प्रभावी व्यक्तिमत्वाचाहि संघर्ष अंतर्भूत आहे. स्टॅलिनच्या नेतृत्वाला स्वतंत्र व्यक्तित्वाचें वावडें आहे. युगोस्लाव्हियाच्या डोंगराळ प्रदेशांत वर्षानुवर्षें आक्रमकांशीं एकाकी झुंज देणाऱ्या टिटोला दास्याचा–वैचारिक दास्याचादेखील–तिटकारा आहे. युगोस्लाव्हियांतील साम्यवादाची परिणति सोव्हिएट रशियापेक्षां निराळ्या मार्गांनीं होत आहे. केंद्रीकरण आणि राष्ट्रीयीकरण यांऐवजीं विकेंद्रित व स्वायत्त अर्थव्यवस्थेला अधिक वाव मिळाला आहे. टिटोच्या मतें या मार्गानेंच खरी वर्गविहीन समाजरचना अस्तित्वांत येऊं शकेल. युगोस्लाव्हियाचें महत्त्व आणखी एका दृष्टीनें विचार करण्याजोगें आहे. सत्ता-राजकारणाविषयीं विवेचन करतांना अनेकदां जगाची विभागणी केवळ दोनच राष्ट्रगटांत झाली आहे असें प्रतिपादण्यांत येतें. ही विचारसरणी हें एक अर्धसत्य आहे, हें युगोस्लाव्हियाच्या उदाहरणावरून सहज सिद्ध होऊं शकतें. या छोट्या राष्ट्राची निष्ठा सोव्हिएट रशियाकडे नाहीं, त्याचप्रमाणें भांडवलशाही अमेरिकेकडेहि नाहीं. एका दृष्टीनें हिंदुस्थानप्रमाणें सोव्हिएट व अमेरिकन राष्ट्रगटांच्या सत्तास्पर्धेंत स्वतःचें स्वतंत्र स्थान निर्माण करण्यांत युगोस्लाव्हियाला यश मिळालें आहे. या त्यांच्या विशिष्ट स्थानामुळें युगोस्लाव्हियाला लोकशाही राष्ट्रांनीं वाढत्या प्रमाणावर आर्थिक मदत दिली आहे. या चिमुकल्या साम्यवादी राष्ट्राच्या नेत्याचें ब्रिटनमध्यें जें स्वागत करण्यांत आलें त्यावरून देखील या राष्ट्राचा अनुनय किती करण्यांत येत आहे हें समजून येईल. सोव्हिएट रशिया व त्याच्या अंकित राष्ट्रांच्या दडपणापासून मोकळीक मिळावी याकरितां देखील युगोस्लाव्हियाला अमेरिका व ब्रिटन यांचें साहाय्य घेणें आवश्यक ठरतें.

---

गेल्या तीन चार शतकांत आशियांतील राष्ट्रें युरोपीय राष्ट्रांच्या गुलामींत पिचत असल्यामुळें जागतिक राजकारणांतील या प्राचीन भूखंडाचें वास्तविक व मानाचें स्थान त्याला प्राप्त होऊं शकलें नाहीं. प्राचीन काळाकडे दृष्टि टांकल्यास आशियाचें महत्त्व चटकन् डोळ्यांत भरतें. जगाला मानवतेचा संदेश देणारे हिंदु, महंमदी, खिस्ती, बौद्ध आणि कान्फ्यूशियस आदि सर्व धर्मांचे प्रणेते याच भूखंडांत निर्माण झाले. जगाला संस्कृति शिकवणारा भूप्रदेश असेंच आशियाचें वर्णन करावें लागेल. कारण ईजिप्त, ग्रीस आणि दक्षिण अमेरिका येथील प्राचीन संस्कृतींचा अपवाद वगळल्यास बाकीच्या सर्व संस्कृतींचा जन्म आशिया खंडांतच झाला आहे. आधुनिक काळापूर्वी हिंदुस्थान व चीन हे देश तेथील उद्योगधंदे, सुबत्ता, समाजव्यवस्था आणि व्यापार यांसाठीं जगांत प्रसिद्ध होते. किंबहुना आशियांतील राष्ट्रांच्या अगणित संपत्तीचें जें नेत्रदीपक वर्णन मार्को पोलो, वास्को डी गामा यांसारख्यांनीं केलें, त्यामुळेंच युरोपीय राष्ट्रांची दृष्टि आशियाकडे वळली.

१७ आणि १८ व्या शतकांत युरोपीय राष्ट्रांनीं औद्योगिक क्रांतीमुळें निर्माण झालेल्या नव्या यंत्रसंस्कृतीचा अंगिकार करावयास सुरुवात केली. याच काळांत प्रमुख युरोपीय राष्ट्रांत बलिष्ठ केंद्रीय सत्ता निर्माण झाली. औद्योगिक क्रांति व बलिष्ठ केंद्रीय सत्ता यांच्या जोडीला ग्रीक विद्यांच्या पुनरुज्जीवनामुळें वाढीस लागलेली शास्त्रीय प्रगति लक्षांत घेणें जरूर आहे. या सर्वांचा परिणाम युरोपांतील राष्ट्रें लोकसंख्येनें लहान असलीं तरी साधनसामुग्री व विशेषतः आधुनिक संहारक शस्त्रें यांनीं अधिक सामर्थ्यसंपन्न ठरण्यांत झाला. याच शस्त्रास्त्रांच्या बळावर इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, हॉलंड, बेल्जम, पोर्तुगाल या राष्ट्रांनीं आशियांतील आणि आफ्रिकेंतील

अगणित लोकसंख्येचे विस्तीर्ण प्रदेश आपल्या वर्चस्वाखालीं आणले. आशियांतील प्राचीन राष्ट्रांचा नव्या युरोपीय राष्ट्रराज्यांपुढें टिकाव न लागण्याचीं अनेक कारणें सांगतां येतील. त्यांतील प्रमुख म्हणून बलिष्ठ केंद्रीय सत्तेचा अभाव, आधुनिक शस्त्रास्त्रांचा व साधनसामुग्रीचा दुष्काळ, आधुनिक सैन्य व युद्ध-पद्धतीचें अज्ञान, आपसांतील दुही यांचा निर्देश करतां येईल. परिणामतः १८ व्या व १९ व्या शतकांत आशिया आणि आफ्रिका खंडांतील कोट्यवधि जनतेनें युरोपचें आर्थिक, राजकीय, सांस्कृतिक व राजकीय वैचारिक दास्य स्वीकारलें. जयिष्णु युरोपीय यंत्रसंस्कृतीचा प्रभाव सर्व जगभर पसरला.

आधिभौतिक श्रेष्ठतेमुळें विशेषेंकरून संहारक शस्त्रांच्या वरचढ सामर्थ्यामुळें अप्रगत व शांतताप्रिय समाजावर मिळविलेल्या वर्चस्वाला युरोपीय राष्ट्रांनीं वांशिक श्रेष्ठतेचें स्वरूप दिलें. श्वेतेतर जगाला सुधारण्याचा जणूं सारा मक्ता श्वेतवर्णीयांना दिला आहे असें ते मानूं लागले. वांशिक श्रेष्ठतेमुळें जगाचें नेतृत्व श्वेत राष्ट्रांकडेच राहणार असा त्यांचा आग्रह होता. श्वेतेतरांनीं कितीहि प्रयत्न केला तरी त्यांना श्वेत वर्णीयांची बरोबरी करतां यावयाची नाहीं. वांशिक श्रेष्ठतेच्या या खोट्या भ्रामक कल्पनांना पहिला मोठा धक्का १९०५ मध्यें झालेल्या रूसो-जपानी युद्धानें दिला. आशियांतील पीतवर्णी माकडानें रशियन अस्वलाचा केलेला पराभव हा आशियांतील राष्ट्रवादाला प्रेरणा देणारा ठरला. पण किती झालें तरी रशिया हा युरोपांतील एक मागासलेला देश होता. केवळ त्याच्या पराभवामुळें श्वेतवर्णीयांच्या तथाकथित श्रेष्ठतेला बाध येत नव्हता. पण दुसऱ्या महायुद्धांत जपाननें ७ डिसेंबर, १९४१ पासून १९४३ पर्यंत केलेल्या दक्षिण दिग्विजयामुळें वंशश्रेष्ठतेचा हा बुडबुडा पार नष्ट झाला. युरोपीय साम्राज्यवादाचे मुख्य आधार यंत्रसंस्कृति, आणि तिनें निर्मिलेलीं संहारक शस्त्रें हीं आहेत. वांशिक श्रेष्ठता नव्हे हें निर्विवाद सिद्ध झालें. कारण याच दोन गोष्टींच्या जोरावर जपाननें अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स

हॉलंड आणि ऑस्ट्रेलिया या सर्व श्वेतवर्णीय राष्ट्रांना सळो कीं पळो करून सोडलें.

जपानच्या दक्षिण दिग्विजयाचा आणखी एक क्रांतिकारी परिणाम म्हणजे आशियांतील युरोपीय वर्चस्वाला मिळालेली मूठमाती होय. १९४५ नंतर इंग्लंड, फ्रान्स, हॉलंड या राष्ट्रांना आशियांतील आपलीं साम्राज्यें टिकवून ठेवणें अशक्य झालें. अमेरिकेच्या मदतीशिवाय या युरोपीय राष्ट्रांना आपलें उरलें सुरलें वर्चस्वदेखील टिकवणें कठीण झालें आहे. १९४७ सालीं हिंदुस्थान, पाकिस्तान, ब्रह्मदेश हीं राष्ट्रें स्वतंत्र झालीं. तदनंतरच्या काळांत हिंदेशिया स्वतंत्र झाला. १९४८ नंतर कम्युनिस्ट क्रांति होऊन नवचीनचा उदय झाला. १९५२ मध्यें जागतिक परिस्थितीच्या दडपणामुळें जपानला स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा देण्याची घाई अमेरिकेला करावी लागली. युद्धोत्तर काळांतील या निरनिराळ्या घडामोडींकडे पाहिलें म्हणजे आशियाच्या पुनर्जन्माची सत्यता लक्षांत येते. या नव्या आशियाचीं अनेक मूल्यें पाश्चात्यांच्या उसनवारींतील असतील. यंत्रसंस्कृतीचा स्वीकार आशियानें निश्चितपणें केलेला दिसून येतो. युरोपप्रमाणें आशियांतील राष्ट्रांत सांस्कृतिक समानता आढळून येत नाहीं. कदाचित् सांस्कृतिक विविधता हें आशियाचें वैशिष्ट्य म्हणून सांगतां येईल. ही सर्व भिन्नता असूनदेखील जागतिक राजकारणांत आशियाला मिळणारें नवें स्थान खालील कारणांवर अवलंबून आहे.

आशियांतील चीन, हिंदुस्थान व जपान या तीन प्रमुख राष्ट्रांची प्रचंड लोकसंख्या ( ९५ कोटी ), तिची नजीकच्या भविष्य काळांत होणारी वाढ, आणि या वाढत्या लोकसंख्येला अपुरी पडणारी आशियांतील राष्ट्रांची साधनसामुग्री यांचा विचार करणें जरूर आहे. केवळ वीस वर्षांच्या अवधींत–१९७० मध्यें–या तीन राष्ट्रांची लोकसंख्या ११५ कोटि होईल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. आज असलेल्या लोकसंख्येपेक्षां अधिक

२० कोटि लोकसंख्येचें पोषण करण्याची जबाबदारी या राष्ट्रांवर पडणार आहे. लोकसंख्येच्या अपरिहार्य दडपणामुळें राष्ट्राला साम्राज्यवादी धोरण स्वीकारणें इष्ट वाटूं लागतें असा इतिहासाचा दाखला आहे. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत चीन, हिंदुस्थान आणि जपान हीं राष्ट्रें त्यांच्या लोकसंख्येचा प्रश्न सामोपचारानें न सुटल्यास साम्राज्यवादी धोरणाचा स्वीकार करतील असा दाट संभव आहे. आजवर इतरांची गुलामी पत्करणारा आशिया, उद्यां कदाचित् ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड आणि आफ्रिका या भूप्रदेशांना आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याचा प्रयत्न करील.

आशियांतील चीनसारख्या प्रमुख राष्ट्रानें केलेला साम्यवादाचा स्वीकार ही जागतिक राजकारणाच्या दृष्टीनें अत्यंत दूरगामी परिणाम करणारी घटना आहे. चीनच्या या साम्यवाद-स्वीकारामुळें पाश्चात्यांचें केवळ राजकीयच नव्हे तर आर्थिक व वैचारिक वर्चस्वहि पूर्ण नष्ट होण्याच्या पंथास लागलें आहे. ४५ कोटि लोकसंख्या असलेल्या या राष्ट्रानें साम्यवादाचा स्वीकार केल्यामुळें जागतिक सत्ता-समतोलन पार बदललें आहे. साम्यवादाच्या या प्रसारामुळें हिंदुस्थानच्या लोकशाही राजवटीला अनपेक्षित महत्त्व प्राप्त झालें आहे. कारण नवचीनच्या पाठोपाठ हिंदुस्थाननें साम्यवादाचा अंगिकार केला तर आशियांतील इतर कोणतेंहि राष्ट्र साम्यवादाच्या या लाटेंतून वांचू शकणार नाहीं. आशिया साम्यवादी झाला म्हणजे साऱ्या जगाला साम्यवादी होण्यासाठीं फारसा विलंब लागणार नाहीं.

मध्यपूर्वेंतील तेलांच्या खाणीमुळें आशियांतील मुस्लीम राष्ट्रांना जागतिक राजकारणांत अतोनात महत्त्व प्राप्त झालें आहे. आधुनिक युद्धाचें एक मुख्य साधन या राष्ट्रांच्या हातीं आहे. पेट्रोलच्या या राजकारणांत मध्यपूर्वेंतील इराण, इराक, सीरीया सौदीअरेबिया हीं अप्रगत, विघटित आणि दुर्बळ राष्ट्रें, अमेरिका, ब्रिटन आणि सोव्हिएट रशिया यांच्या

हातांतील प्यादीं बनलीं आहेत. पण त्याबरोबरच राष्ट्रवादी उत्थानामुळें हीं लहान राष्ट्रें प्रतिस्पर्धी राष्ट्रगटांच्या संघर्षांत आपलें स्वतःचें नवें स्थान निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहेत. तिसऱ्या महायुद्धाचा डोंबाळा पेटविण्याचें सामर्थ्य मध्यपूर्वेतील तेल खाणींत निश्चित आहे.

## चीन

जगाच्या लोकसंख्येपैकीं $\frac{1}{5}$ लोकसंख्या, प्राचीन वैभवशाली संस्कृति, विस्तीर्ण भूप्रदेश व अमूप साधनसामुग्री यांनीं युक्त असून देखील चीनचें नष्टचर्य अगदीं परवांपर्यंत संपलें नव्हतें. कन्फ्यूशियस आणि बुद्ध यांच्या शांतताप्रिय मानवताधर्माचा स्वीकार केलेला होता तरी देखील चीन म्हणजे वर्षानुवर्षें चालू असलेल्या अनेक अघोषित युद्धांचें रणक्षेत्र होतें. दुर्बल केंद्रीय सत्ता, आधुनिक राष्ट्रवादाचा अभाव, भाडोत्री शिपाईगिरी करण्यास सवकलेल्या सैनिकांचा मोठा वर्ग व चिनी राजकीय जीवनांत पदोपदीं आढळणारे युद्धदेव ( War Lords ) या सर्वांमुळें चीनच्या सर्वसामान्य जनतेला शांतता, सुबत्ता व प्रगतिप्रिय जीवन यांचा कधींच लाभ होऊं शकला नाहीं. १९ व्या शतकांत पाश्चिमात्य राष्ट्रांनीं चीनच्या राजकीय दुर्बलतेचा अवास्तव फायदा घेऊन त्या शतकाच्या अखेरीस चीनच्या भूमीवर आपले हातपाय भरपूर प्रमाणांत पसरले होते. नाममात्र राजकीय स्वातंत्र्याखेरीज चीनच्या वांट्यास सार्वभौम राष्ट्राचे दुसरे कोणतेच अधिकार राहिले नव्हते. कारण नादान व विलासलोलुप मांचू राजघराणें, केंद्रीय सत्तेला धाब्यावर बसविणारे ‘युद्धदेव’, भ्रष्ट नोकरशाही, सुखासीन बुद्धिजीवीवर्ग व उदासीन जनता यांमुळें कोणीहि उठावें व मन मानेल त्याप्रमाणें चीनचे लचके तोडावे असा प्रकार चालू होता. अर्थात्‌च या परिस्थितीचा वीट आलेले अनेक तरुण कार्यकर्ते ही सर्व परिस्थिती बदलून चीनमध्यें पाश्चात्य लोकशाही स्वरूपाचें राज्ययंत्र निर्माण व्हावें यासाठीं धडपडत होते.

१० ऑक्टोबर, १९११ रोजीं सुरू झालेल्या चिनी राज्यक्रांतीनें मांचू राजघराण्याला पदभ्रष्ट करून डॉ. सन्यत्सेनच्या नेतृत्वाखालीं आपल्या देशाची पाश्चिमात्य लोकशाहीच्या पद्धतीला धरून प्रगति करण्यास चिनी जनतेला वाट मोकळी करून दिली. पण या अफाट देशांत केवळ राज्य क्रांतीनें काम भागण्यासारखें नव्हतें. याचा कटु अनुभव नव्या चीनच्या निर्मात्याला आला व निराश मनानें डॉ. सन्यत्सेन राजकारणांतून निवृत्त होऊन कँटनला राहूं लागला. चीनचें अध्यक्षपद संधिसाधु 'युआनशिकाय' कडे गेलें. डॉ. सन्यत्सेनच्या निष्ठावन्त अनुयायांनीं राष्ट्रीय लोकपक्षाची (कॉमिन्टाँग) संघटना केली. चीनच्या अंतर्गत इतिहासांत या कालापासून इतक्या मोठ्या प्रमाणांत व गुंतागुंतीच्या घडामोडी झाल्या आहेत कीं, त्यांचें त्रोटक वर्णन देखील देतां येणें शक्य नाहीं. चीनच्या पांचवीला पुजलेल्या युद्धदेवांनीं आपापलें स्थान उत्तर चीनमध्यें बळकट केलें, तर कॉमिन्टाँगनें आपली सत्ता दक्षिण चीनमध्यें प्रस्थापित केली. कँटन हें नव्या सत्तेची राजधानी झालें. जनराष्ट्रवाद, जनतंत्र व जनसौख्य या डॉ. सन्यत्सेनच्या मूळ तत्त्वत्रयीवर साऱ्या चीनचें एकीकरण करण्याचा कॉमिन्टाँगनें चंग बांधला. १९२१ मध्यें डॉ. सन्यत्सेनची अध्यक्षपदीं निवड झाली. पण त्याला सतत लष्करी नेत्यांविरुद्ध झगडावें लागलें. परकीय साहाय्याच्या शोधांत डॉ. सन्यत्सेनला मॉस्कोनें हात दिला, व १९२३ मध्यें मायकेल बोरोडिन हा कॉमिन्टाँगचा सल्लागार या नात्यानें काम पाहण्यास चीनमध्यें आला. कम्युनिस्ट पक्षाच्या धर्तीवर कॉमिन्टाँगची पुनर्घटना त्यानें घडवून आणली. मॉस्कोच्या साहाय्याचा क्रमप्राप्त परिणाम म्हणजे चिनी कम्युनिस्टांना, कॉमिन्टाँगमध्यें मिळालेला प्रवेश व स्थान. या मॉस्को-कँटन युतीमुळें चीनच्या भवितव्याविषयीं अनेकांना आशा वाटूं लागली.

१९२४ सालीं डॉ. सन्यत्सेनचा मृत्यु झाला. बोरोडिनच्या मदतीनें चँग-कै-शेकनें कँटनमध्यें सत्ता बळकावली. सत्तासंपादनानंतर चँग-कै-शेकनें उत्तर चीनवर वर्चस्व स्थापण्याचे प्रयत्न सुरू केले. यॉंगत्सीचें खोरें आणि

शांघाय यांचा पाडाव १९२७ त झाला, व बोरोडीन व चँग यांची विचित्र शय्या-मैत्री तुटली. चँगचें धोरण धनिक व उद्योगपति यांना अनुकूल तर बोरोडीन पूर्णपणें कम्युनिस्ट. या काळापासूनच चीनमधील कम्युनिस्ट व कॉमिन्टँग यादवीला सुरुवात झाली. १९२८ मध्यें चँगनें कॉमिन्टँगची एकपक्षीय सत्ता अप्रतिहतपणें चालावी अशा आशयाचा कायदा जारी केला. पण युद्धदेवांचें सामर्थ्य खची करण्याचे त्याचे सारे प्रयत्न निष्फळ ठरले. अनियंत्रित युद्धदेव, स्वार्थांध प्रांतिक क्षत्रप, कॉमिन्टँगमधील अंतर्गत लाथाळी व कम्युनिस्टांचा वाढता विरोध यांमुळें चिनी यादवीचें स्वरूप अधिकाधिक बिकट होत गेलें.

१९३१ सालीं जपाननें मांच्यूरिया घशांत घालण्यास सुरुवात केली. या परकीय आक्रमणाचा परिणामदेखील एकी घडवून आणण्यांत झाला नाहीं. चिनी जनतेनें स्वयंस्फूर्तीनें जपानी मालाविरुद्ध पुकारलेल्या बहिष्कारामुळें जपानचा व्यापार पार बसला. पण या आर्थिक प्रतिकाराला राजकीय पाठिंब्याची आवश्यकता होती. चँग आणि त्याच्या गटाचें लक्ष जपानकडे नसून सत्ता आपल्या हातांत कशी राहील या गोष्टींकडेच होतें. त्यामुळें परकीय आक्रमणाविरुद्ध राष्ट्रीय उठाव करणें अशक्य झालें. १९३७ पर्यंत कॉमिन्टँग विरुद्ध कम्युनिस्ट व एकमेकांच्या विरुद्ध असलेले युद्धदेव यांचीं अनेक यादवीयुद्धें एकाच वेळीं चालू होतीं. १९३७ मध्यें जपाननें प्रत्यक्ष चीनवर आक्रमण सुरू केलें. या आक्रमणामुळें मात्र कम्युनिस्ट व कॉमिन्टँग पक्षांनीं मागचे मतभेद विसरून एकजूट केली. लोकसेनेची निर्मिति, सहकारी तत्त्वावर उद्योगधंदे व सहकारी शेती आणि उदासीन, अज्ञानी चिनी जनतेला राजकीय दृष्टया जागृत करून त्यांच्यांत नवचैतन्य निर्माण करणें इत्यादि राष्ट्रपोषक चळवळींकडे सर्वांनीं लक्ष केंद्रित केलें. अफाट प्रदेश व अगणित लोकसंख्या यांमुळें जपानला चिनी प्रकरणाचा शेवट करणें कधींच शक्य झालें नाहीं.

१९४१ मध्यें जपाननें जागतिक युद्धांत भाग घेतांच एकाकी चाललेलें चिनी जपानी युद्ध जागतिक युद्धाचा महत्त्वाचा भाग बनलें. अमेरिकेनें जपानला शह देण्यासाठीं चीनला युद्धसाहित्य व लष्करी तज्ज्ञांची मोठ्या प्रमाणावर मदत देण्यास सुरुवात केली. या मदतींतूनच चिनी-अमेरिकन संबंधांत अनेक प्रकरणें निर्माण झालीं. जनरल स्टिलवेल-सारख्या लष्करी तज्ज्ञांनीं चिनी सैन्याची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या प्रयत्नामुळें चँगच्या जुन्या भ्रष्ट व सरंजामशाही लष्करी व्यवस्थेचें स्वरूप उघडकीस आलें. स्टिलवेलचे सुधारणावादी व लोकशाहीपोषक प्रयत्न चँगच्या गटाला आवडणें अशक्य होतें. प्रेसिडेंट रूझवेल्ट यांच्या राजकीय आयुष्यांतील एक घोडचूक या वेळीं घडून आली. स्टिलवेलला परत बोलावण्यांत आलें. त्याच्या जागीं आलेल्या अधिकाऱ्यांनीं अमेरिकन युद्धसाहित्याची मदत केवळ कॉमिन्टॉंग सैन्यालाच दिली. कॉमिन्टॉंगनें तिचा उपयोग परकीय शत्रूंविरुद्ध करण्याऐवजीं राजकीय शत्रूंविरुद्ध केला. कॉमिन्टॉंग व कम्युनिस्ट यांच्या यादवीला दिवसेदिवस अधिक तीव्र स्वरूप प्राप्त झालें. युद्धांत होरपळून निघालेल्या चिनी जनतेला शांतता मिळण्याऐवजीं या यादवीचे चटके बसूं लागले.

प्रे. रूझवेल्टच्या मृत्यूनंतर अमेरिकेच्या सुदूर पूर्व ( Far East ) धोरणांत अधिकाधिक प्रतिगामीपणा येऊं लागला. जनतेचा पाठिंबा नसलेल्या लोकशाहीविरोधी प्रतिगामी चँगच्या भ्रष्ट राजवटीला उचलून धरण्याचें चुकीचें धोरण अमेरिकेनें स्वीकारलें. अव्वाजावधि डॉलर्सची मदत या राजवटीला देण्यांत आली. पण त्याचा उपयोग चिनी जनतेला होण्याऐवजीं कॉमिन्टॉंगच्या लांचखाऊ, नीतिभ्रष्ट व स्वार्थांध नोकरशाहीचें उखळ पांढरें करण्यांत झाला. १९४५ सालीं युद्ध संपल्यानंतर चँग-कै-शेकचें सरकार सर्व चीनचें केंद्रीय सरकार म्हणून अस्तित्वांत होतें. अमेरिका, सोव्हिएट रशिया, ब्रिटन इत्यादि सर्व राष्ट्रांनीं चँगला राजनैतिक मान्यता दिली होती. माव-त्से-तुंग व त्याचा कम्युनिस्ट पक्ष यांच्या हातीं

चीनचीं सूत्रें जातील अशी कल्पनाहि कोणास आली नसती. पण तीन वर्षांच्या अवधींतच चीनचें नेतृत्व मावकडे आलें. कम्युनिस्टांच्या या विजयाचीं कारणें शोधावयास फारसें दूर जावयास नको. कम्युनिस्टांनीं प्रथमपासूनच परकीय शत्रूला अतिशय कसून विरोध केला. गनिमी छापे घालून चीनमधील जपानी सैन्यांना सळो कीं पळो करून सोडलें. मार्क्सवादावर आत्यंतिक निष्ठा असूनहि स्वदेशांतील परिस्थितीनुरूप कम्युनिस्टांनीं त्यांच्या ताब्यांतील प्रदेशांत जमिनीची फेरवांटणी करून कसणाऱ्यांच्या ताब्यांत जमीन दिली. राज्यव्यवस्थेंतील भ्रष्ट व लांचखाऊ अधिकाऱ्यांना काढून टांकलें. स्थानिक स्वरूपाची लोकशाही प्रस्थापित केली. अनेक शतकें अज्ञानांत वावरणाऱ्या चिनी जनतेला साक्षर केलें. गुलामसदृश जीवन जगणाऱ्या चिनी स्त्रियांना समान अधिकारांची देणगी दिली. थोडक्यांत डॉ. सन्यत्सेनच्या १९११ च्या राजकीय क्रांतीची खरी परिणति, सामाजिक व आर्थिक क्रांति घडवून आणून कम्युनिस्टांनीं केली. भुकेल्या जनतेला अन्नवस्त्र देणाऱ्या कम्युनिस्ट राजवटीला तिनें मनोभावानें मदत करावी यांत नवल तें कसलें ?

चँगची राजवट म्हणजे फ्रान्समधील ‘बुर्बोन’ राजघराण्याप्रमाणें नव्या परिस्थितीशीं जुळतें न घेणारी व जुनें न सोडणारी अशी असल्यामुळें, कम्युनिस्टांच्या नव्या नेतृत्वाकडून तिचा पाडाव होणें स्वाभाविकच होतें. यांतच भर म्हणून कीं काय कल्पनातीत चलनवाढ, कोलमडलेली अर्थव्यवस्था व लांचखाऊ अधिकारीवर्ग यांची जोड या राजवटीला मिळालेली होती. जनतेचें सहकार्य मिळविण्यासाठीं केवळ शाब्दिक वचनें व उच्च घोषणा पुरेशा नसून प्रत्यक्ष कृतीची आवश्यकता असते हें कॉमिन्टँगच्या नेत्यांना आकलन झालेलें दिसत नाहीं. कम्युनिझमचा विरोध व पाडाव केवळ सैनिकी सामर्थ्यावर करणें अशक्य आहे याची जाणीव सर्व चीन हातांतून गेल्यानंतरहि चँगला झाली नाहीं. परिस्थितिपराङ्मुख चँगला फोर्मोसांत आश्रय घेणें भाग पडलें.

'चीनच्या महापुरुषाला जागें करूं नका. जागृत चीन साऱ्या जगाला हादरवून सोडील' असें नेपोलियननें म्हटलें होतें. आज ही उक्ति सत्य ठरूं पाहत आहे. चीनच्या इतिहासांत आजवर न घडलेली गोष्ट म्हणजे बलिष्ठ केंद्रीय सत्ता. आज कम्युनिस्टांच्या प्रयत्नानें बलिष्ठ केंद्रीय सरकार निर्माण झालें आहे. सर्व चीनमध्यें या केंद्रीय सत्तेचा एकसूत्री अंमल चालूं केला. चिनी जनतेला कधींहि न मिळालेली शांतता लाभली. या सर्व घटनांमुळें नवचीनचें सामर्थ्य वाढत आहे. चीनच्या या सामर्थ्यामुळें प्रशान्त महासागरांतील जागतिक राजकारणाचे सारे डाव उधळले जात आहेत. कोरियांतील युद्धाचें उदाहरण या दृष्टीनें उद्बोधक आहे. या एकाच उदाहरणावरून भविष्य काळांत नवचीनला जागतिक राजकारणांत केवढें महत्त्वाचें स्थान आहे हें ध्यानांत येऊं शकतें. परंतु या परिस्थितींत देखील अमेरिकेनें चीनला राजनैतिक मान्यता नाकारून व पर्यायानें सुरक्षासमितींत प्रवेश टाळून चालवलेलें धोरण, म्हातारीनें कोंबडा झांकून सूर्योदय बंद पाडण्याच्या प्रयत्नाइतकेंच हास्यास्पद आणि निष्फळ नाहीं कां? अमेरिकेच्या या आडमुठ्या धोरणामुळें पाश्चात्य लोकशाही राष्ट्रें अजूनहि साम्राज्यवादीच आहेत या साम्यवादी प्रचाराला उत्तर देतां येत नाहीं.

चीनमधील कम्युनिस्टविजय म्हणजे अमेरिकेच्या व पर्यायानें पाश्चात्य राष्ट्रांच्या पौर्वात्य धोरणाचा सर्वांत मोठा पराभव आहे, व अर्थात्च साम्यवादी गटाचा विजय आहे. चीनमधील कम्युनिस्ट क्रांतीमुळें आग्नेय आशियांतील, हिंदु-चीन, सयाम, मलाया, इंडोनेशिया, ब्रह्मदेश व कांहीं अंशीं हिंदुस्थान या देशांतील कम्युनिस्ट क्रांतीचा संभव वाढला आहे. भारत वगळल्यास इतर देशांत चिनी अल्पसंख्यांक जमाती आहेत. आज मलायांत ब्रिटिशांना नकोसे करून सोडणारे कम्युनिस्ट मुख्यत: चिनीच आहेत. हिंदु-चीन मधील हो-चि-मिन्हच्या सरकारला साम्यवादी चीनचा नैतिक व लष्करी पाठिंबा मिळत असल्यामुळें फ्रेंच

व त्यांच्या हातांतील बाओदायचें नामधारी सरकार यांना हो-चि-मिन्हच्या पराभव करणें शक्य झालेलें नाहीं. इतकेंच नव्हे तर अमेरिकन मदतीशिवाय स्वतःचें आसन टिकविणें कठीण झालें आहे. इंडोनेशिया व ब्रह्मदेश या देशांत असंतुष्ट कम्युनिस्ट गटांचे उठाव होत आहेत. या घटनांकडे लक्ष दिलें म्हणजे ऐतिहासिक दृष्ट्या चीनमधील साम्यवादी क्रांतीचें महत्त्व १९१७ च्या रशियन क्रांतीपेक्षां अधिक आहे, हें सहज पटेल.

नवचीनचा हा उदय अनेक दृष्टीनें महत्त्वाचा ठरणारा आहे. चीननें साम्यवादाचा अंगिकार केल्यामुळें सोव्हिएट राष्ट्रगटांत रशियाच्या नेतृत्वाला संभाव्य प्रतिस्पर्धी निर्माण झाला आहे. नवचीनमध्यें सोव्हिएट रशियाप्रमाणें औद्योगीकरण घडून येईल. तसें झाल्यास केवळ आशियाच्याच नव्हे तर जगाच्या अर्थव्यवस्थेंत फार मोठी उलाढाल होईल. कारण चीनचें मनुष्यबळ व अनुपयोगित अगणित साधनसामुग्री यांचा वापर झाल्यास पूर्वीच्या उद्योगप्रधान राष्ट्रांना हादरा बसेल. जागतिक सत्ता-राजकारणांत, सोव्हिएट रशिया आणि अमेरिका यांतील संभाव्य संघर्षांत नवचीनची मदत सोव्हिएट रशियाला होईल हें उघड गुपित आहे. पण आशियाच्या राजकारणांत सोव्हिएट रशिया आणि नवचीन यांचे मतभेद विकोपास जाण्याची शक्यता अमेरिकन गटाला वाटते.

स्टॅलिनच्या मृत्यूमुळें जागतिक साम्यवादाचें नेतृत्व मॅलेन्कॉव्ह ऐवजीं माव, व त्याचा नवचीन याकडे येईल असें भाकित वर्तविण्यांत येतें. चीनमधील यशस्वी क्रांतीचा सूत्रधार या नात्यानें मावचें स्थान मॅलेन्कॉव्हपेक्षां खात्रीनें वरचें आहे. साम्यवादाचें केंद्र मॉस्को ऐवजीं पेकिंग होईल कीं नाहीं हा प्रश्न विवाद्य असला तरी एक गोष्ट निश्चित दिसते. स्टॅलिन व माव यांच्या परस्पर संबंधांत असलेलें रशियन नेत्याचें श्रेष्ठत्व नव्या संबंधांत अस्तित्वांत राहाणार नाही. त्यामुळें नवचीन

व सोव्हिएट रशिया यांचे संबंध बरोबरीच्या नात्यानें येतील. त्याचा परिणाम नवचीनचें धोरण अधिक स्वतंत्र होण्यांत होऊं शकेल. अमेरिकन मुत्सद्यांच्या अपेक्षेप्रमाणें या दोन साम्यवादी राष्ट्रांत विरोध निर्माण होण्याची शक्यता मात्र दिसत नाहीं. नवचीननें युगोस्लाव्हियाचें अनुकरण करावें असें अमेरिकेला वाटलें तरी वस्तुस्थिति भिन्न आहे. नवचीनला सोव्हिएट रशियाच्या आक्रमणाची भीति वाटत नाही. उलट रशियन मदतीनें आर्थिक विकास लवकर करतां येईल असें नवचीनला वाटतें.

## हिंदुस्थान

इ. स. १६०० सालीं स्थापन झालेल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या हातीं अवघ्या दोन शतकांच्या अवधींत हिंदुस्थानचीं सारीं सूत्रें आलीं. 'व्यापारापाठोपाठ साम्राज्य येतें' या म्हणीचें प्रत्यंतर आशियांतील इतर राष्ट्रांप्रमाणें हिंदुस्थानांतहि आलें. हिंदुस्थान काबीज करण्यासाठीं इंग्रजांना द्यावें लागलेलें मोल अत्यंत थोडें होतें. प्रो. सीली या इंग्रज इतिहासकारानें म्हटल्याप्रमाणें हिंदी लोकांनींच इंग्रजासाठीं हिंदुस्थान जिंकला. इंग्रजी अंमलामुळें भारतीय जीवनावर पाश्चात्य संस्कृतीचे अनेकविध परिणाम झाले. ब्रिटिशपूर्व स्वयंपूर्ण कृषिप्रधान अर्थव्यवस्था व त्यावर आधारलेली समाजरचना खिळखिळी झाली. पाश्चात्य यांत्रिक उत्पादनामुळें ग्रामोद्योग नष्ट झाले. इंग्लंडनंतर सुमारें एका शतकानें हिंदुस्थानांत औद्योगिक क्रांतीला सुरुवात झाली. पण परकीय राजसत्तेच्या वर्चस्वामुळें तिला अनिष्ट वळण लागलें. मूलभूत उद्योगधंद्यांची वाढ न होतां दुय्यम उद्योगधंद्यांची वाढ झाली. ब्रिटिश अर्थव्यवस्थेला पूरक व पोषक ठरणारी अर्थव्यवस्था हिंदुस्थानांत प्रयत्नपूर्वक निर्माण करण्यांत आली.

राजकीय जागृतीच्या दृष्टीनें विचार करतां ब्रिटनच्या अधिराज्यामुळें हिंदुस्थानांत ऐक्यभावना निर्माण होण्यासाठीं योग्य पार्श्वभूमि मिळाली. परकीय सत्तेला विरोध हा ऐक्यभावनेच्या मुळाशीं होता. ब्रिटननें

मात्र आपलें साम्राज्य टिकविण्यासाठीं साम्राज्यवादी 'फोडा व झोडा' हें धोरण प्रथमपासून शेवटपर्यंत चालू ठेविलें. ब्रिटिश सत्ता हिंदुस्थानांत निर्माण होण्यापूर्वी विजेता म्हणून आलेला प्रत्येक समाज याच भूमींत स्थाईक झाला. परिणामतः अनेक वंश, अनेक धर्म, अनेक भाषा यांच्या मिश्रणामुळें एकात्म समाज निर्माण होऊं शकला नाहीं. याच एकात्मतेच्या अभावाचा कुटिल ब्रिटिश मुत्सद्यांनीं उपयोग करून घेतला. हिंदुस्थानांतील हिंदु व मुसलमान या दोन प्रमुख जमातींत परस्परांविषयीं अविश्वास, विद्वेष, दुजा भाव निर्माण करण्यांत ब्रिटिश मुत्सद्दी यशस्वी झाले. १९०७ सालीं मोर्ले-मिंटो सुधारणा कायद्याप्रमाणें निर्माण केलेल्या जातीय मतदार संघाच्या विषबीजाची परिणति १९४७ सालीं पाकिस्तान निर्माण होण्यांत झाली.

ब्रिटिश सत्तेमुळें हिंदुस्थानचा पाश्चात्य संस्कृतीशीं घनिष्ठ संबंध आला. त्याचा परिणाम म्हणजे शैक्षणिक व सामाजिक क्षेत्रांत नवे विचार व नव्या कल्पना प्रसार पावल्या. पाश्चात्य विज्ञान, कला, साहित्य व चालीरीति यांचा अंगिकार हिंदुस्थाननें केला. या यंत्रप्रधान संस्कृतीच्या स्वीकारामुळें केवळ हिंदुस्थानची अर्थव्यवस्थाच बदलली असें नव्हे तर जीवनाच्या सर्व क्षेत्रांतच आमूलाग्र बदल घडून आले. अव्वल इंग्रजींत पाश्चात्यांचें अंधानुकरण व आत्मविस्मृतीची कमाल मर्यादा गांठली गेली. इंग्रजी राज्य हें ईश्वरी वरदान आहे या विचारांचा पगडा समाजाग्रणींवर होता. परकीय सत्तेविषयीं वरील स्वाभिमानशून्य भावनेपासून तों १९४२ मधील गांधीजींच्या 'चलेजाव' या क्रांतिकारी घोषणेपर्यंत राजकीय प्रगतीचीं स्थित्यंतरें आपणांला दिसून येतात. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत आशियांतील इतर राष्ट्रांप्रमाणेंच हिंदुस्थानांतील स्वातंत्र्यवादी चळवळींना उठाव मिळाला. स्वातंत्र्याच्या या चळवळींत युद्धकाळांत सुभाषचंद्र बोस यांच्या नेतृत्वाखालीं आझाद हिंद सेनेनें हिंदुस्थानच्या बाहेर केलेल्या प्रयत्नांनाहि एक विशिष्ट स्थान आहे. तो प्रयत्न निष्फळ ठरला; पण त्याचे परिणाम मात्र दूरगामी झाले.

१९४५ सालीं ब्रिटनचें नवें समाजवादी मजूर मंत्रिमंडळ अधिकारारूढ झालें. हुजूर पक्षाचें साम्राज्यवादी धोरण तसेंच चालू राहणें शक्य नव्हतें. कारण इंग्लंडमधील मजूर पक्षानें हिंदुस्थानच्या राजकीय आकांक्षांविषयीं प्रथमपासूनच सहानुभूतीचें व समजुतीचें धोरण स्वीकारलें होतें. शिवाय दुसऱ्या महायुद्धांत जर्मन बॉंबवर्षावामुळें ब्रिटनचें अपरिमित औद्योगिक व आर्थिक नुकसान झालें होतें. आंतरराष्ट्रीय परिस्थिति, ब्रिटनची खालावलेली अर्थव्यवस्था व भारतांतील वाढती अशांतता—खलाशांचें नाविक बंड व प्रत्यक्ष प्रतिकाराच्या मुस्लीम लीगच्या चळवळी—यांमुळें ब्रिटिशांना भारतांतून काढता पाय घेणें भाग होतें. भारतीय स्वातंत्र्याची समस्या अधिकाधिक बिकट होत चालली. या पेंचप्रसंगांतून ब्रिटननें आपली सुटका मोठ्या चतुराईनें करून घेतली. त्यांनीं कॉंग्रेसच्या हातावर खंडित हिंदुस्थानचें व लीगच्या हातीं पाकिस्तानचें उदक सोडून दोन्ही नव्या राष्ट्रांची मैत्री संपादन केली. लॉर्ड मौंटबॅटननें तीन जून १९४७ रोजीं भारताच्या विभाजनाची व ब्रिटिशांच्या राज्यत्यागाची योजना निश्चित शब्दांत घोषित केली. जनतेनें व नेत्यांनीं विभाजन निमूटपणें मान्य केलें. ब्रिटिश मुत्सद्देगिरीचा हा अभूतपूर्व विजय होता.

माऊंटबॅटन योजनेप्रमाणें भारताचे १५ ऑगस्ट, १९४७ रोजीं विभाजन करण्यांत आलें. पश्चिम पंजाब, वायव्य सरहद्द प्रांत, सिंध व पूर्व बंगाल यांचें पाकिस्तान निर्माण झालें. पाकिस्तान व शेष भारताला १९४७ सालीं ब्रिटिश राष्ट्रकुटुंबांतील वसाहतीचा दर्जा मिळाला. स्वातंत्र्यवादी भारतीय जनतेला ही स्थिति अधिक काळ मान्य होणें शक्य नव्हतें. घटनासमितीनें दोन वर्षें खपून निर्माण केलेल्या घटनेप्रमाणें भारत हें एक प्रजासत्ताक सार्वभौम लोकशाही राष्ट्र निर्माण झालें.

विभाजनानंतरदेखील ३८ कोट लोकसंख्या असलेला स्वतंत्र भारत त्याच्या विशिष्ट भौगोलिक स्थानामुळें प्रशांत महासागरांतील राजकारणांत

महत्त्वाचा ठरला आहे. त्याहीपेक्षां अधिक महत्त्वाची बाब म्हणजे भारताचा लोकशाहीस्वीकार होय. १५० वर्षांच्या ब्रिटिश अंमलामुळें हिंदी जनतेचें लक्ष ब्रिटिशांच्या लोकशाही राज्यपद्धतीकडे आकृष्ट झालें. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं वेळोवेळीं दिलेल्या सुधारणाकायद्यांतदेखील लोकशाही राज्यपद्धतीचाच अल्प कां होईना पुरस्कार केलेला होता. देशांतील सर्वात बलिष्ठ राजकीय पक्षांची निष्ठा लोकशाहीवर होती. या लोकशाहीच्या स्वीकारामुळें लोकशाही गटाचें पारडें सोव्हिएट गटाच्या बरोबरीनें आलें आहे. नवचीनच्या साम्यवाद स्वीकारानें प्रशांत महासागरांतील राजकारणाचें एका टोंकाला गेलेलें पारडें लोकशाही भारतामुळें समतोल झालें आहे.

भारतांतील लोकशाही यशस्वी व्हावयाची असेल तर चाळीस कोटी जनतेच्या जीवननिर्वाहाची समस्या यशस्वी रीतीनें सोडवितां आली पाहिजे. या दृष्टीनें विचार करतां दुसऱ्यांच्या साहाय्याशिवाय केवळ स्वतःच्या सामर्थ्यावर ही समस्या सोडवणें भारताला शक्य नाहीं. शेतीचें यांत्रिकीकरण व सामूहीकरण करणें, प्रचण्ड धरणें बांधणें, विद्युत्शक्ति निर्माण करणें, देशाचें औद्योगीकरण करणें, बहुसंख्य समाजाला साक्षर करणें व देशाचें जीवनमान वाढवणें. या सर्व कार्यांसाठीं लागणारा अवाढव्य पैसा व तंत्रज्ञ या दोन्ही गोष्टींचा भारताजवळ अभाव आहे. म्हणून परकीय भांडवलाची व तंत्रज्ञांची मदत घेणें आवश्यक झालें आहे. अशा प्रकारची मदत देण्याचें सामर्थ्य केवळ अमेरिका व सोव्हिएट रशिया या दोन राष्ट्रांकडेच आहे. त्यांपैकी अमेरिकेच्या मदतीचा ओघ हिंदुस्थानकडे वळला आहे. कारण, भारताचें परराष्ट्रीय धोरण इंग्लंड-अमेरिकादि लोकशाही राष्ट्रें व सोव्हिएट राष्ट्रगट यांच्या संघर्षांत राजकीय तटस्थतेचें आहे. हिंदुस्थानच्या आर्थिक क्षेत्रांत अमेरिकेचा प्रवेश मोठ्या प्रमाणावर झालेला आहे. जागतिक साम्यवादविरोध हें अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणाचें सूत्र आहे. या सूत्राप्रमाणेंच आशियांतील चीन-खेरीज उरलेल्या राष्ट्रांत साम्यवादाचा प्रसार होऊं नये म्हणून अमेरिकेनें

मोठ्या प्रमाणावर आर्थिक साहाय्याचें धोरण आंखलें आहे. विशेषतः नवचीनशीं अनेक दृष्टीनें समबल असलेला हिंदुस्थान साम्यवादी होऊं नये म्हणून अमेरिकेचे आटोकाट प्रयत्न चालू आहेत. या आर्थिक मदतींमुळें आपल्या सार्वभौमत्वाचा नाश होऊं नये अशी भारताची इच्छा आहे.

सत्ता-राजकारणाच्या दृष्टीनें हिंदुस्थानचें मूल्यमापन केल्यास लोकसंख्या, भूविस्तार व कांहीं अंशीं साधनसामुग्री याबाबतींत अनेक राष्ट्रांपेक्षां हिंदुस्थान वरचढ ठरेल. औद्योगिक व शास्त्रीय प्रगतीच्या दृष्टीनें हिंदुस्थानची गणना पहिल्या दहा राष्ट्रांत होते. आग्नेय आशियांतील नवोदित राष्ट्रांत हिंदुस्थान हें एकच राष्ट्र अत्यंत कठीण परिस्थितींत देखील स्थिर राज्यव्यवस्था निर्माण करूं शकलें. वरील सर्व कारणांमुळें विसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत हिंदुस्थान हें जगांतील पहिल्या दर्जाचें राष्ट्र होईल, अशी अपेक्षा करणें चूक ठरणार नाहीं. नवचीनप्रमाणेंच सुरक्षा समितींतील एक कायमची जागा भारताला मिळणें वस्तुस्थितीला धरून होईल. हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय धोरणावर जागतिक शांतता पुष्कळांशीं अवलंबून आहे. आणि सध्याचें तटस्थतेचें धोरण जागतिक शांततेला पोषक ठरलें आहे.

---

१९२० च्या जानेवारी महिन्याच्या दहा तारखेस राष्ट्रसंघाचा जन्म झाला. १९३९ सालीं दुसरें महायुद्ध सुरू झालें. तेव्हांच राष्ट्रसंघाचा मृत्यु ओढवला पण त्याचा अधिकृत मृत्युदिन ८ एप्रिल, १९४६ हा आहे. कारण त्या दिवशीं जमलेल्या ३४ राष्ट्रांच्या संघ-परिषदेनें आपल्या हातांनीं राष्ट्रसंघाला रीतसर मूटमाती दिली.

विसाव्या शतकांतील आंतरराष्ट्रीय सहकार्याच्या या पहिल्या महान् प्रयत्नाचें अपयश त्याच्या जन्मांतच सांठवलेलें होतें. राष्ट्रसंघाचा जन्म हा व्हर्सायच्या तहाशीं निगडित केल्यामुळें, जेत्यांनीं निर्माण केलेली आंतरराष्ट्रीय परिस्थिति कायम ठेवण्यासाठीं झटणें हें राष्ट्रसंघाला क्रमप्राप्तच होतें. राष्ट्रसंघाच्या अपयशाचें दुसरें महत्त्वाचें कारण ध्येयवादी विल्सनच्या कल्पनांना त्याच्याच देशांत मिळालेला विराम व त्यांमुळें अमेरिकेनें राष्ट्रसंघांत प्रवेश करण्यास दिलेला नकार. ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्यांनीं राष्ट्रसंघाचा उपयोग जागतिक शांतता, ऐक्य व सहकार्य यांची प्रगति करण्यासाठीं न करतां आपल्या परराष्ट्रीय राजकारणासाठीं सोईस्कर-रीत्या केला. पण प्रसंग येतांच राष्ट्रसंघाच्या याच जबाबदार सभासदांनीं इटलीसारख्या आक्रमक राष्ट्राविरुद्ध खंबीर उपाययोजना करण्यास नकार दिला.

राष्ट्रसंघाचें पहिलें दहा वर्षांचें आयुष्य (१९२०–१९३०) खात्रीनें यशस्वी होतें. स्वीडन व फिनलंडमधील 'ऑलंड' बेटाविषयीचें भांडण, पोलंड व जर्मनी मधील 'अपरसायलेशिया' विषयींची कटकट, ग्रीस व बल्गेरिया यांचा १९२५ मध्यें उडालेला खटका इत्यादि लहान सहान प्रकरणें राष्ट्रसंघानें सामोपचारानें मिटवून स्वतःच्या प्रतिष्ठेंत भर घातली. मागासलेल्या राष्ट्रांसाठीं निर्माण करण्यांत आलेलीं विश्वस्त योजना

समाधानकारक ठरली होती. युद्धोत्तर आर्थिक अडचणींतून मार्ग काढण्या-साठीं राष्ट्रसंघानें पुढाकार घेतला होता. गुलामगिरी नष्ट करणें, स्त्रियांचा व मुलांचा 'व्यापार' थांबविणें, घातक मादक द्रव्यांवर नियंत्रणें बसविणें, आंतरराष्ट्रीय मजूर कायदे सुधारून मजुरांच्या हिताचें संवर्धन करणें इत्यादि अनेक क्षेत्रांत राष्ट्रसंघाचें पाऊल प्रगतीच्या मार्गावर होतें.

१९३० नंतर मात्र ही परिस्थिति झपाट्यानें बदलून राष्ट्रसंघ म्हणजे कांहीं बड्या राष्ट्रांची एक 'चर्चेची चावडी' झाली. राष्ट्रसंघाच्या दुर्बलतेचा पहिला उपहास जपाननें केला. जपान व चीन राष्ट्रसंघाचे सभासद होते. अशा परिस्थितींत जपाननें १९३१ च्या सप्टेंबर महिन्यांत मांचुरियांत पाय पसरावयास सुरुवात केली. चीननें राष्ट्रसंघाकडे तक्रार नोंदविली. दोन्ही राष्ट्रांनीं आपापलीं सैन्यें मागें घ्यावींत हा राष्ट्रसंघाचा आदेश जपाननें धुडकावला. नंतर नेमण्यांत आलेले लिटन कमिशन, राष्ट्रसंघाचा कमिशनच्या रिपोर्टावरील ठराव व जपानचा सभासदत्वाचा त्याग, या घडलेल्या घटनांनीं प्रबळ राष्ट्राच्या आक्रमणाला थोपविण्यासाठीं राष्ट्रसंघ असमर्थ आहे हें साऱ्या जगाला—विशेषतः लहान राष्ट्रांना—कळून चुकलें. जपान नंतर नाझी जर्मनीनें आपल्या सभासदत्वाचा राजीनामा दिला. १९३५ मध्यें इटलीनें ॲबिसिनीयाचा घास घेण्यास सुरुवात केली. त्या वेळीं राष्ट्रसंघ नैतिक व आर्थिक बहिष्काराच्या मार्गानें आक्रमक राष्ट्राला वठणीवर आणण्याचा फार्स करण्यांत गुंतला. केवळ तीन वर्षांच्या आंत इटलीचें ॲबिसिनीयावरील स्वामित्व मान्य करण्यास राष्ट्रसंघाच्या आधार-स्तंभांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. स्पॅनिश यादवी युद्धांत, फॅसिस्ट राष्ट्रें उघडपणें फ्रॅन्कोला मदत करीत असतांना राष्ट्रसंघ मात्र तटस्थतेचें तुणतुणें वाजवीत स्वतःची प्रतारणा करीत होता. १९३६ च्या मार्च महिन्यांत जर्मनीनें ऱ्हाईनलॅंडमध्यें प्रवेश करून व्हर्सायच्या तहाविरुद्ध लष्करी तटबंदीला सुरुवात केली. १९३८ मध्यें ऑस्ट्रिया, व १९३९ मध्यें झेकोस्लोव्हाकिया गिळला. पण राष्ट्रसंघानें त्याबाबत हूं कीं चूं केलें नाहीं.

प्रथमपासून बाहेर असलेल्या अमेरिका, जपान, जर्मनी, इटली इत्यादि आक्रमक राष्ट्रांनीं दिलेली सोडचिठ्ठी, लहान राष्ट्रांनी त्यांचेंच केलेलें अनुकरण, सामुदायिक संरक्षणावरील सर्वांचाच उडालेला विश्वास, यांमुळें राष्ट्रसंघाची स्थिति जीवन्मृताप्रमाणें झाली होती. १९३९ सालीं दुसरें महायुद्ध सुरू झालें व एका दृष्टीनें राष्ट्रसंघाचा अंत तेव्हांच झाला. पण सुरुवातीला म्हटल्याप्रमाणें राष्ट्रसंघाचें कलेवर आणखी सात वर्षे ठेवण्यांत येऊन १९४६ मध्यें त्याचें विधिपूर्वक दफन करण्यांत आलें. मानवी समाजाची स्मरणशक्ति फारच मर्यादित असते. १९१४ ते १९१८ मध्यें झालेल्या नरसंहारामुळें शिकलेलें सारें शहाणपण अवघ्या वीस वर्षांत नष्ट झालें. जगानें पुन्हां एकदां स्वतःच्या हातानें आपल्याला अधोगतीच्या गर्तेत ढकलून दिलें. आंतरराष्ट्रीय शांतता 'मानवी हक्क' सर्वांची आर्थिक प्रगति व सामाजिक प्रगति यांच्या रक्षणासाठीं व वर्धनासाठीं नव्या राष्ट्रसंघटनेची आवश्यकता निर्माण झाली.

## संयुक्त राष्ट्रसंघटना

दुसरें महायुद्ध चालू असतांना १९४२ सालीं २६ मित्र राष्ट्रांनीं आपल्या युद्ध ध्येयांची घोषणा केली. त्या वेळीं प्रथम 'संयुक्त राष्ट्रें' या शब्दाचा उपयोग करण्यांत आला. युद्धाची अखेर ही दोस्तांच्या बाजूनें होणार याविषयीं दुसऱ्या आघाडीनंतर कोणालाच संशय नव्हता. त्यामुळें युद्धांतील प्रमुख सहकाऱ्यांनीं (अमेरिका, इंग्लंड, रशिया व चीन) युद्धोत्तर काळातील नव्या आंतरराष्ट्रीय संघटनेचा पाया युद्ध चालू असतांनाच १९४४ सालीं डंबर्टन ओक्स येथें एकत्र येऊन घातला. पण युरोपीय महायुद्ध संपल्यानंतरच आंतरराष्ट्रीय संघटनेचें मंदिर उभारणें शक्य झालें. सॅनफ्रॅन्सिस्को येथें जमलेल्या ५० राष्ट्रांच्या प्रतिनिधींनीं सतत दोन महिने विचारविनिमय करून २६ जून, १९४५ रोजीं संयुक्त राष्ट्रसंघटनेची सनद जगांतील जनतेला सादर केली.

राष्ट्रसंघाच्या १९२० ते १९४० या वीस वर्षांच्या निष्फळ आयुष्याची स्मृति सर्वांच्याच मनांत जागृत होती. त्यामुळें नव्या संयुक्त राष्ट्रसंघटननेचें स्वागत अनेकांनीं भीतभीतच केलें. संयुक्त राष्ट्रसंघटना म्हणजे जुन्या राष्ट्रसंघाचाच थोडासा पोशाख बदललेला नवा अवतार असेंच समजण्यांत येतें. राष्ट्रसंघाप्रमाणें या नव्या संघटनेची निर्मिति एखाद्या विल्सनसारख्या ध्येयवादी माणसानें केली नव्हती; तर वर म्हटल्याप्रमाणें ५० राष्ट्रांच्या प्रतिनिधींनीं परस्परविचार आणि सहकार्यानें ती निर्माण केली होती. कोठल्याहि तहाशीं तिच्या जन्माची सांगड घालण्याची चूक या वेळीं करण्यांत आलेली नाहीं. पण हें सर्व असलें तरी मुख्य बाबतींत राष्ट्रसंघापेक्षां फारसें निराळें स्वरूप संयुक्त राष्ट्र संघटनेला आहे, असें म्हणतां येत नाहीं. राष्ट्रांचें सार्वभौमत्व आणि त्यांचा समान दर्जा या दोन तत्त्वांवर उभारणी केलेल्या कोणत्याहि आंतरराष्ट्रीय संघटनेचें जें भवितव्य असावयाचें तेंच या संघटनेच्या नशिबीं आहे.

संयुक्त राष्ट्रसंघटनेची सुरक्षासमिति, राष्ट्रपरिषद (General Assembly), विश्वस्त मंडळ (Trusteeship Council), आर्थिक व सामाजिक समिति, आंतरराष्ट्रीय न्यायालय व सचिवालय अशीं सहा प्रमुख घटक-उपांगें आहेत. यांशिवाय पहिल्या चारांच्या सोयीसाठीं व कार्यसुलभतेसाठीं आवश्यकतेनुसार अनेक मंडळें व समित्या यांची वेळोवेळीं निर्मिति करण्यांत आली आहे. या सर्व अवाढव्य व नवख्या माणसाचें मन गुंग करणाऱ्या पसाऱ्यांतून कांहीं महत्त्वाच्या गोष्टींकडे लक्ष वेधणें आवश्यक आहे.

'सुरक्षासमिति' ही साऱ्या संघटनेचा प्राण आहे. कारण संघटने-मार्फत केल्या जाणाऱ्या कोणत्याहि कार्यवाहीबद्दल निर्णय घेणें हें या समितीच्या हातीं असतें. सुरक्षासमितीची घडण करतांना आंतरराष्ट्रीय राजकारणांतील कांहीं कटु सत्यांचा संस्थापकांना विसर पडूं शकला नाहीं.

राष्ट्राच्या समान दर्जाचें तत्त्व बाजूला सारून 'महान्' राष्ट्रांच्या विशेष अधिकारांची दखल ह्या समितींत त्यांना पांच कायमच्या जागा देऊन घेण्यांत आली आहे. एवढ्यावरच मोठ्या राष्ट्रांचें केलेलें कोडकौतुक संपलेलें नाहीं. कारण मतदानाची जी पद्धति स्वीकारण्यांत आली आहे ती सॅनफ्रॅन्सिस्कोच्या प्रकट परिषदेंत मान्य करण्यांत आलेली नव्हती. तर 'याल्टाच्या' तीन बड्यांच्या ('Big Three') 'गुतगू' मध्यें निश्चित झाली होती. या मतदान पद्धतीनें सुरक्षासमितीवर जणुं बड्यांच्या मेहेरबानीनें आलेल्या सहा तात्पुरत्या सभासदांना कसलीच किंमत राहत नाहीं. कारण सर्व महत्त्वाच्या बाबतींत बड्या पांचांचें एकमत न झाल्यास एका विरोधी मतामुळें बाकीच्या दहा मतांना हरताळ फांसला जातो. लोकशाहीच्या तत्त्वाचें अधिक चांगलें विडंबन दुसरें कोणतें असणार? बड्या पांचांना दिलेला नकाराधिकार म्हणजे आंतरराष्ट्रीय राजकारणांतील सत्ताराजकारणाचें तत्त्व दुसऱ्या मिषानें मान्य करण्यासारखें आहे. अमेरिका, इंग्लंड अगर रशिया यांच्या प्रश्नावर पेरू, बोलिव्हिया वा सिलोन सारख्या चिमुकल्या राष्ट्रांनीं दिलेला निर्णय, लोकशाही तत्त्वानुसार असले तरी वस्तुस्थितीकडे डोळेझांक करणारे आहेत, असे अनेकदां बड्या राष्ट्रांकडून त्यांच्या या विशेषाधिकाराचें केलेलें समर्थन लंगडें पडतें. पण आजच्या घटकेला मोठीं राष्ट्रें व छोटीं राष्ट्रें यांच्यांतील तात्त्विक संघर्षापेक्षां बड्या तिघांतील आपमतलबी संघर्ष अधिक घातक ठरला आहे. यामुळें सुरक्षासमितींत जगांतील दोन राष्ट्रगटाचें सतत वाग्युद्ध चालू असतें. सुरक्षासमिति म्हणजे रशियाविरोधी कारवाई करण्याची सोईस्कर जागा असें अमेरिकेला वाटतें तर अमेरिकेविरुद्ध विषारी प्रचार करण्यास चांगलें साधन असें रशियास वाटतें. जन्मापासून आजवरच्या सात वर्षांच्या कारकीर्दींत दोन्ही पक्षांनीं वापरलेल्या नकाराधिकाराची संख्या दिवसेंदिवस बरीच फुगत चालली आहे.

राष्ट्रपरिषदेमध्यें संघटनेच्या प्रत्येक सभासद राष्ट्राला समान स्थान असतें. या परिषदेचें वर्णन 'जगाची-ग्रामपंचायत' या शब्दांनीं केलें जातें. या परिषदेला सुरक्षासमितीच्या मानानें फारच थोडें कार्य असतें. इतकेंच नव्हे तर घटनेनुसार ही परिषद म्हणजे एक चर्चामंडळ बनलें आहे. कारण या परिषदेनें बहुमतानें घेतलेले निर्णयदेखील कोणत्याहि सार्वभौम राष्ट्रांवर बंधनकारक ठरत नाहींत. जागतिक प्रश्नाविषयीं मतप्रदर्शन करण्याच्या दृष्टीनें मात्र या परिषदेचा उपयोग फार आहे. आर्थिक आणि सामाजिक समितीनें मात्र गेल्या पांच वर्षांत अनेक मंडळें व समित्या स्थापन करून विशिष्ट जागतिक प्रश्नांचा अभ्यासपूर्ण विचार करून निरनिराळ्या राष्ट्रांना त्याबाबत योग्य सल्ला दिला आहे. राष्ट्रसंघाप्रमाणेंच राजकीय क्षेत्र वगळल्यास इतर देशांत सं. रा. संघटनेला जें यश मिळालें आहे त्याचें बरेचसें श्रेय या समितीकडे जातें. जगाचें सांस्कृतिक, शैक्षणिक, अन्नविषयक, व्यापारविषयक, अर्थविषयक आदि अनेक क्षेत्रांत समितीनें केलेलें कार्य प्रशंसनीय तर आहेच पण भावी विकासास मार्गदर्शकहि आहे.

राष्ट्रवादाच्या १८ व्या शतकांतील उदयानंतर आंतरराष्ट्रीय संघर्षाला एक निराळीच कलाटणी मिळाली. पूर्वीच्या काळीं स्थापन झालेल्या साम्राज्यांत राष्ट्रवादाचा भाग नव्हता. वैयक्तिक महत्त्वाकांक्षांची पूर्ति करण्यासाठीं एखाद्या अलेक्झांडरनें जग जिंकण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या प्राचीन साम्राज्यांना मागें टाकणारी साम्राज्यें निर्माण करण्याचा हव्यास आधुनिक राष्ट्रवादानें निर्माण केला. राष्ट्रवाद व सार्वभौमत्व या दोन शक्तींचा विकास म्हणजे गेल्या शतकांतील जगांतील साऱ्या उलथापालथींचा इतिहास आहे. सार्वभौम राष्ट्रवादी राज्यांच्या कल्पनेमुळें इतर कोणत्याहि राष्ट्रांतर्गत अगर आंतरराष्ट्रीय सहकार्याचें गेल्या शतकांतील प्रयत्न असफल ठरले. पहिल्या महायुद्धानंतर ध्येयवादी विल्सननें आंतरराष्ट्रीय शांतता व सहकार्य यांसाठीं निर्माण केलेल्या राष्ट्रसंघाची अवघ्या २० वर्षांत काय दुर्दशा झाली

हें विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. राष्ट्रसंघाच्या अपयशाची कारणें इतर कांहींहि असलीं तरी मुख्यत: सार्वभौम राष्ट्रराज्यांच्या खडकावरच आंतरराष्ट्रीय सहकार्याचें गलबत फुटलें, ही गोष्ट निर्विवाद आहे. आंतरराष्ट्रीय सहकार्याच्या पहिल्या प्रयत्नाचा हा दुर्दैवी इतिहास सर्वश्रुत असतांना दुसऱ्या महायुद्धानंतर निर्माण झालेल्या संयुक्त राष्ट्रसंघटनेंत पुन: एकदां राष्ट्रराज्यांच्या सार्वभौमत्वाला मान्यता देण्याची चूक करण्यांत आली आहे.

सारें जग आर्थिक, वैज्ञानिक व सांस्कृतिक क्षेत्रांत पूर्वीपेक्षां फार लहान झालें आहे. परस्परावलंबित्व अधिकाधिक प्रमाणांत वाढत आहे. साऱ्या शक्तींचा ओघ एक जग निर्माण करण्याकडे आहे. पण राजकीय क्षेत्रांत मात्र या सर्व प्रवृत्तींना बाजूस सारून साऱ्या जगाची अत्यंत लहान लहान तुकड्यांचीं स्वतंत्र 'जगें' निर्माण करण्याचा राष्ट्रवादाचा हव्यास सफळ झाला आहे. १९ व्या शतकांतील राष्ट्रवादाला एकप्रकारें मर्यादित करणारी मानवतावादाची भूमिका विसाव्या शतकांतील राष्ट्रवाद्यांनीं झुगारून दिली आहे. पहिल्या महायुद्धानंतर राजकीय राष्ट्रवादाला आर्थिक, वांशिक व वैचारिक राष्ट्रवादांची जोड मिळून त्यानें जनमनावरील आपल्या वर्चस्वाची कमाल मर्यादा गांठली आहे. युद्धोत्तर काळांतील फॅसिझम व नाझीवाद हीं या प्रखर व आत्यंतिक राष्ट्रवादाचीं चांगलीं उदाहरणें आहेत.

या शिगेला पोहोंचलेल्या राष्ट्रवादाला वेसण घालण्याचें कार्य लोकशाही व साम्यवादी राष्ट्रनेत्यांच्या शिरावर होतें. पण गेल्या सात वर्षांच्या कटु अनुभवानंतर या महान् कार्याला यशस्वी करण्याचा कसलाहि प्रयत्न दोन्ही पक्षांच्या पुढाऱ्यांनीं केला नाहीं, असेंच म्हणावें लागतें. राष्ट्रवादाला प्रतिस्पर्धी व विरोधी असलेल्या साम्यवादानें परकीय आक्रमण होतांच रशियांतील सुप्त राष्ट्रवादाला जागृत करण्याचेंच कार्य केलें.

राष्ट्रवादानें आपल्या प्रतिस्पर्ध्यांवर मिळविलेल्या विजयाचें दुसरें चांगलें उदाहरण म्हणजे साम्यवादी युगोस्लाव्हियाचा प्रखर राष्ट्रवादी टिटोवाद आहे.

वरील विवेचनावरून आंतरराष्ट्रीय शांतता आणि सहकार्य यांची राष्ट्रांना खरोखरीच आवश्यकता असेल, तर सर्व प्रथम राष्ट्रीय सार्वभौमत्वाला भरपूर मुरड घालणें आवश्यक आहे, हें स्पष्ट होतें. आंतरराष्ट्रीय सहकार्यासाठीं प्रसंग पडल्यास राष्ट्रीय सार्वभौमत्वाला बळी देण्यासहि मागें पुढें पाहणार नाहीं, अशा जागतिक भावनेची सर्व राष्ट्रांत जोपासना झाली पाहिजे. पण दुर्दैवानें याउलट स्थिति असल्यामुळें संयुक्त राष्ट्र-संघटनेचें भवितव्य फारसें उज्वल दिसत नाहीं. संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या प्राणभूत असलेल्या सुरक्षासमितीचींच आज शकलें उडालीं आहेत. १९४५ ते १९५२ या सात वर्षांत आंतरराष्ट्रीय परिस्थिति पार पालटली आहे. चीनमध्यें घडून आलेली समाजक्रांति, आशियांतील राष्ट्रवादाचा विजय, ब्रिटन, फ्रान्स या राष्ट्रांची घसरगुंडी या निरनिराळ्या कारणांनीं सत्ताराजकारणांत बदल घडवून आणले आहेत. त्यांमुळें १९४५ सालीं स्थापन झालेली संयुक्त राष्ट्रसंघटना या गतिमानतेमुळें अवघ्या सातच वर्षांत वस्तुनिष्ठ राहिलेली नाहीं.

१९४५ च्या जूनमध्यें संयुक्त राष्ट्रसंघटना निर्माण करण्यांत आली. दीड महिन्याच्या अवधींत अमेरिकेनें हिरोशिमावर पहिला अणुबाँब टाकला. त्या बाँबनें केवळ हिरोशिमाच उध्वस्त केलें असें नाहीं. तर युद्धकालीन दोस्तांची मैत्री, सहकार्य व त्यांवर अवलंबून असलेली भावी शांतता या सार्‍यांना सुरुंग लावला. अणु राजकारणामुळें आंतरराष्ट्रीय शांततेला कायमचा तडा गेला. रशियाला अणु रहस्य कळूं न देण्याचा अमेरिकेनें वाढता खटाटोप सुरू केला आणि याच रशियाविरोधी राजकारणामुळें सुरक्षासमिति व संयुक्त राष्ट्रसंघटना यशस्वी होऊं शकत नाहीं. साम्यवादविरोधासाठीं अमेरिकेनें मार्शल मदत योजना व अटलांटिक करार

या पश्चिम युरोपांतील हालचाली संयुक्त राष्ट्रसंघटनेला धाब्यावर बसवून केल्या. याचा अर्थ संयुक्त राष्ट्रसंघटना म्हणजे अमेरिकेच्या परराष्ट्रीय खात्याची एक दुय्यम दर्जाची उपशाखा असेंच जणूं अमेरिकन नेत्यांना वाटतें.

संयुक्त राष्ट्रसंघटनेची उभारणी तात्त्विक दृष्ट्या समानतेच्या भूमिकेवर केलेली आहे. पण वास्तविक पाहतां सदस्यराष्ट्रांत लोकसंख्या, भूविस्तार, साधनसामुग्री, शास्त्रीय व औद्योगिक प्रगति, सांस्कृतिक विकास यांपैकीं कोणत्याच बाबतींत समानता नसते. वरील बाबतींत जीं राष्ट्रें इतरांपेक्षां अधिक प्रगत व संपन्न आहेत त्या राष्ट्रांच्या हातीं संघटनेचीं सूत्रें केंद्रित झालीं आहेत. अप्रगत व दुर्बल राष्ट्रांना अमेरिका व सोव्हिएट रशिया या सूत्रधारांपैकीं कोणातरी एकाचें वर्चस्व मान्य करावें लागतें. याशिवाय अन्य मार्ग उरत नाहीं. परिणामतः संघटनेंत विषमता निर्माण होऊन तिचें सामर्थ्य या सूत्रधार राष्ट्रांच्या राजकीय डावपेंचासाठीं व सत्ताराजकारणासाठीं उपयोगांत येतें. अर्थात्‌च संघटनेची सहकार्याची व्यापक भूमिका नष्ट होऊन ती या राष्ट्रांच्या राजकीय गटबाजीचें एक साधन बनतें.

संयुक्त राष्ट्रसंघटना अयशस्वी होण्याचें एक कारण अमेरिका व तिचीं अनुयायी राष्ट्रें व सोव्हिएट राष्ट्रगट यांच्यांतील वैचारिक संघर्ष होय. जीवनाच्या बाहेरच्या सर्व क्षेत्रांत लोकशाही व साम्यवाद या दोन जीवनविषयक प्रणालींचा सर्वंकष-संघर्ष चालू असतांना संयुक्त रा संघटनेंत मात्र हीं राष्ट्रें गुण्यागोविंदानें नांदतील अशी अपेक्षा करणें चूक नाहीं कां ! पण संयुक्त राष्ट्रसंघटना अयशस्वी झाल्यास सर्वविनाशी तिसऱ्या महायुद्धाशिवाय जगाला दुसरा मार्ग नाहीं.

---

## चालू घटना

आधुनिक जगाची गतिमानता ही इतकी सर्वव्यापी आहे कीं, गेल्या ७ वर्षांत जागतिक राजकारणाचें स्वरूप नित्य इतकें बदलत आहे, व दररोज नव्या घटनांची त्यांत भर पडत आहे कीं, त्या सर्वांचें अल्प दिग्दर्शनदेखील करणें शक्य नाहीं. त्यांतील कांहीं प्रमुख घटनांचा उल्लेख विवेचनाच्या ओघांत भिन्न प्रकरणांत केलेला आहेच. कांहीं घटनांचा परामर्श विस्तारानें घेणें आवश्यक असूनदेखील स्थलाभावीं तो घेतलेला नाहीं. उरलेल्या घटनांचा निर्देश व कांहींचें विवेचन या प्रकरणांत केलें आहे. या सर्व प्रकरणांचा साकल्यानें विचार केला म्हणजे जागतिक राजकारणाचा परिचय होऊं शकेल.

आंतरराष्ट्रीय संबंधांत कांहीं सिद्धान्त शाश्वत स्वरूपाचे मानावे लागतात. उदाहरणार्थ, कोणतेंहि राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचें चिरंतन शत्रु अथवा चिरंतन मित्र असत नाहीं. राष्ट्रहिताशिवाय दुसरें कोणतेंहि नीतितत्त्व या व्यवहारांना लावणें म्हणजे त्यांचें स्वरूप स्वतःला कळलें नाहीं अशी कबुली देणें होय. राष्ट्रहिताच्या दृष्टीनें आजचा मित्र उद्यांचा शत्रु ठरण्याचा संभव असतो, व कालचा शत्रु आज मित्र बनतो. नीतितत्त्वें व उदात्त ध्येयें कांहीं असलीं तरी सत्तास्पर्धेत बळी तो कान पिळी हेंच मात्स्यन्यायाचें आदितत्त्व पाळलें जातें. सत्तेची अभिलाषा ही मानवी स्वाभाविक प्रवृत्ति आहे. विसाव्या शतकांतील मानव हा आदिमानवाइतकाच सत्तापिपासू आहे. सत्ता हस्तगत करण्याचे मार्ग व साधनें वैज्ञानिक प्रगतीमुळें अधिकाधिक संहारक झालीं आहेत. पण मूळ प्रवृत्ति सर्व काळीं एकच दिसून येतें. निरनिराळ्या राष्ट्रांच्या सत्ताराजकारणाकडे पाहिलें म्हणजे वरील सिद्धान्तांची सत्यता पटूं लागते. गोंडस शब्दांच्या आवरणाखालीं

सत्ता-संघर्ष चालू आहेत. इतकेंच नव्हे तर पूर्वीपेक्षां या संघर्षांना अधिक तीव्रता आली आहे.

१५ ऑगस्ट, १९४५ रोजीं जपाननें संपूर्ण शरणागति पत्करली. ६ वर्षें चाललेलें दुसरें महायुद्ध संपून शांतिपर्वाला सुरुवात झाली. १९४५ सालीं जगाची स्थिति काय होती याचा विचार केला तर कांहीं ठळक गोष्टी नजरेंत भरतात. युद्धकाळांत गरजेपायीं निर्माण झालेली चार बड्यांची मैत्री युद्धसमाप्तीनंतरदेखील टिकून होती. त्यांच्याच नेतृत्वाखालीं संयुक्त राष्ट्रसंघटनेची स्थापना मोठ्या उत्साहांत झाली होती. या संघटनेचीं सारीं सूत्रें सुरक्षासमितीच्या द्वारें बड्या पांच राष्ट्रांच्या हातांत सोपविण्यांत आलीं होतीं. शत्रुराष्ट्रांपैकीं जर्मनीमध्यें नाझीपक्ष समूळ नष्ट करण्याची कसोशीनें मोहीम चालली होती. जर्मन राष्ट्राच्या युयुत्सु प्रवृत्तींना कायमचें दडपून टाकण्यासाठीं औद्योगिक खच्चीकरणाचे प्रयत्न जारी होते. जर्मनीचे चार तुकडे जेत्या राष्ट्रांच्या हवालीं करण्यांत आले होते. तथाकथित युद्धगुन्हेगारांचे खटले आंतरराष्ट्रीय न्यायालयासमोर गाजावाजांत चालू होते. जपानमध्यें मात्र चार राष्ट्रांऐवजीं एकट्या अमेरिकेचेंच वर्चस्व होतें. इतर राष्ट्रांना सल्लागारांची भूमिका मिळाली होती. मॅकॉर्थरच्या एकतंत्री अंमलाखालीं जपान वावरत होता. जपानी युद्धगुन्हेगारांत हिरोहिटोचा समावेश करण्याचें अमेरिकेनें कटाक्षानें टाळलें होतें. जर्मनी, जपान व कांहीं अंशीं इटली या शत्रु-राष्ट्रांची युद्धोत्तर अवस्था अत्यंत हालाखीची झाली होती. युद्धजन्य नुकसान, जेत्यांनीं चालविलेलें आर्थिक शोषणाचें धोरण, युद्धोपयोगी कारखान्यांची जेत्यांकडून मोडतोड व कोलमडून पडलेली शासनव्यवस्था यांमुळें सर्वसामान्य जनता टेकीस आली होती.

युद्धकाळांत जर्मनीच्या कब्जांत गेलेलीं पूर्व युरोपांतील पोलंड, रुमानिया, झेकोस्लोव्हाकिया, हंगेरी व बल्गेरिया हीं राष्ट्रें लाल सेनेच्या मदतीनें स्वतंत्र झालीं होतीं. सतत ४ वर्षेंपर्यंत रणभूमि बनलेल्या

या राष्ट्रांत युद्धपूर्व समाजव्यवस्था कायम टिकणें अशक्य होतें. सोव्हिएट रशियाचें वाढतें सामर्थ्य, युद्धकाळांत जर्मन फौजांना गनिमी विरोध करणाऱ्या भूमिगतांची साम्यवादी भूमिका व त्यांना असलेली जनतेची सहानुभूति यांमुळें युद्धसमाप्तीनंतर या सर्व राष्ट्रांत साम्यवादी स्वरूपाची क्रांति झाली. सोव्हिएट रशियाकडे अर्थात्‌च या नव्या साम्यवादी राष्ट्रांचें पुढारीपण आलें. या सर्व देशांतून संमिश्र मंत्रिमंडळें अस्तित्वांत आलीं, व सोव्हिएट पद्धतीवर राष्ट्राचें पुनरुज्जीवन करण्याचे प्रयत्न सुरू झाले.

मध्यपूर्वेतील लहान लहान मुस्लीम राष्ट्रांवर असलेलें अँग्लोफ्रेंचांचें वर्चस्व कमी होऊं लागलें होतें. सोव्हिएट रशियाच्या नव्या प्रभावामुळें मध्यपूर्वेतील या राष्ट्रांना स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व निर्माण करण्याची संधि प्राप्त झाली होती. या प्रदेशांतील समृद्ध तेलखाणीमुळें अमेरिकेनेंहि सौदी अरेबियांत चंचुप्रवेश केला होता. पॅलेस्टाईनमध्यें ज्यूंचें स्वतंत्र राष्ट्र निर्माण करण्यासाठीं ब्रिटिश सरकार वचनबद्ध होतें. अनेक निर्वासित ज्यू कुटुंबांची रीघ पॅलेस्टाईनकडे लागली होती. ज्यू आणि अरब यांच्यांतील संघर्ष वाढीस लागला होता. सर्वच मुस्लीम राष्ट्रांत राष्ट्रवादी चळवळी फोफावत होत्या.

जपाननें शरणागति पत्करल्यानंतर चँग-कै-शेक व कॉमिन्टॉंग यांची सत्ता चीनवर प्रस्थापित झाली. लक्षावधि अमेरिकनशिक्षित सैन्य, जपानी युद्धसाहित्याचे सांठे, प्रमुख राष्ट्रांकडून चँगच्या राजवटीला मिळालेली राजनैतिक मान्यता, अमेरिकन मदतीचा चालू असलेला ओघ यांमुळें कम्युनिस्टांना चीनमध्यें फारसा वाव राहील असें कोणास वाटत नव्हतें. आशियांतील दुसऱ्या महत्त्वाच्या देशांत ब्रिटिश राजवटीविरुद्ध जनतेचा प्रक्षोभ वाढत होता. हिंदी नेत्यांची सुटका झाली होती. पण राजकीय पेंचप्रसंग सुटलेला नव्हता. मुस्लीम लीगच्या द्विराष्ट्रवादी प्रचाराला जोर येत होता. आशियांतील इतर राष्ट्रांतहि– इंडोनेशिया, इंडोचायना, ब्रह्मदेश– राष्ट्रवादी चळवळी फोफावत होत्या.

युद्धकाळांत सोव्हिएट रशिया, अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स व चीन यांची मैत्री ही समान संकटामुळें झालेली होती. पण तें समान संकट नष्ट झाल्यावर या निरनिराळ्या राष्ट्रांतील मतभेद, परस्पर अविश्वास, हेवेदावे व हितविरोध वाढीस लागले. विशेषतः सोव्हिएट रशिया व लोकशाही राष्ट्र यांच्यांतील बेबनावाला खरी सुरुवात, दुसरी आघाडी उघडण्यांत दोस्त राष्ट्रांनीं लावलेल्या विलंबापासूनच झाली होती. पण हिरोशिमावर टाकलेल्या अणुबाँबनंतर हा बेबनाव विकोपास जाऊं लागला. अणुशक्तीचें रहस्य केवळ अमेरिकेलाच माहीत असल्यामुळें सत्ता-राजकारणाच्या दृष्टीनें अमेरिका इतर सर्व राष्ट्रांपेक्षां वरचढ ठरली. पर्यायानें सोव्हिएट रशियाला दुसऱ्या क्रमांकाचें स्थान घ्यावें लागलें. संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या मार्फत अणुशक्तीचें नियंत्रण करावें या तत्त्वाविषयीं सर्वांचें एकमत होतें. पण तें कसें करावें या तपशिलाविषयीं मात्र पूर्ण मतभेद निर्माण झाले. अनेकदां तत्त्वापेक्षां तपशील महत्त्वाचा ठरतो. याहि बाबतींत तेंच झालें. १९४५ सालीं रशियाला अणुरहस्य अवगत नव्हतें. त्यामुळें त्या राष्ट्रानें अस्तित्वांत असलेली अमेरिकेच्या सांठ्यांतील सर्व अणुशस्त्रें प्रथम नष्ट करावींत असा आग्रह धरला. उलट, आंतरराष्ट्रीय समिति निर्माण करून तिचें अणुशक्तीच्या कच्च्या मालावर व उत्पादन प्रक्रियेवर नियंत्रण असावें असा अमेरिकेनें आग्रह धरला. अर्थातच परस्परांच्या मागण्या मान्य होणें अशक्य असल्यानें या दोन प्रमुख राष्ट्रांत संघर्ष निर्माण झाला. त्या संघर्षाचे पडसाद संयुक्त राष्ट्रसंघटनेंत व विशेषेंकरून सुरक्षासमितींत उमटूं लागले.

५ जून, १९४७ रोजीं अमेरिकेच्या परराष्ट्रीय मंत्र्यानें 'मार्शल' मदत योजनेची पहिली घोषणा केली. ही घोषणा वरील संघर्षाचीच एक प्रतिक्रिया होती. मार्शल मदत योजनेनुसार अमेरिकेच्या आर्थिक मदतीचा ओघ, पश्चिम युरोपांतील राष्ट्रांना रशियाच्या वर्चस्वापासून बांचविण्यासाठीं सुरू झाला. या मदतयोजनेचा मुख्य हेतु वरकरणी तरी

युद्धामुळें उध्वस्त झालेल्या राष्ट्रांचें पुनरुज्जीवन करणें हा होता. पण या योजनेचा खरा अर्थ काय आहे हें न कळण्याइतका सोव्हिएट रशिया अजाण नव्हता. त्यामुळें रशियांकित राष्ट्रांनीं या मदत-योजनेला प्रथमपासूनच विरोध केला. जगांतील प्रमुख राष्ट्रांची विभागणी, अमेरिका व तिचीं अनुयायी राष्ट्रें व साम्यवादी राष्ट्रें अशा दोन गटांत होण्यास सुरुवात झाली. ह्या दोन्ही राष्ट्रगटांत परस्परांविषयीं साशंकतेचें व अविश्वासाचें वातावरण वाढूं लागलें. यांतूनच एका अभिनव युद्धाचा जन्म झाला. परस्परांच्या शीतयुद्धांतील डावपेंचामुळें युरोपीय जनतेचे हाल होऊं लागले.

१५ ऑगस्ट, १९४७ रोजीं ब्रिटिशांनीं हिंदुस्थान व पाकिस्तान या नव्या राष्ट्रांच्या हातांवर सत्तेचें उदक सोडलें, व जणूं आशियांतील युरोपीय सत्तेच्या अंतिम पर्वाला सुरुवात केली. यानंतरच्या काळांतच ब्रह्मदेश, सिलोन, इंडोनेशिया इत्यादि आग्नेय आशियांतील राष्ट्रें स्वतंत्र झालीं. शिवाय मलाया, इंडोचायना इत्यादि राष्ट्रांतून युरोपीय सत्तेविरुद्ध प्रक्षोभ वाढीस लागला. पण आग्नेय आशियाच्या या स्वातंत्र्याला मागें सारणारी घटना चीनमध्यें कम्युनिस्ट क्रांतीच्या रूपानें घडून आली. १९४८ मध्यें घडून आलेल्या या साम्यवादी क्रांतीमुळें युरोपीय राष्ट्रांचें आशियांतील उच्चाटन निश्चित झालेंच. पण अमेरिकेच्या प्रशान्त महासागरांतील राजकीय हालचालींना पायबंद बसला. जागतिक राजकारणांत सोव्हिएट रशियाचें पारडें जड झालें. आशियांतील नवोदित राष्ट्रांना महत्त्व येऊं लागलें. युरोपीय साम्राज्यवाद हा मृत्युपंथाला लागला. आंतरराष्ट्रीय राजकारणाचा सारा रागरंगच या घटनेमुळें पालटला.

जपानच्या शरणागतीनंतर त्याच्या वर्चस्वाखालीं असलेला कोरिया, सोव्हिएट रशिया व अमेरिका यांच्या सैन्यांनीं व्यापला होता. कोरियाची विभागणी ३८ अक्षांश रेषेनुसार दोन भागांत करण्यांत आली होती.

या दोन्ही राष्ट्रांनीं आपापलीं सैन्यें काढून घेतल्यानंतर कोरियांत एक प्रकारें यादवीयुद्ध सुरू झालें. चीनमधील कम्युनिस्टांच्या यशामुळें उत्तर कोरियांतील साम्यवादी चळवळीला जोर येणें स्वाभाविकच होतें. कदाचित् कोरियांतील हें यादवी युद्ध अगदीं थोड्या अवधींत संपून सबंध कोरिया साम्यवादी अंमलाखालीं गेला असता. पण अमेरिकेच्या दृष्टीनें दक्षिण कोरियाचे लष्करी (Strategic) महत्त्व फार असल्यानें अमेरिकेनें सुरक्षासमितींत या प्रश्नाला चालना दिली. सोव्हिएट रशियानें त्यावेळीं सुरक्षासमितीवर बहिष्कार घातला होता. परिणामत: संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या आदेशानुसार पण मुख्यत: अमेरिकेच्या हितरक्षणासाठीं अमेरिकन सैन्य दक्षिण कोरियांत उतरविण्यांत आलें. मॅकॉर्थरच्या नेतृत्वाखालीं या सैन्यानें लवकरच ३८ अक्षांश रेषा गांठली. पण तेवढ्यावरच समाधान न मानतां मॅकॉर्थरनें यालू नदीपर्यंत मुसंडी मारली. त्यामुळें साम्यवादी चीन उत्तर कोरियाच्या मदतीस धांवला. अशा प्रकारें कोरियन यादवी त्या देशापुरती मर्यादित न राहतां एक जागतिक समस्या झाली.

२५ जून, १९५० रोजीं सुरू झालेलें कोरियायुद्ध २७ जुलै, १९५३ रोजीं थांबलें. मॅकॉर्थरच्या पदच्युतीनंतर कोरियांत वाटाघाटींनीं शांतता घडवून आणावी या विचारसरणीला अधिकाधिक प्राधान्य मिळालें. तटस्थ राष्ट्रांनीं—विशेषत: हिंदुस्थाननें—उभय पक्षांना स्वीकारार्ह वाटावी अशी तडजोड घडवून आणण्याची संयुक्त राष्ट्रसंघटनेमार्फत खटपट केली या खटपटीला कदाचित् इतक्या लवकर यश मिळालें नसतें. पण स्टॅलिनच्या मृत्यूनें जागतिक राजकारणांत अनेक बदल घडून आले. रशियाच्या नव्या सत्ताधाऱ्यांना कोरियांत शांतता प्रस्थापित होणें अवश्य वाटलें. अमेरिकेची या युद्धांत झालेली मनुष्यहानि ही इतकी मोठी होती कीं, तेथील सामान्य जनतेला कोरियायुद्धाचा वीट आला होता. निरनिराळ्या कारणांकरितां कां होईना पण दोन्ही पक्षांना शांतता हवी होती. दक्षिण कोरियाच्या डॉ. सिंगमन ऱ्हीनें शस्त्रसंधीविरुद्ध केलेला

अपप्रचार व कृत्यें हीं अत्यंत प्रक्षोभक असूनहि शस्त्रसंधि झाला. यावरून वरील विधानाची सत्यता पटेल. कोरियांत शांतता घडून यावी यासाठीं हिंदुस्थाननें केलेल्या प्रयत्नांमुळें तटस्थता कमिशनचें अध्यक्षपद जनरल थिमय्या यांना देण्यांत आलें आहे. अदलाबदलीस नाखूष असलेल्या दोन्ही पक्षाकडच्या युद्धकैद्यांचा ताबा हिंदी सैन्याच्या हातांत देण्यांत आला आहे.

कोरियांत शस्त्रसंधि झाल्यानंतर कांहीं काळानें कोरियाच्या सर्व प्रश्नांचा विचार करण्यासाठीं भरणाऱ्या राजकीय परिषदेंत हिंदुस्थानला स्थान मिळूं नये असा आग्रह दक्षिण कोरियानें व म्हणून अमेरिकेनें धरला. त्यामुळें हिंदुस्थानला त्या परिषदेंत स्थान मिळालें नाहीं. शस्त्रसंधीमुळें जगांतील तिसऱ्या महायुद्धाचें भीतिदायक वातावरण बऱ्याच प्रमाणांत कमी झालेलें आहे. वातावरणांत घडून आलेला हा बदल अधिक प्रभावी झाल्यास शस्त्रास्त्रस्पर्धा कमी होऊन राष्ट्रांचें लक्ष युद्धाऐवजीं विधायक कार्यांकडे वाढत्या प्रमाणावर लागूं शकेल. कोरिया राजकीय परिषदेच्या यशस्वितेबर जागतिक शांततेचा प्रश्न पुष्कळांशीं अवलंबून आहे.

कोरियांतील युद्ध संपलेलें असलें तरी इंडोचायनामधील फ्रेंच व बाओदाय यांचा पक्ष आणि डॉ. हो-चि-मिन्ह यांचा साम्यवादी पक्ष यांतील संघर्ष अधिकाधिक तीव्र होत आहे. अमेरिकेच्या प्रचण्ड आर्थिक व लष्करी साहाय्यानें फ्रेंच साम्राज्यशाही आपलें डळमळित स्थान टिकविण्याचा प्रयत्न करीत आहे. ब्रिटिशाप्रमाणें काळाचीं पावलें न ओळखल्यामुळें फ्रेंचांनीं आपल्या वसाहतींना स्वायत्तता दिली नाहीं. आशियांतील जनतेला गोऱ्या साम्राज्यशाहीचा इतका वीट आलेला आहे कीं, त्यामुळें एकवेळ साम्यवादी हुकूमशाही चालेल, पण साम्राज्यसत्ता नको असें तिला वाटतें. हिंदुस्थान, पाकिस्तान व सिलोन हीं राष्ट्रें

बगळल्यास अमेरिकेच्या मदतीचा उपयोग आशियांतील राष्ट्रांत साम्यवाद विरोधाकरितां प्रतिगामी शक्तींना बळकट करण्यासाठीं झाला आहे. इन्डोचायनामध्यें देखील हेंच घडत आहे. तेथील जनतेला अमेरिका ही जुलुमी, फ्रेंच साम्राज्यशाहीची पाठीराखी वाटते यांत आश्चर्य तें काय? कोरियांतील शस्त्रसंधीनंतर कम्युनिस्ट राष्ट्रगट आपल्या सामर्थ्याचा उपयोग इंडोचायनामध्यें करील अशी अमेरिकेला साधार भीति वाटते. या भीतीमुळेंच आग्नेय आशियांत कम्युनिस्टविरोधी राष्ट्रें टिकून राहावींत यासाठीं अमेरिका धडपडत आहे.

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय राजकीय जीवनाच्या दोन क्षेत्रांतील मर्यादा इतकी पुसट झाली आहे कीं, कोणती समस्या अंतर्गत राष्ट्रीय स्वरूपाची समजावयाची आणि कोणती आंतरराष्ट्रीय समजावयाची हें कळेनासें होतें. उदाहरणार्थ, दक्षिण आफ्रिकेंतील गौरेतरांचा प्रश्न किंवा काश्मीरमधील घडामोडी. शेख अब्दुल्लांच्या पदच्युतीमुळें काश्मीरमध्यें परकीय राष्ट्रांचे हितसंबंध किती गुंतलेले आहेत याची जाणीव सर्वसामान्य नागरिकाला झाली आहे. काश्मीरचा प्रश्न पाकिस्तान आणि हिंदुस्थान या दोन राष्ट्रांनीं आपसांत वाटाघाटी करून सोडवावा असें वाटणें स्वाभाविक असलें तरी आजच्या परिस्थितींत तें अशक्य आहे. पाकिस्तानच्या राजकीय जीवनाचें विश्लेषण करणें अत्यंत बिकट काम आहे. बहुसंख्य निरक्षर आणि धर्मवेडी जनता व सत्तेचीं सूत्रें हातीं असलेला लहानसा गट यांत कोणालाहि मनापासून लोकशाही नको आहे. याचें चांगलें प्रत्यंतर म्हणजे गेल्या ६ वर्षांत पाकिस्तान आपली घटना करूं शकलेलें नाहीं, यांत आहे. अशा परिस्थितींत पाकिस्तानचें काश्मीरविषयक धोरण हें वस्तुनिष्ठ नसून धर्मवेड्या पहाडी टोळया, मौलवी आणि हितसंबंधी गट यांच्या वारंवार बदलणाऱ्या दडपणानुसार बदलत असतें. काश्मीर प्रकरणांत तडजोडीनें मार्ग निघावा ही हिंदुस्थानची इच्छा असल्यामुळें पाकिस्तानचे

ह्य प्रधान महंमदअल्लींच्या विनंतीनुसार हिंदुस्थाननें सार्वमत ासकाची नेमणूक एप्रिल १९५४ अखेर झालीच पाहिजे या तत्त्वाला न्यता दिली आहे. काश्मीरचा प्रश्न इतका बिकट होण्याचें कारण या मांत केवळ पाकिस्तान आणि हिंदुस्थान या शेजाऱ्यांचे हितसंबंध गडित झालेले नसून ब्रिटन व अमेरिका या राष्ट्रांचेहि हितसंबंध ालेले आहेत. सोव्हिएट रशियाच्या दक्षिणेकडील तेल खाणी व द्योगिक केंद्रें यांवर बॉम्बवर्षाव करण्यासाठीं गिलजितचा विमानतळ यंत सोयीस्कर आहे. भावी संघर्षाच्या दृष्टीनें तो विमानतळ प्रत्यक्षा-यक्षरीत्या स्वतःच्या नियंत्रणाखालीं राहावा असें अमेरिकेला वाटतें. दृष्टीनें काश्मीर प्रकरणीं अमेरिका व ब्रिटन यांनीं बुद्धिपुरःसर किस्तानचा पाठपुरावा केला आहे.

मध्यपूर्वेतील राष्ट्रें आज संक्रमणावस्थेंत आहेत. आधुनिक राष्ट्रवाद सरंजामशाही समाजव्यवस्था यांचा संघर्ष या सर्व राष्ट्रांत दिसून येतो. मुळें या राष्ट्रांतून राजकीय खून, रक्तपात व राज्यक्रांति याच गोष्टी चेवर दिसून येतात. स्थिर राज्यव्यवस्था निर्माण झालेली नाहीं. ाणसारख्या तेलखाणींनीं समृद्ध असलेल्या देशांत सामान्यतः परकीय विशेषतः ब्रिटनविरुद्ध प्रक्षोभ निर्माण होऊन त्यांत शेवटीं ग्लोइराणियन कंपनीची आहुति पडली. याच प्रश्नावर तडजोडीचा मार्ग सांपडल्यानें इराणनें ब्रिटनशीं असलेले राजनैतिक संबंध तोडून टाकले. ाणनें दाखविलेलें हें धाडस आंतरराष्ट्रीय परिस्थितींत घडून आलेल्या पत्यंतराचें निदर्शक आहे. युद्धपूर्व काळांत ज्या राष्ट्राला ब्रिटनविरुद्ध काढण्याची हिंमत नव्हती त्याच राष्ट्रानें तेलाच्या प्रश्नावर आपलेंच म्हणणें रें करून दाखवलें आहे. मध्यपूर्वेंतील राजकीय परिस्थिति किती अनिश्चित ाहे याचें चांगलें उदाहरण म्हणून इराणचा निर्देश करतां येईल. सर्व ताधीश बनलेल्या डॉ. मुसादीकची राजवट उलथून पाडून इराणच्या शहानें रल जहेदीच्या हातीं सत्ता दिली आहे. या सत्तांतराच्या मागें ब्रिटिश

अमेरिकन राष्ट्रं आहेत हें उघड गुपित आहे. मध्यपूर्वेशीं सांस्कृतिक व धार्मिक दृष्ट्या संलग्न असलेल्या ईजिप्तमध्यें राज्यक्रांति घडून येऊन लष्करी सेनानी–जनरल नगीब–च्या हातीं सर्व सत्ता एकवटली आहे. या क्रांतीचे परिणाम दूरगामी होण्याचा संभव आहे. जनरल नगीबनें स्वीकारलेलें समाजवादी भूवितरणाचें धोरण सरंजामशाही समाजव्यवस्थेला हादरा देणारें आहे. इतकेंच नव्हे तर या क्रांतीमुळें मध्यपूर्वेतील इतर मुस्लीम राष्ट्रांतहि समान स्वरूपाची क्रांति घडून येण्याची शक्यता आहे. अनेक शतकानंतर ज्यू लोकांचें राजकीय स्वप्न साकार झालें. पॅलेस्टाईनमध्यें स्वतंत्र, सार्वभौम ईझराईल राष्ट्र स्थापन झालें. एका दृष्टीनें वाढत्या अरब राष्ट्रवादाला ब्रिटिशानीं दिलेला हा काटशह होता. ईझराईलच्या स्थापनेमुळें अरब राष्ट्रांत एकतेची भावना व ब्रिटिशविरोध वाढीस लागला

आफ्रिकेच्या प्रचण्ड भूविभागावर १८ व्या व १९ व्या शतकांत युरोपीय राष्ट्रांनीं आपलें साम्राज्य स्थापन करून तेथील जनतेची निर्घृण पिळवणूक केली. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत आफ्रिकेंतील निरनिराळ्या भागांत प्रक्षोभ निर्माण झालेला दिसतो. दक्षिण आफ्रिकेंतील फॅसिस्ट मनोवृत्तीच्या डॉ. मालनच्या धोरणांमुळें श्वेत, नीग्रो आणि हिंदी नागरिकांची वर्णभेदावर विभागणी करण्यांत येत आहे. या तत्त्वानुसार आफ्रिकेंतील सर्व उत्कृष्ट वसाहतीच्या जागा या श्वेत रहिवाशांच्या ताब्यांत राहून श्वेतेतरांना कसलेहि अधिकार राहणार नाहींत. त्यांचें जीवन गुलामसदृश होईल. डॉ. मालनच्या मतें लक्षावधि हिंदी नागरिकांनीं हिंदुस्थानला परत जावें हें श्रेयस्कर. जणूं मालन आणि त्याचे जातभाई यांना आफ्रिका आंदण मिळाली आहे! या वर्णविद्वेषाचे परिणाम दक्षिण आफ्रिकेपुरतेच मर्यादित राहिलेले नाहींत. केनयांत देखील 'माव माव' चळवळीच्या रूपानें तेथील जनतेनें ब्रिटिश वर्चस्वाविरुद्ध लढा पुकारला आहे. आफ्रिकेंतील या प्रक्षोभाचें मूळ कारण तेथील जनतेला होऊं लागलेला राष्ट्रवादाचा साक्षात्कार होय. राष्ट्रवादी

चळवळी दडपशाहीनें नष्ट होत नाहींत. उलट त्या फोंफावतात, असा इतिहासाचा दाखला आहे. आशियांतून युरोपीय साम्राज्यशाहीला जसें आपलें पाऊल मागें घ्यावें लागलें, तसेंच येत्या पिढींतच आफ्रिकेंतूनहि घ्यावें लागेल.

जागतिक राजकारणांत अभावानें चमकणाऱ्या दक्षिण अमेरिकेंतील राष्ट्रांचा निर्देश विवेचनांत केलेला नाहीं. हीं सर्व राष्ट्रें नाममात्र गणराज्यें असून वस्तुतः त्या अनियंत्रित राजवटी आहेत. या राष्ट्रांचें आंतरराष्ट्रीय राजकारणांतील महत्त्व दोन कारणांसाठीं आहे. या राष्ट्रांची साधनसंपत्ति वरच्या दर्जाची आहे. उदा० एकट्या व्हेनेझुएलामध्यें जगाच्या पेट्रोल उत्पादनापैकीं १४% उत्पादन होतें. अर्जेंटिना हें राष्ट्र गव्हाच्या उत्पादनाकरितां जगप्रसिद्ध आहे. चिलीमध्यें तांब्याचें उत्पादन अमेरिकेच्या खालोखाल आहे. या साधनसामुग्रीचा उपयोग करण्यासाठीं लोकसंख्या मात्र अगदीं थोडी आहे. यामुळें हीं राष्ट्रें स्वसंरक्षण व परराष्ट्रीय धोरण या बाबतींत अमेरिकेच्या सल्ल्यानुसार वागत असतात. संयुक्त राष्ट्रसंघटनेंत हीं राष्ट्रें सभासद असल्यानें अमेरिकेच्या धोरणाला हुकुमी बहुमत केव्हांहि मिळूं शकतें. या बहुमताच्या जोरावर अमेरिका आपलें धोरण वरकरणी कां होईना बहुसंख्य राष्ट्रांना पसंत असल्याचा देखावा करूं शकते.

आतांपर्यंतच्या विवेचनावरून जागतिक राजकारणांतील निरनिराळ्या प्रवाहाचें व राष्ट्रांचें महत्त्व काय आहे याचें दिग्दर्शन झालें आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर निर्माण झालेल्या परिस्थितीचा एक विशेष असा सांगतां येईल कीं, जगांतील महान् राष्ट्रांची संख्या पूर्वीपेक्षां घटून केवळ दोनावरच आली आहे. अमेरिका आणि सोव्हिएट रशिया या दोन राष्ट्रांखेरीज इतरांना मोठीं राष्ट्रें म्हटलें गेल्यास तें केवळ राजकीय सौजन्याचें लक्षण होईल. सामर्थ्याचा विचार केल्यास जगाचें भवितव्य आतां मास्को

आणि वॉशिंग्टनमधील सत्ताधाऱ्यांच्या हातीं आहे, हें स्पष्ट होतें. अर्थात्च या विधानाचा अर्थ असा नव्हे कीं, ब्रिटन, फ्रान्स, नवचीन, हिंदुस्तान आदि राष्ट्रांच्या धोरणाचा कांहींच परिणाम होत नाहीं. परंतु परिस्थितीला बांध घालूं शकण्याची अथवा निराळें वळण देण्याची शक्ति जितकी अमेरिका व सोव्हिएट रशिया या दोन राष्ट्रांत आहे तितकी या राष्ट्रांत नाहीं. अमेरिका व सोव्हिएट रशिया या दोन राष्ट्रांतील वैमनस्याला जागतिक महत्त्व आहे. याची सुरुवात अणुगुपितापासून झाली असली तरी आज तें कारण महत्त्वाचें राहिलेलें नाहीं. रशियानें अणुरहस्य अवगत करून घेतलेलें आहे. पण नवचीनचा सुरक्षासमितींतील प्रवेश, जपानशीं केलेला तह, जर्मनीविषयींचें धोरण, मार्शल मदत योजना, युगोस्लाव्हिया इत्यादि अनेक प्रश्नांवर या दोन राष्ट्रांतील मतभेद विकोपास गेले आहेत. उदाहरणार्थ, ४५ कोटि जनतेचें प्रतिनिधित्व करणाऱ्या नवचीनला सुरक्षासमितींत स्थान नाहीं. कारण अमेरिका अजूनहि चँग-कै-शेक व राष्ट्रीय चीनला चिनी जनतेचे प्रतिनिधि समजते. नवचीन सुरक्षा-समितींत आल्यास साम्यवादी गटाचें पारडें एकदम जड होईल या दृष्टीनें अमेरिका हा विरोध करीत आहे.

सात वर्षांच्या अवधींतच गेल्या महायुद्धांत विजयी झालेल्या राष्ट्रांना पराजितांविषयींचें आपलें धोरण संपूर्ण बदलावें लागलें आहे. सत्ता-राजकारणांतील बदलत्या परिस्थितीचेंच हे निदर्शक आहे. साम्यवाद-विरोध हा स्थायीभाव झाल्यामुळें प्रशान्त महासागरांत रशिया व नवचीनविरुद्ध संरक्षक फळी उभारावयाची तर जपानची मैत्री अत्यावश्यकच ठरली. त्यामुळें अमेरिकेनें सोव्हिएटरशियाचा विरोध असतांनाहि जपानशीं स्वतंत्र तह करून त्या राष्ट्राला स्वातंत्र्य दिलें. अर्थात्च भावी संभाव्य संघर्षांत जपान अमेरिकेला अधिक अनुकूल राहील असेंच निदान करावें लागतें. जी स्थिति जपानची तीच कांहीं अंशीं जर्मनीचीहि आहे. सोव्हिएट

रशियाला थोपवून धरावयाचें तर जर्मनीच्या मनुष्यबळाचा उपयोग करणें दोस्त राष्ट्रांना भाग आहे. जर्मनीनें अटलांटिक करारांत सहभागी व्हावें म्हणून त्याचा अनुनय करण्याची पाळी जेत्या राष्ट्रांवर आली आहे. पश्चिम जर्मनींत नुकत्याच झालेल्या सार्वत्रिक निवडणुकींत अमेरिकानुकूल डॉ. ॲडेनॉरच्या पक्षाला निर्विवाद बहुमत मिळालेलें आहे. याचा अर्थ पश्चिम जर्मनींत पाश्चात्य राष्ट्रांना अनुकूल अशीच राजवट चालूं राहील. युरोपांतील सोव्हिएटविरोधी आघाडी बळकट करण्यासाठीं अमेरिका केवळ लोकशाही राष्ट्रांनाच मदत करीत आहे, असें नव्हे. स्पेनसारख्या फॅसिस्ट राष्ट्राला आर्थिक व लष्करी साहाय्य देऊन अमेरिकेनें स्पेनच्या भूमीवर विमान व आरमारी तळ मिळविले आहेत. सत्ता राजकारणांत वैचारिक भिन्नतेला कसें बाजूस सारण्यांत येतें, याचें हें चांगलें उदाहरण आहे. फ्रँकोचा अनुनय करण्यांत लोकशाहीचा विकास आहे असें कदाचित् अमेरिकेच्या परराष्ट्रखात्यास वाटत असावें! पण सर्वसामान्य विचारी माणसाचें मन या घटनेनें खिन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं.

जागतिक राजकारणाच्या गतिमानतेमुळें सामान्य नागरिक हतबुद्ध होतो. जगाच्या कानाकोपऱ्यांत घडणाऱ्या निरनिराळ्या घटनांमुळें त्याचें दैनंदिन जीवन बदलत असतें. हें कळत असून देखील स्वतःच्या दौर्बल्याची जाणीव वाढत्या स्वरूपांत आढळून येते. अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण आशियाई राष्ट्रांना अनुकूल व्हावें यासाठीं सामान्य हिंदी नागरिकाला काय करणें शक्य आहे? हिंदेशियांतील साम्यवादाच्या वाढत्या प्रचाराला सामान्य ब्रिटिश नागरिक कसा आळा घालूं शकेल? किंवा ईजिप्तमधील राजकीय क्रांतींतून हुकूमशाही निर्माण होऊं नये यासाठीं सामान्य अमेरिकन नागरिकाला कांहीं करतां येईल कां? वरील सर्व समस्यांवरून जागतिक राजकारणांत व्यक्तीला कांहीं करणें शक्य आहे कां, असा प्रश्न

उद्भवतो. आतांपर्यंतच्या विवेचनावरून फार तर असें म्हणतां येईल कीं लोकशाही नागरिक हा या दृष्टीनें अधिक धडपड करूं शकतो. पण साम्यवाद व लोकशाही यांच्या वाढत्या जागतिक संघर्षाबरोबर या भिन्न राष्ट्रांतील नागरिक जीवन हें अधिकाधिक सांचेबंद आणि ठोकळेबाज होत आहे. याचा अर्थ साम्यवाद व लोकशाही यांच्या संघर्षापेक्षां देखील अधिक मूलगामी प्रश्न आज निर्माण झाला आहे. जगांत सर्वत्र युद्धाचें आणि युद्धतयारीचें वातावरण कायम ठेवण्यांत आल्यामुळें मानवी जीवनांतील विविधता, सांस्कृतिक वैचित्र्य, सामाजिक प्रगति हीं सर्व नष्ट होऊन जग म्हणजे एक विशाल सैनिकतळ होईल. या जगांतील तथाकथित महान् राष्ट्रें परस्परांशीं सतत युद्ध्यमान राहतील. युद्धांतील विजयासाठीं संपूर्ण नागरिक जीवन हें शासनसंस्थेकडून नियंत्रित होईल. स्वतंत्र व्यक्तित्वाला, विचाराला व विकासाला वाव राहणार नाहीं. जॉर्ज ऑरवेल् सारख्या विचारवंतांनीं भावी पिढ्यांचें रंगविलेलें हें चित्र सत्य ठरणें फारसें अशक्य नाहीं. कारण सोव्हिएट रशिया आणि अमेरिका या दोन महान् राष्ट्रांत सध्यां चालू असलेली शस्त्रास्त्र व सैनिक वाढीची स्पर्धा अशीच चालू राहिल्यास तिसऱ्या महायुद्धाची कल्पना कितीहि भीषण व अप्रिय असली तरी ती साकार होण्याचा संभव आहे. अशा परिस्थितींत सामान्य व्यक्ति नव्या जगाच्या निर्मितीसाठीं कोणत्या मार्गानें प्रयत्न करूं शकेल याचा विचार करणें आवश्यक आहे.

बगडूब्याळ राजकारणाचा बाऊ करून नव्या जगाच्या नागरिकाला आपली जबाबदारी टाळतां येणार नाहीं. 'मी क्षुद्र, माझें कर्तृत्व मर्यादित व माझें जीवित क्षणभंगुर' असें म्हणून स्वतःची जबाबदारी बाजूस सारतां येणार नाहीं. तसें करणें ही सोयीस्कर पळवाट ठरेल. प्रत्येक राष्ट्राच्या सामान्य नागरिकाला आपल्या राष्ट्रांतील शैक्षणिक व वैचारिक प्रवाह जागतिक ऐक्याच्या दृष्टीनें उपकारक ठरावेत यांसाठीं धडपडतां

येईल. जगाचा नागरिक, तो कोणत्याहि राष्ट्राचा असो, अथवा वंशाचा असो, तो समान आहे ही भावना रुजविण्यासाठीं त्याला खटपट करतां येईल. या बाबतींत विशेषेंकरून श्वेतवर्णीय राष्ट्रांना व त्यांच्या नागरिकांना अधिक परिश्रम करणें प्राप्त आहे. श्वेतवर्णीयांनीं वंशश्रेष्ठतेच्या खोट्या कल्पना सोडून देऊन आफ्रिका व आशिया खंडांतील कोट्यवधि कृष्णवर्णीय व पीतवर्णीय जनतेचें जागतिक महत्त्व त्यांनीं लक्षांत घ्यावयास हवें. साम्यवाद व लोकशाही या दोन्ही विचारप्रणालींचा स्वीकार आशियांतील प्रमुख राष्ट्रांनीं केला असल्यामुळें वंशयुद्धाची भीति कमी झालेली आहे. पण वांशिक समानता ही अजूनहि स्वप्नसृष्टींतच आहे. ती प्रत्यक्षांत आणण्यासाठीं झटणें हें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य ठरेल. राष्ट्रांतर्गत अर्थव्यवस्थेंत नियोजन पद्धतीनें विषमता नष्ट करून प्रत्येक व्यक्तीला आर्थिक सुरक्षिततेची हमी मिळणें आवश्यक आहे. पण त्याचबरोबर नियोजनाचा परिणाम आत्यंतिक केंद्रीकरण होऊन आर्थिक व राजकीय सत्ता तंत्रज्ञ वर्गाच्या हातीं जाऊं नये यासाठीं विकेंद्रीकरण व सहकारी पद्धतीचा अधिकाधिक अवलंब करणें इष्ट आहे. या तऱ्हेनें प्रयत्न केल्यास प्रत्येक राष्ट्रांत योग्य ती समाजव्यवस्था निर्माण होऊं शकेल आणि मग तंत्रज्ञ, हुकूमशहा व लष्करी सेनानी यांचें राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय जीवनांतील प्राबल्य कमी होईल.

दोन महायुद्धाच्या खाईत होरपळून निघाल्यानंतर सर्वसामान्य व्यक्तीला जागतिक शांतता व सुस्थिर जीवन यांचा लाभ स्वतःच्या हयातींत होईल असा विश्वास वाटत नाहीं. जागतिक शांतता निर्माण करण्याचे प्रयत्न मानवानें यापूर्वीं अनेकदां केले आहेत. विश्वसाम्राज्याची कल्पना सर्व देशांत प्राचीन काळीं दृढमूल झाली होती. एकछत्री विश्वराज्याखालीं सर्व मानवजात सुखानें नांदूं शकेल, हाच विश्वास या कल्पनेच्या मागें होता. ॲलेक्झांडरचें साम्राज्य, रोमन साम्राज्य इत्यादि उदाहरणें वरील प्रवृत्तीचीं निदर्शक होतीं. अलीकडेहि अनेकदां जागतिक

शांततेसाठीं विश्वराज्याची कल्पना पुढें मांडली जाते. पण सध्यांच्या परिस्थितींत विश्वराज्य निर्माण होणें शक्य आहे कां ? या रम्य कल्पनेला केवळ राष्ट्रवादाचाच विरोध आहे असें नव्हे. तर सांस्कृतिक भिन्नता, भिन्न राष्ट्रांची झालेली कमीअधिक प्रगति, वैचारिक व आर्थिक मतभेद हेहि अडथळे विसरतां येत नाहींत. वस्तुस्थितीकडे डोळेझांक केल्यास केवळ स्वप्नरंजन म्हणून या कल्पनेला महत्त्व देतां येईल. पण प्रत्यक्ष व्यवहारांत ही कल्पना येणें सध्यांतरी अशक्य कोटींतील आहे.

सर्व राष्ट्रांचें विश्वसंघराज्य असावें या कल्पनेला अनेक विचारवंतांचा पाठिंबा आहे. विश्वराज्य अशक्य असलें, तरी विश्वसंघराज्य मात्र शक्य कोटींतील आहे असें त्यांना वाटतें. संघराज्याची कल्पना, घटक राज्यांना संपूर्ण स्वायत्तता देऊन, केवळ कांहीं विशिष्ट समान हितसंबंधांच्या बाबी केंद्रीय सत्तेकडे सोंपविण्यावर आधारलेली असते. या व्यवस्थेंत घटकराज्यांना मर्यादित स्वातंत्र्याचा उपभोग घेतां येतो. अमेरिका, रशिया, ऑस्ट्रेलिया, हिंदुस्थान यांचे बाबतींत जें शक्य झालें, तें साऱ्या जगाच्या बाबतींत कां शक्य होऊं नये असें अनेकांना प्रामाणिकपणें वाटतें. प्रथम दर्शनीं ही विचारसरणी योग्य आहे असें वाटलें तरी थोडा विचार करतांच त्यांतील अपूर्णता लक्षांत येते. वर उल्लेखिलेल्या प्रत्येक देशांत जीं घटकराज्यें संघराज्यव्यवस्थेंत एकत्र आलीं, त्यांच्यांत भौगोलिक, वांशिक व आर्थिक परंपरा समान असलेल्या आढळून येतात. त्यांच्यांतील भिन्नत्वापेक्षां समानतेवर संघराज्याची उभारणी झालेली असते. या दृष्टीनें विचार करतां विश्वसंघराज्यांतील सोव्हिएट रशिया व इक्वेडॉर, नवचीन व क्यूबा, संयुक्त संस्थानें व सयाम, हिंदुस्थान व अल्बेनिया, यासारख्या घटकांमध्यें मानवतेच्या साम्याखेरीज इतर कोणतेहि साम्य आढळून येत नाहीं. सध्यांच्या परिस्थितींत मानवतेच्या या एकमेव आधारावर इतर सर्व प्रकारचे भेद बाजूस सारून विश्वसंघराज्य निर्माण करण्याची थोडी तरी शक्यता आहे कां ? राजकीय

प्रगति, आर्थिक विकास, समाजव्यवस्था, सांस्कृतिक परंपरा यांपैकीं एकाहि बाबतींत कोणत्याहि दोन राष्ट्रांचें समानत्व दाखविणें शक्य आहे कां ?

विश्वराज्य अथवा विश्वसंघराज्य या कल्पना मानवजातीच्या अंतिम कल्याणाच्या दृष्टीनें अत्यंत श्रेयस्कर असल्या, तरी सध्यांच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितींत त्या व्यवहार्य ठरूं शकत नाहींत. मानवजातीच्या प्रगतीचे ध्रुवतारे म्हणून त्यांचा खचित उपयोग आहे. आत्यंतिक राष्ट्रवादाच्या सध्यांच्या कल्पना, परस्पर अविश्वास व द्वेष, तिसऱ्या महायुद्धाची कडेकोट तयारी, व संपूर्ण भीतिग्रस्त निर्बंधित जीवन या कचाट्यांतून व्यक्तीची सुटका व्हावयाची असेल, तर ध्रुवताऱ्याकडे लक्ष देऊनच प्रगतीचा मार्ग क्रमणें आवश्यक आहे. या मार्गापैकीं सध्यां शक्य असलेला टप्पा म्हणजे आंतरराष्ट्रीय जीवनाचें नियंत्रण अधिकाधिक प्रमाणांत आंतरराष्ट्रीय विधिनियमानें व्हावें यासाठीं प्रयत्न करणें होय. आंतरराष्ट्रीय विधिनियमाचें क्षेत्र व नियंत्रण ज्या प्रमाणांत वाढत जाईल त्या प्रमाणांत प्रत्येक राष्ट्राला स्वतःच्या अमर्याद सार्वभौमत्वाला मुरड घालणें आवश्यक होईल. या हळूहळू पण निश्चितपणें होणाऱ्या आंतरराष्ट्रीय विधिनियमाच्या विकासांतूनच भविष्यकाळांत मानवजातीला चिरंतन शांततेचा लाभ होऊं शकेल. ही कल्पना अवघड असली, तरी अव्यवहार्य खास नाहीं. आंतरराष्ट्रीय विधिनियमांचे सध्यां असलेलें महत्त्व २० वर्षांपूर्वी खास नव्हतें. ही एकच गोष्ट वरील कल्पना शक्य कोटींतील आहे याचा चांगला पुरावा आहे. स्वतःच्या आयुष्यांत जागतिक शांतता व सहकार्य वृद्धिंगत होण्यासाठीं, ही कल्पना प्रत्यक्षांत आणण्यासाठीं झटणें हेंच प्रत्येक शांतताप्रेमी नागरिकाचें कर्तव्य ठरतें.

परिशिष्ट

## (१) टिपणें

### व्यक्तिपरिचय.

१. **कार्ल मार्क्स आणि एंजल्स :** कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाचे उद्‌गाते. मार्क्सचा जन्म १८१८. जर्मन विश्वविद्यालयांत अध्यापन. जगाच्या इतिहासांत चिरस्मरणीय ठरलेली एंजल्सची मैत्री. १८४३ सालीं विवाह. १८८३ मध्यें लंडन येथें हालअपेष्टांत मृत्यु. जगाच्या विचारसरणीला निराळें वळण लावणाऱ्या पहिल्या तीन पुस्तकांत मार्क्सच्या कॅपिटल ग्रंथाची गणना. जगांतील प्रमुख भाषांत या ग्रंथाचीं भाषांतरें झालीं आहेत.

एंजल्स जन्म १८२०. मार्क्सचा एकनिष्ठ मित्र व सहकारी. कम्युनिझमच्या जनकत्वाचें अर्धं अधिक श्रेय त्याला देण्यांत येतें. मार्क्सच्या पडत्या काळांत आर्थिक मदत यानेंच दिली. मार्क्सच्या मृत्यूनंतर त्याच्या ग्रंथांचें संपादन व आंतरराष्ट्रीय समाजवादी चळवळीचें धुरीणत्व. मृत्यु १८९५. समाजवादावर अनेक ग्रंथ लिहिले.

२. **चर्चिल :** (१८७४) हॅरो येथील अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर १८९५ मध्यें सैन्यप्रवेश. १९०० हुजूर म्हणून पार्लमेंटप्रवेश. परंतु पुढें उदारमतवादी म्हणून मंत्रिमंडळांत महत्त्वाचीं कामें केली. पुन्हां समाजवाद-विरोधासाठीं हुजूरपक्षांत पदार्पण. हुजूर म्हणून अर्थमंत्री १९२४ ते २९. १९४० मध्यें राष्ट्रीय मंत्रिमंडळाचा मुख्य मंत्री. यशस्वी रणझुंझार युद्धनेता. पण १९४५ मध्यें हुजूर पक्षाचा पराभव झाला म्हणून विरोधी पक्षाचा पुढारी. मजूर मंत्रिमंडळाचे परराष्ट्रीय धोरणास पाठिंबा. बाकी सर्वत्र विरोध. अव्वल दर्जाचा वक्ता, उत्कृष्ट लेखक. त्याचीं कांहीं पुस्तकें : वर्ल्ड क्रायसिस, सेकंड वर्ल्ड वॉर. १९५१ च्या निवडणुकींत पुनः एकदां ब्रिटनचें नेतृत्व–कट्टर साम्यवादविरोधी व साम्राज्यवादी विचारसरणी.

३. **अॅटली**: (१८८३) ऑक्सफर्ड येथें शिक्षण. १९१३ मध्यें लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समध्यें लेक्चरर. १९१९ त स्टिपनीचा पहिला मजूर मेयर. १९२२ त लाइटहाऊसचा प्रतिनिधि म्हणून पार्लमेंटांत पदार्पण. १९२५ त पक्षाचा उपनेता. १९३५ ते ४० मध्यें पार्लमेंटमध्यें विरोधी पक्षाचा नेता. १९४० च्या चर्चिलच्या राष्ट्रीय मंत्रिमंडळांत उपमुख्यप्रधान. १९४५ मध्यें मजूर मंत्रिमंडळांत मुख्य प्रधान. The Labour Party in Perspective व Purpose and Policy हीं त्यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. १९५१ नंतर विरोधी पक्षाचा नेता.

४. **क्रिप्स**: (१८८९–१९५२) विचेस्टर व लंडन येथें शिक्षण. पहिल्या मजूर मंत्रिमंडळांत सॉलिसिटर जनरल. १९३० त मजूर पक्षांशीं पॉप्युलर फ्रंट व कम्युनिस्ट हातमिळवणीबाबत मतभेद. म्हणून १९३५ मध्यें पक्षाबाहेरील स्वतंत्र समाजवादी. १९४५ च्या मजूर मंत्रिमंडळांत निरनिराळ्या खात्यांचा संयोजनमंत्री व १९४७ मध्यें डाल्टननंतर अर्थमंत्री. १९४२ मधील क्रिप्सयोजनेमुळें प्रसिद्ध. भारतीय स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता.

५. **रूझवेल्ट**: (१८८२–१९४५) १९०४ मध्यें हार्वर्डमध्यें शिक्षण. १९१२–आरमाराचा दुय्यम चिटणीस. १९२०–उपाध्यक्षाच्या निवडणुकींत (डेमोक्रॅटिक पक्षाचा) पराभव. १९२८–एल्‌स्मिथच्या आग्रहावरून न्यूयॉर्कच्या गव्हर्नरपदीं निवडणूक. १९३२ त अमेरिकेच्या अध्यक्षपदीं निवड. 'New Deal' योजनेनें आर्थिक मंदींतून अमेरिकेची सुटका. १९३६–४०–४४ मध्यें पुन्हां अध्यक्षपदीं निवड. फॅसिस्टविरोधी व लोकशाहीचा कट्टा पुरस्कर्ता. अमेरिकेच्या इतिहासांतील चार वेळां अध्यक्ष झाल्याचें एकमेव उदाहरण. जर्मनी, जपान यांच्या पराभवाचीं सुचिन्हें दिसत असतांनाच १९४५ मध्यें मृत्यु.

६. **ट्रुमन**: (१८८४) पत्रकार व पतपेढीवर काम, नंतर शेती. पहिल्या महायुद्धांत भाग. १९३४–४४ सिनेट सभासद. रूझवेल्टच्या

चौथ्या निवडणुकींत उपाध्यक्ष म्हणून १९४४ मध्यें निवड. रूझवेल्टच्या मृत्यूमुळें घटनेनुसार १९४५ मध्यें अमेरिकेचा अध्यक्ष. १९४८ मध्यें अनेकांच्या अपेक्षेविरुद्ध रिपब्लिकन उमेदवार ड्युईचा पराभव करून अध्यक्षपदीं निवड. मजूर व निग्रोविषयक उदार धोरण. रशियाविरोध हें परराष्ट्रीय धोरणाचें मुख्य सूत्र. धनिक, उद्योगपति व लष्करी अधिकारी यांना दिवसानुदिवस राज्यव्यवस्थेंत प्रमुख स्थान देण्याचें धोरण. १९५१ मध्यें मॅकॉर्थरला पदच्युत करण्याचा घेतलेला ऐतिहासिक निर्णय. १९५२ च्या निवडणुकींत स्वतः उभे न राहतां स्टीव्हन्सनला पाठिंबा दिला.

७. **हिटलर:** (१८८९–१९४५) ऑस्ट्रियांत जन्म. अयशस्वी चितारी. १ ल्या महायुद्धांत मामुली स्वरूपाचा भाग. १९१९–जर्मन कामगारांच्या पक्षांत प्रवेश व नेतृत्व. १९२३ म्युनिच येथील अयशस्वी दंगल. ५ वर्षांची सजा. कारागृहांत 'माझा लढा' हें आत्मवृत्त. १९२५ नंतर सुटका. नाझीपक्षाची वाढ. १९३३ मध्यें सत्तासंपादन. ज्यूविरोध, साम्यवादविरोध व आत्यंतिक जर्मन राष्ट्रवाद आणि वंशवाद हीं अंतर्गत धोरणाचीं सूत्रें. व्हर्सायचा तह नष्ट करणें व जर्मनीला पहिल्या प्रतीचें राष्ट्र बनवणें हें परराष्ट्रीय धोरण. आकर्षक व्यक्तिमत्व व प्रभावी वक्तृत्व. युद्धाच्या अखेरीस बर्लिनमध्यें मृत्यु आला असावा.

८. **मुसोलिनी:** (१८८३–१९४५) समाजवादी म्हणून आयुष्याला सुरुवात. अॅवॉन्टी पत्राचें संपादन. १९१४ मध्यें युद्धप्रवेशानुकूल भूमिकेबद्दल समाजवादी पक्षांतून हकालपट्टी. हिटलरप्रमाणेंच पहिल्या युद्धांत भाग. युद्धांतून परतल्यानंतर फॅसिस्ट पक्षाची स्थापना. १९२२ रोमवरील मोर्चा व सत्तासंपादन. १९३५ अॅबिसीनियावर चढाई व जर्मनीशीं हातमिळवणी. 'रोम बर्लिन अक्ष'. १९३७ बंडखोर फ्रँकोला मदत. जून १९४० च्या फ्रान्सच्या पराभवानंतर युद्धांत यश. १९४३ बाडोग्लियोच्या नेतृत्वाखालीं मुसोलिनीचें उच्चाटन व कैद. जर्मनांकडून

सुटका. उत्तर इटलींत जर्मनांचे साहाय्यानें पुन्हां राजवट. १९४५ स्वित्झर्लंडमध्यें पलायन करीत असतांना इटालियन विरोधकांकडून खून.

९. **लेनिन :** (१८७०–१९२४) मोठ्या भावाचा झारकडून वध. लेनिनची सैबिरियांत हद्दपारी. कांहीं काळानंतर परदेशगमन. लंडन परिषदेंत क्रांतिवादी बोल्शेव्हिकांचें नेतृत्व. १९१७ पर्यंत अज्ञातवास व युरोपभर परिभ्रमण. पहिल्या महायुद्धाला तीव्र विरोध. रशियांतील १९१७ तील पहिल्या क्रांतीनंतर जर्मन सेनानींच्या साहाय्यानें रशियांत प्रवेश व क्रान्तीचें नेतृत्व. केरेन्स्की सरकार उलथून पाडून सत्ता-संपादन. १९१९ 'थर्ड इंटरनॅशनल'ची स्थापना. रशियांत १९२२ पर्यंत 'युद्धकालीन साम्यवाद' व त्याचा पाठपुरावा. १९२२ 'नवें आर्थिक धोरण' (N. E. P.). १९२३ मध्यें असंतुष्ट पक्षाच्या एका सभासदाकडून गोळी लागली. त्यांतूनच १९२४ मध्यें मृत्यु. असामान्य कर्तृत्व व प्रभावी व्यक्तिमत्व. तत्त्वज्ञ व संघटक. रशियन राज्यक्रान्तीच्या यशाचें बरेचसें श्रेय वरील गुणांमुळें लेनिनकडेच जातें. पुस्तकें : इंपीरियालिझम, स्टेट अँड् रेव्होल्यूशन इ०.

१०. **स्टॅलिन :** (१८७९–१९५३) कॉकेशसमध्यें जॉर्जिया या भागांत एका चांभागच्या कुटुंबांत जन्म. १९१२ कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती समितीचा सभासद. अनेकवार तुरुंगवास व हद्दपारी. १९१७ मध्यें सेंट पीटर्सबर्गला पुनरपि आगमन व 'प्रवदा'चें संपादन. पक्षाच्या राजकीय समितीचा सभासद. १९१९ पक्षाचा जनरल सेक्रेटरी. १९२४ मध्यें लेनिनच्या मृत्यूनंतर ट्रॉट्स्कीविरुद्ध सत्तासंपादनासाठीं यशस्वी खटपट. १९२७ त ट्रॉट्स्कीची हकालपट्टी व रशियाचा सूत्रधार. १९२८ व १९३३ मध्यें २ पंचवार्षिक योजना अन्तर्गत विरोध असतांनाहि यशस्वी केल्या. १९३४ मध्यें किरॉव्हच्या खुनाचे नांवाखालीं विरोधकांची धरपकड. १९३६–३८ मास्को खटल्यांत पक्षशुद्धीसाठीं

अनेकांना देहान्तशिक्षा – बहुतेक सर्व जुने कार्यकर्ते बळी पडले. १९३६ रशियाच्या नवीन घटनेचा निर्माता. १९३९ हिटलरशीं अनाक्रमणाचा तह. १९४१ जर्मन आक्रमणाविरुद्ध साऱ्या राष्ट्राचें संघटन व यशस्वी टक्कर. लोकशाही राष्ट्रांशीं गट्टी. युद्धोत्तर काळांत रशियाचें व म्हणून स्टॅलिनचें वाढलेलें महत्त्व. अत्यंत व्यवहारवादी. आंतल्या गांठीचा व विलक्षण चतुर असा पोलादी नेता. पुस्तकें–Problems of Leninism; National & Colonial Question इ.

११. ट्रॉट्स्की : (१८७७–१९४०) कीव्ह विद्यापीठांत शिक्षण. १९०३ मेन्शेव्हिकांशीं संगनमत. चिरन्तर क्रांतीची विचारप्रणाली. सैबेरियांतील हद्दपारींतून पलायन व परदेशगमन, लेनिनशीं संबंध. १९१७ नंतर रशिया-प्रवेश. पहिल्या सोव्हिएट सरकारांत युद्धमंत्रि. लाल सेनेचा जनक. यादवी युद्धांत यशस्वी नेतृत्व. १९२४ लेनिनच्या मृत्यूनंतर आंतरराष्ट्रीय क्रांतीच्या पुरस्कर्त्या ट्रॉट्स्कीचें स्टॅलिनशीं भांडण. १९२७ रशियांतून व पक्षांतून हकालपट्टी. सोव्हिएट नागरिकत्वाचे अधिकार हिरावून घेण्यांत आले. तुर्कस्तान, नॉर्वे, फ्रान्स व शेवटीं मेक्सिकोंत आश्रय. १९४० मध्यें अज्ञात इसमाकडून खून. 'फोर्थ इंटरनॅशनल'चा संस्थापक. भावनाप्रधान स्वभाव व अत्यंत तेजस्वी बुद्धिमत्ता. पुस्तकें Revolution Betrayed; History of Russian Revolution, स्टॅलिनचें चरित्र. आजहि ट्रॉट्स्कीच्या विचारांचा पगडा अनेक साम्यवादी विचारवंतांवर दिसतो.

१२. डॉ. सन्यत् सेन : (१८८६–१९३५) १८६६ एका चिनी शेतकरी कुटुंबांत जन्म. अमेरिकन शिक्षणसंस्थांतून शिक्षण. कँटन येथें वैद्यकीय व्यवसाय. १८९५ राजकीय जीवनाला सुरुवात. सरकारी छळामुळें परदेशगमन. १९०५–कॉमिन्टाँगची स्थापना. १९११–चिनी राज्यक्रांतीचा सूत्रधार. युआनशीकायच्या विरोधामुळें कांहीं काळ

राजकारणनिवृत्ति. १९२१–नानकिंग येथें अध्यक्षपदीं निवड. मास्कोशीं जिव्हाळ्याचे संबंध. बोरोडीनचें आगमन. मृत्यु १९२५. त्याचें थडगें चिनी जनतेचें स्फूर्तिस्थान आहे.

१३. **चँग-कै-शेक**: (१८८८) लष्करी अधिकारी म्हणून जीवनाला सुरुवात. १९११ च्या क्रांतींत भाग. नंतर कॉमिन्टॉग प्रवेश. सन्यत्सेनचा उजवा हात. मॉस्को येथें लष्करी शिक्षण. सन्यत्सेनच्या मृत्यूनंतर कॉमिन्टॉँग पक्षनेतृत्व व दक्षिण चीनचें अध्यक्षपद. १९२७ कम्युनिस्टांशीं फारकत व चिनी यादवीला सुरुवात. कम्युनिस्टांना नष्ट करण्याचे अयशस्वी प्रयत्न. १९३७ जपानचें आक्रमण. त्यामुळें १९४१ मध्यें कम्युनिस्टांशीं हातमिळवणी व अमेरिका-ब्रिटनच्या साहाय्यानें जपानची हकालपट्टी. १९४५ नंतर कम्युनिस्टांशीं मतभेद व पुनः यादवी. कॉमिन्टॉँग राज्यव्यवस्था लांचलुचपत व भ्रष्ट अधिकाऱ्यांनीं बुजबुजलेली. अमेरिकेच्या मदतीचादेखील उपयोग न होऊन कम्युनिस्टांकडून पराभव. सध्यां फोर्मोसा बेटावर अमेरिकन संरक्षणांत वास्तव्य.

१४. **माव-त्से-तुंग**: (१८९८) सुखवस्तु चिनी शेतकरी कुटुंबांत जन्म. १९२१ चिनी कम्युनिस्टपक्षांत प्रवेश. पक्षाच्या क्रांतिवादी पत्राचें संपादन. मजूर संघटना करण्यांत यशस्वी. १९४२ राजकीय समितीचा प्रमुख. १९४९ चीनच्या साम्यवादी राजवटीच्या अध्यक्षपदीं निवड. मास्कोशीं निकट संबंध. अमेरिका व पाश्चात्य राष्ट्रविरोध. कोरियांतील युद्धांत उत्तर कोरियासाठीं लक्षावधि स्वयंसेवकांची मदत. मॅकॉर्थरच्या अतिपूर्वेतील लढाऊ राजकारणाला जबरदस्त काटशह. युनोच्या सुरक्षासमितींतील कायम जागेची मागणी.

१५. **टिटो**: (१८९२) १९२३ साम्यवादी चळवळीसाठीं अटक. सुटकेनंतर परदेशगमन. दुसऱ्या महायुद्धापूर्वी मायदेशीं परत. रशियावरील चढाईनंतर जर्मनांशीं गनिमी काव्याचें युद्ध. मिहालोव्हिच या

प्रतिगामी गनिमी पुढाऱ्याचा विरोध व अखेरीस त्याच्यावर मात. रशियन मदतीनें युगोस्लाव्हियाचा सर्वाधिकारी. युगोस्लाव्हियाची साम्यवादी तत्त्वावर पुनर्घटना. १९४७ मास्को-प्रेरित कॉमिनफॉर्मकडून टिटोचा निषेध व विरोध. राष्ट्रवादी धोरणाचा पुरस्कर्ता असल्याचा आरोप. अंतर्गत स्वातंत्र्य अबाधित राखून टिटोची साम्यवादाशीं व रशियाशीं अविचल निष्ठा असल्याची घोषणा. पण मास्कोचें असमाधान. टिटो ट्रॉट्स्कीपंथीय व देशद्रोही असल्याची घोषणा. पाश्चात्य साम्राज्यवाद्यांशीं सहकार्य केल्याचा आरोप. टिटोचें साम्यवादी पण स्वतंत्र धोरण. १९५२ मध्यें ब्रिटनला भेट.

१६. **फ्रॅन्को** : (१८९२) लष्करी अधिकारी म्हणून जीवनाला सुरुवात. १९२६ मध्यें कर्नल व १९३५ मध्यें 'चीफ ऑफ् स्टाफ'. तदनंतर स्पॅनिश मोरोक्कोंत रवानगी. तेथूनच १९३५ त बंडाला सुरुवात. जनरल सॅनजिरोच्या मृत्यूनंतर फ्रॅकोनें बंडखोरांचें नेतृत्व पत्करलें. इटली व जर्मनीच्या मदतीनें स्पॅनिश सरकारचा पराभव व सत्ता-संपादन. १९३८ मध्यें स्पेनचा सर्वाधिकारी. फॅलॉंग पक्षाचा मुख्य. १९४१ च्या रूसो-जर्मन युद्धांत स्पॅनिश स्वयंसेवकांची तुकडी पाठविली. युद्धोत्तर काळांत लोकशाही राष्ट्रांचा बहिष्कार व संयुक्त राष्ट्रसंघटनेंत प्रवेश बंदी. १९४७ नंतर वाढत्या रशियन विरोधामुळें अमेरिकेचें स्पेनशीं संगनमत. १९५३ मधील करारानुसार स्पेनला आर्थिक व लष्करी मदत मिळविण्यांत यशस्वी.

१७. **गांधीजी** : (१८६९–१९४८) राजकोट व लंडन येथें शिक्षण. मुंबई व दक्षिण आफ्रिकेंत बॅरिस्टरी. लोकमान्यांच्या मृत्यूनंतर (१९२०) भारतीय राजकारणांत प्रवेश व नेतृत्व. १९२० ते १९४८ या काळांत साऱ्या भारतीय राजकारणावर गांधीजींच्या व्यक्तिमत्वाची छाप. अहिंसा, सत्य, सत्याग्रह या अव्यवहार्य वाटणाऱ्या अभिनव तत्त्वांवर भारतीय

जनतेची जागृति व ब्रिटिश सत्तेशीं लढा. भारतीय स्वातंत्र्याचा निर्माता. १९४८ दिल्ली येथें खून. पुस्तकें: आत्मचरित्र (सत्याचे प्रयोग) व 'यंग इंडिया' व 'हरिजन' मधील लेख.

१८. पंडित जवाहरलाल नेहरू : (१८८९) काश्मिरी ब्राह्मण. पं. मोतीलाल नेहरू या प्रागतिक व श्रीमान् वकिलाचे पुत्र. हॅरो व केंब्रिज येथें शिक्षण. १९१८ कॉंग्रेसमध्यें पदार्पण. १९२१ पासून तुरुंगवासाला सुरुवात. गांधीजींचे मानसपुत्र व राजकीय वारसदार. १९४६ भारताचें प्रधानपद. साम्राज्यविरोध व फॅसिस्टविरोध हा नेहरूंचा स्थायीभाव आहे. पण पाश्चात्य संस्कृतीविषयीं त्यांना द्वेष नाहीं. अंतर्गत धोरणांत नेहरू प्रस्थापित समाजव्यवस्थेचे व सत्तेचे पुरस्कर्ते झाले आहेत. परराष्ट्रीय राजकारणांत अमेरिका व रशिया या दोन्ही राष्ट्रगटांपासून अलिप्त राहण्याचें तटस्थतेचें धोरण. लोकशाहीचे कट्टे पुरस्कर्ते व शांततावादी मुत्सद्दी म्हणून जगभर प्रसिद्धि. स्वातंत्र्यानंतर जागृत आशियाच्या एकजुटीची तळमळ व त्यासाठीं धडपड. पुस्तकें: Discovery of India; Glimpses of World History; Autobiography.

१९. चार्लस द गॉल: (१८९०) फ्रेंच राजकीय जीवनांत दुसऱ्या महायुद्धांत धुमकेतुवत् समोर आलेला पुढारी. शिक्षणानें आणि पेशानें लष्करी अधिकारी. पहिल्या महायुद्धांत व्हर्डुन येथें जखमी व युद्धकैदी. दुसऱ्या महायुद्धांत पेतॉंची शरणागति अमान्य करून इंग्लंडमध्यें आगमन. स्वतंत्र फ्रेंचांचा नेता. अत्यंत कडवा फ्रेंच राष्ट्रभक्त. व्याप्त आणि पराभूत फ्रान्समध्यें भूमिगत विरोधाची चळवळ निर्माण केली. दोस्तांच्या विजयाबरोबर मुक्त आणि स्वतंत्र फ्रान्सचें नेतृत्व द गॉलकडे आलें. युद्धोत्तर काळांत द गॉल हा राजकीय पुढारी बनला. त्याच्या नवीन पक्षाला फ्रेंच राजकीय जीवनांत महत्त्वाचें स्थान आहे. पण सत्ता काबीज करण्याइतकें बहुमत मिळू शकलेलें नाहीं. कम्युनिस्टांचा द गॉल आणि त्याचा पक्ष याला कडवा विरोध आहे.

२०. **मोलोटॉव्ह**: (१८९०) स्टॅलिनचा निकटवर्ती सहकारी. सत्तेचीं सूत्रें ज्या त्रिमूर्तीकडे आलीं त्यापैकीं शेवटचा. दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत सोव्हिएट रशियाचा परराष्ट्रमंत्री. बोल्शेव्हिक पक्षाचा अत्यंत जुना व विश्वासू अनुयायी. १९०५ व १९१७ या क्रांतींत महत्त्वाचा भाग. स्टॅलिन-ट्रॉट्स्की यादवींत मोलोटॉव्हनें स्टॅलिनचा प्रामाणिकपणें पाठपुरावा केला. रशियांतील नव्या मॅलेन्कोव्ह युगांत मोलोटोव्हचें स्थान अजून निश्चित झालेलें नाहीं.

२१. **बेरिया**: (१८९९-१९५३) सोव्हिएट रशियाच्या स्टॅलिन युगांतील कुप्रसिद्ध गुप्त पोलिस (N. K. V. D.) खात्याचा निर्दय पण कर्तबगार प्रमुख. टीकाकारांच्या मतें बेरियाचें हात सर्वांत जास्त रक्तरंजित आहेत. लक्षावधि राजकीय विरोधकांचा नायनाट करण्यासाठीं स्टॅलिननें बेरियाचा उपयोग केला. दुसऱ्या महायुद्धानंतर बेरियाचें वर्चस्व केवळ सोव्हिएट रशियापुरतेंच मर्यादित न राहतां सोव्हिएट अंकित पूर्व युरोपीय राष्ट्रांत पसरलें. १९४५ मध्यें स्टॅलिननें बेरियाला रशियांतील अणु-संशोधनाचा प्रमुख नेमलें. स्टॅलिनच्या मृत्यूपर्यंत त्याचे हातीं फार मोठी सत्ता एकत्रित झाली होती. स्टॅलिनच्या मृत्यूनंतर मॅलेन्कॉव्ह व बेरिया यांच्यांतील सत्तास्पर्धा विकोपास जाऊन मॅलेन्कॉव्हनें बेरियास पदच्युत करून अटकेंत टाकलें. बेरियावरील आरोप हे ठराविक साच्याचें, क्रांतिविरोधी, साम्राज्यशाहीचा हस्तक आणि सत्तेचा दुरुपयोग असे आहेत. बेरिया व त्याच्या सहकाऱ्यांना गोळ्या घालून ठार मारण्यांत आलें.

२२. **जॉर्जी मॅलेन्कॉव्ह**: (१९०२) स्टॅलिनच्या मृत्यूनंतर सोव्हिएट रशियाचा सर्वाधिकारी. १९१७ च्या क्रांतिकाळांत मॅलेन्कॉव्ह हा एक साधा शाळकरी विद्यार्थी होता. १९२० मध्यें त्यानें कम्युनिस्ट पक्षांत प्रवेश केला. त्यानंतरच्या काळात मॅलेन्कॉव्हचा उत्कर्ष

सतत होत गेला. स्टॅलिनच्या निकटवर्ती सहकाऱ्यांत त्याला अगदीं जवळचें स्थान मिळालें. एका दृष्टीनें स्टॅलिननेंच आपला वारसदार म्हणून त्याची निवड केलेली होती. स्टॅलिनच्या मृत्यूनंतर सत्तेची सूत्रें मॅलेन्कॉव्हच्या हातीं हळू हळू केंद्रित होत आहेत असें दिसतें. स्टॅलिनप्रमाणेंच मॅलेन्कॉव्ह स्वतःच्या राजकीय विरोधकांचा नायनाट केल्याशिवाय राहणार नाहीं, असें बेरियाच्या उदाहरणावरून म्हणतां येतें. जगांतील एका प्रचंड राष्ट्राचा निरंकुश नेता यामुळें मॅलेन्कॉव्हचें जागतिक राजकारणांतील स्थान अत्यंत महत्त्वाचें आहे. त्याच्या मतें पहिल्या महायुद्धानें जगाला सोव्हिएट क्रांति दिली, दुसऱ्या महायुद्धानें पूर्व युरोप व चीन साम्यवादी झाला. त्याअर्थी तिसरें महायुद्ध म्हणजे जगांतील भांडवलशाहीचा संपूर्ण विनाश व जागतिक क्रांतीची पर्वणी होय.

२३. **आयसेनहॉवर**: (१८९०) अमेरिकेचा पस्तिसावा अध्यक्ष. दोस्त राष्ट्रांचा दुसऱ्या महायुद्धांतील युरोपच्या रणक्षेत्रांवरील यशस्वी सरसेनापति. आयसेनहॉवरची १९५२ मध्यें अमेरिकेच्या जनतेनें केलेली निवड अनेक दृष्टींनी सूचक आहे. आयसेनहॉवर यांना या निवडणुकींत आजवर कोणाहि अध्यक्षाला मिळालीं नाहींत इतकीं मतें मिळालीं. या लोकप्रियतेच्या पाठीशीं त्यांची युरोपमधील कामगिरी होती. महायुद्धांत दोस्तांचें सरसेनापतिपद हें केवळ लष्करी नेतृत्व अंगीं असणाऱ्या व्यक्तीला देऊन भागणारें नव्हतें. लष्करी नेतृत्वाबरोबरच राजकारणचातुर्य व लोकसंग्रह यांची जोड आवश्यक होती. रूझवेल्ट यांनीं इतर वरिष्ठ सेनापतीस बाजूस सारून त्यांची निवड वरील गुणाकरितां केली. अमेरिकेचें नेतृत्व करण्याची संधि आज या यशस्वी सेनापतीला मिळाली आहे. ट्रुमनच्या पार्श्वभूमीवर आयसेनहॉवरचें व्यक्तित्व आकर्षक आणि प्रभावी वाटतें. जगाची शांतता ज्या थोड्या व्यक्तींच्या हातीं आहे त्यांत आयसेनहॉवर यांचें स्थान अग्रगण्य आहे.

२४. **जनरल मॅकऑर्थर :** (१८८०) लष्करी सेनापतीचा मुलगा. अमेरिकेच्या लष्करी विद्यापीठांत निर्माण केलेला विक्रम. तदनंतर सतत लष्करी नोकरी. १९४१ मध्यें सुदूरपूर्वेतील अमेरिकन सेनापति. अत्यंत गर्विष्ठ आणि करारी म्हणून प्रसिद्ध. कोरियन युद्धांत दाखविलेलें चातुर्य आणि साहस. मॅकऑर्थरच्या मतें कोरियनयुद्ध ही चीनवरील हल्ल्याची संधि समजावी. अमेरिकेच्या अधिकृत धोरणाविरुद्ध प्रकटपणें मतप्रदर्शन. ऐतिहासिक म्हणून गाजलेली १९५१ एप्रिलमधील मॅकऑर्थरची सेवानिवृत्ति. मॅकऑर्थरचें अमेरिकन जनतेनें केलेलें स्वागत हें विजयी वीराच्या स्वागताला मागें टाकणारें होतें. उत्कृष्ट वक्तृत्व, वक्रोक्तिपूर्ण भाषा व ट्रूमनद्वेष यांचा उपयोग सेवानिवृत्तीनंतर डेमोक्रॅटिक पक्षाच्या विरुद्ध केला. आयसेन-हॉवरच्या निवडणुकीच्या यशांत मॅकऑर्थरचा वांटा आहे.

२५. **जनरल नगीब :** विलासी व नीतिभ्रष्ट फरूकच्या राजवटीला उलथून पाडण्याचें धैर्य इजिप्तमधील जनतेंत नव्हतें. पण इजिप्तच्या सैन्यांतील तरुण अधिकारी गटानें तें कार्य केलें. त्या गटाचा प्रमुख. सत्ता हातीं येतांच विरोधकांची धरपकड. फरूकची हकालपट्टी. इजिप्तच्या गणराज्याचा पहिला अध्यक्ष. ब्रिटनच्या सुवेझ कालवा विभागांतील वर्चस्वाला कडवा विरोध. नव्या करारानुसार ब्रिटिश सैन्य काढता पाय घेणार.

२६. **डॉ. सिंगमन ऱ्ही :** (१८७५) कोरियाच्या स्वातंत्र्या-साठीं जपानशीं लढणाऱ्या क्रांतिकारकांपैकीं एक. अनेक वर्षे कैदेंत काढलीं. १९०४ मध्यें सुटका. अमेरिकेंत हार्वर्ड विद्यापीठांत उच्च शिक्षण. १९१२ मध्यें अज्ञातवासाला सुरुवात. ३३ वर्षांनीं कोरियांत पुनरागमन. दक्षिण कोरियाचा अध्यक्ष. कट्टर कम्युनिस्टद्वेष्टा. शस्त्रसंधिविषयक वाटाघाटी चालू असतांना २५००० कम्युनिस्टविरोधी युद्धकैद्यांना सोडलें. हिंदुस्थान कम्युनिस्ट असल्याचा प्रचार. अमेरिकेच्या तंत्रानुसार वागणारा.

## महत्त्वाच्या घटना.

१. **कम्युनिस्ट मॅनिफेस्टोः** १८४८ मध्ये कार्ल मार्क्स व एंजल्स यांनीं लिहिलेली एक पुस्तिका. कम्युनिझमच्या प्रमुख तत्त्वाचें सोप्या भाषेंत केलेलें विवरण. जगाच्या राजकारणांत अत्यंत परिणामकारक ठरलेल्या राजकीय वाङ्मयापैकीं एक प्रमुख लिखाण. आजवर ५० पेक्षां जास्त भाषांत भाषांतरें.

२. **सुवर्ण परिमाण:** ( Gold Standard ) या चलनपद्धतींत सर्व चलनाचें मूल्य सुवर्ण परिमाणावर आधारलेलें असतें. सुवर्ण परिमाण म्हणजे सोन्याचा एक विशिष्ट वजनाचा व निश्चित कसाचा तुकडा असतो. या परिमाणावरून सर्व मूल्यें निश्चित केलीं जातात. १९१४ पूर्वी सुवर्ण परिमाण जगांतील प्रमुख राष्ट्रांत चालू होतें. पहिल्या महायुद्धामुळें त्यांत खंड पडला. युद्धोत्तर काळांत अनेक राष्ट्रांनीं सुवर्ण परिमाणाचा बदललेल्या स्वरूपांत पुनर्स्वीकार केला. पण जागतिक मंदीनंतर इंग्लंड व इतर अनेक राष्ट्रांना सुवर्ण परिमाण सोडावें लागलें. आज जगांत कुठेंहि सुवर्ण परिमाण अस्तित्वांत नाहीं.

३. **वॉलस्ट्रीट :** न्यूयॉर्कमधील शेअरबाजार असलेला रस्ता. पण केवळ शेअर बाजाराचा निर्देश करण्यासाठीं या शब्दांचा उपयोग न करतां अमेरिकन भांडवलदारांच्या शक्तीचा तो द्योतक आहे म्हणून केला जातो. वॉलस्ट्रीटचें अमेरिकन राजकारणावर—विशेषतः परराष्ट्रीय राजकारणावर—रूझवेल्टच्या कारकीर्दींत कमी झालेलें वजन ट्रुमन राजवटींत पुन्हां वाढीस लागलें. रिपब्लिकन पक्षाच्या कारकीर्दींत वॉलस्ट्रीटचें महत्त्व अधिक वाढेल असा निरीक्षकांचा अंदाज आहे.

४. **New Deal 'नवी योजना' :** जागतिक मंदींतून अमेरिकेला बाहेर काढण्याच्या रूझवेल्टच्या धोरणाला दिलेलें नांव. अमेरिकन सरकारनें प्रथमच औद्योगिक आणि आर्थिक क्षेत्रांत प्रचण्ड प्रमाणावर हस्तक्षेप

करून नवीन जबाबदाऱ्या स्वीकारून निराश जनतेंत उत्साह निर्माण केला. यामध्यें प्रचण्ड सरकारी कामें, समाजहितवर्धक कायदे व क्रयशक्ति वाढविण्यासाठीं उपाय यांचा समावेश होतो. उदाहरणार्थ T V.A. योजना. बेकारी कमी करण्याच्या कामीं ही योजना उपयोगी पडली.

५. शीत युद्ध : ( Cold War ) दुसऱ्या महायुद्धानंतर निर्माण झालेली अमेरिकन गट व सोव्हिएट गट यांच्यांतील तेढ विकोपास गेली. त्याचें पर्यवसान परस्परांविरुद्ध प्रचार, नाकेबंदी, आर्थिक कुचंबणा आदि केलेल्या कारवायांत होऊन त्याला शीत युद्ध हें नांव प्राप्त झालें. बर्लिनची नाकेबंदी ही या शीत युद्धाची सुरुवात ठरली. 'व्हाईस ऑफ अमेरिका' हा या युद्धाचा प्रचारात्मक भाग.

६. व्हर्सायचा तह : पहिल्या महायुद्धाचा शेवट या तहांत झाला ( १९१९ ). या तहान्वयें राष्ट्रसंघाची स्थापना, जर्मनीचें खच्चीकरण, जर्मन वसाहतींची वांटणी व पूर्व युरोपांतील चिमुकल्या राष्ट्रांची निर्मिति इतक्या गोष्टी घडल्या. दोस्तांनीं केवळ जर्मनीलाच गुन्हेगार ठरवून त्याच्या डोक्यावर प्रचंड खंडणी लादली. विल्सन, लॉईड जॉर्ज, क्लेमेन्सो व ओरलँडो या मुत्सद्यांनीं यांत प्रामुख्यानें भाग घेतला होता. या तहाच्या कांहीं अटी कालौघांत नष्ट झाल्या व उरलेल्या हिटलरनें नष्ट केल्या.

७. मॅजिनो व सिग्फ्रीड लाईन्स : मॅजिनो ही संरक्षक तटबंदी फ्रान्सनें जर्मनीच्या भीतीनें आपल्या जर्मनीशीं असलेल्या सरहद्दीवर पहिल्या महायुद्धानंतर बांधली होती. अनेक वर्षें अगणित पैसा व अमाप साधन सामुग्री खर्च करून हिची रचना करण्यांत आली होती. जमिनीखालीं हिचा विस्तार होता, व विद्युत् गाड्यांच्या सहाय्यानें भिन्न विभागांशीं संबंध ठेवण्यांत येई. जर्मनीनें फ्रान्सवर चढाई करतांच सेडन येथें या तटबंदीला वळसा घालून फळी फोडली. त्यामुळें हा पांढरा हत्ती

कुचकामाचा ठरला. सिग्फ्रीड ही जर्मनांनीं मॅजिनोला समांतर बांधलेली टॅंकविरोधी संरक्षण व्यवस्था होय. दोस्तांच्या चढाईपुढें (१९४४) ही देखील निरुपयोगीच ठरली.

८. **पर्ल हार्बर**: हवाई बेटांतील अमेरिकेचा प्रशान्त महासागरांतील सर्वांत मोटा आरमारी तळ. ७ डिसेंबर १९४१ रोजीं जपानच्या विश्वासघातकी विमानहल्ल्यामुळें अमेरिकेचें अर्धें अधिक प्रशान्त नाविक दल निकामी ठरलें. पण अमेरिकन युद्धविरोधी जनता रूझवेल्टच्या युद्धधोरणास यामुळें एका क्षणांत अनुकूल झाली. पर्ल हार्बरमध्यें झालेल्या नाशामुळें दोन वर्षेंपर्यंत अमेरिकेला चढाईचें धोरण स्वीकारतां आलें नाहीं. यावरून तेथील हानीची कल्पना येऊं शकते.

९. **अटलांटिक सनद**: दुसऱ्या महायुद्धांत १४ ऑगस्ट १९४१ रोजीं रूझवेल्ट आणि चर्चिल यांनीं आपल्या दोन्ही राष्ट्रांच्या वतीनें या सनदेची घोषणा केली. या सनदेंत खालील तत्त्वांचा अंतर्भाव करण्यांत आला होता. (अ) इंग्लंड व अमेरिका यांना कोणतेंहि आक्रमण करावयाचें नाहीं. (आ) प्रत्येक प्रदेशाच्या सरहद्दीविषयीं तेथील जनतेचें मत निर्णायक मानण्यांत येईल. (इ) प्रत्येक राष्ट्राला स्वतःची शासनव्यवस्था ठरविण्याचें स्वातंत्र्य राहील. ज्या राष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट झालें आहे त्यांना पुनरपि स्वातंत्र्याचा लाभ करून देण्यांत येईल. (ई) जगाच्या साधनसामुग्रीचा उपभोग आणि व्यापाराचें स्वातंत्र्य सर्व राष्ट्रांना राहील. (उ) आंतरराष्ट्रीय सहकार्य मिळवून जगांतील सर्व मजुरांना वरच्या दर्जाचें जीवनमान प्राप्त करून देण्याची खटपट करण्यांत येईल. सर्वांना सामाजिक सुरक्षितता प्राप्त व्हावी यासाठीं प्रयत्न करण्यांत येतील. (ऊ) प्रत्येक राष्ट्राला स्वतःच्या भौगोलिक सरहद्दींत निर्भयपणें राहतां आलें पाहिजे. प्रत्येक व्यक्तीला आर्थिक सुरक्षितता आणि भीतीपासून मुक्तता मिळाली पाहिजे. (ए) सागर-स्वातंत्र्य सर्व

राष्ट्रांसाठीं अबाधित राहिलें पाहिजे. (ऐ) आक्रमक राष्ट्रांचें संपूर्ण निःशस्त्रीकरण करण्यांत यावें. कालांतरानें दोस्तांच्या बाजूनें लढणाऱ्या सोव्हिएट रशियासुद्धां सर्वांस राष्ट्रांनीं वरील तत्त्वांना मान्यता दिली.

१०. **याल्टा परिषद्:** युद्धोत्तर काळांत अत्यंत विवाद्य विषय झालेली परिषद. फेब्रुवारी १९४५ मध्यें रूझवेल्ट, चर्चिल आणि स्टॅलिन यांची संयुक्त बैठक याल्टा मुक्कामीं झाली. या परिषदेंत ठरलेल्या प्रगट आणि गुप्त करारांप्रमाणें युद्धोत्तर जगाची व्यवस्था लावण्यांत आली. विशेषतः जर्मनीबाबत काय करण्यांत यावें, याविषयीचें निर्णय घेण्यांत आले. संयुक्त राष्ट्रसंघटना स्थापण्यासाठीं परिषदेची आंखणी करण्यांत आली. रशियानें जपानविरुद्ध युद्ध पुकारावें असें ठरलें. या प्रमुख निर्णयाशिवाय अनेक युद्धजन्य प्रश्नांवर निर्णय घेण्यांत आले. या निर्णयांच्या अर्थाविषयीं आतां तीनहि राष्ट्रांत महत्त्वाचे मतभेद उत्पन्न झाले आहेत

११. **तिसरी आंतरराष्ट्रीय साम्यवादी संघटना:** (Third International) साम्यवादाच्या प्रसाराबरोबर १८६४ आणि १८८९ सालीं पहिल्या दोन आंतरराष्ट्रीय संघटना निर्माण झाल्या. पण त्या अल्पायुषी व असफल ठरल्या. तिसऱ्या संघटनेची सुरुवात लेनिननें १९१९ मध्यें मास्को येथें केली. या संघटनेशीं ५८ राष्ट्रांच्या साम्यवादी संघटना निगडित झाल्या होत्या. मास्को हें या आंतरराष्ट्रीय संघटनेचें केंद्र होतें. जागतिक साम्यवादी क्रांतीसाठीं आपल्या राष्ट्रांतून केंद्राच्या आदेशानुसार प्रयत्न करणें हें या संघटनेचें मुख्य कार्य. १९४३ च्या जूनमध्यें मास्कोनें अधिकृतरीत्या या संघटनेची इतिश्री केली. १९४७ मध्यें प्रमुख युरोपीय राष्ट्रांतील साम्यवादी पक्षांनीं कॉमिन्फॉर्म नांवाची नवी संघटना निर्माण केली. अनेकांच्या मतें १९४३ मध्यें विसर्जन पावलेल्या तिसऱ्या संघटनेचेंच हें पुनरुज्जीवन आहे. पण स्टॅलिननें एका वक्तव्यांत या आरोपाचा इन्कार केला. त्याच्या मतें कोणत्याहि राष्ट्रांतील बलिष्ठ साम्यवादी पक्षाचें मार्गदर्शन व नियंत्रण आंतरराष्ट्रीय संघटनेकडून होऊ शकणार नाहीं.

१२. **अणुशस्त्रें** : प्रो. आइन्स्टीन यांनीं दिलेल्या समीकरणावरून अणूचें विभाजन करण्यांत एन्रीको फर्मी व नील्स बॉहरसारख्या शास्त्रज्ञांनीं यश मिळविलें. या क्रान्तिकारक शोधामुळें आजवर मानवी बुद्धीला अज्ञात असलेल्या प्रचण्ड शक्तीचा उपयोग संहारासाठीं झाला. पण संहारक शस्त्रांची निर्मिति अणुशस्त्रांवरच थांबलेली नाहीं. अणुशस्त्रापेक्षां सहस्रपटीनें संहारक असे हायड्रोजन बॉंब व त्याहिपेक्षां अधिक भयानक असे कोबाल्ट बॉंब निर्माण करण्यांत आले आहेत. या नवीन शस्त्रांमुळें युद्धशास्त्र आणि राष्ट्रीय संरक्षण या दोन्ही क्षेत्रांत महत्त्वाचे बदल घडून आले आहेत.

१३. **उत्तर अटलांटिक तह-संघटना (NATO)** : संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या यंत्रणेचा उपयोग सहकार्याऐवजीं शीतयुद्धासाठीं होऊं लागला. परिणामतः प्रादेशिक संरक्षक करार अस्तित्वांत आले. विशेषें-करून पाश्चात्य युरोपीय राष्ट्रांनीं अमेरिकेच्या नेतृत्वाखालीं एप्रिल १९४९ मध्यें अशा प्रकारचा प्रादेशिक संरक्षक करार केला. या करारांत अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स, हॉलंड, बेल्जियम, लक्झेंबर्ग, पोर्तुगाल, इटली, डेन्मार्क, नॉर्वे, आइसलंड, कॅनडा हीं उत्तर-अटलांटिक राष्ट्रें सामील झालीं आहेत. या प्रदेशांतील राजकीय स्वातंत्र्य, समान संस्कृति यांच्या संरक्षणा-साठीं सहकार्यानें आक्रमकांचा विरोध करण्यासाठीं ही राष्ट्रें एकत्र आलेलीं आहेत. या राष्ट्रांपैकीं कोणत्याहि राष्ट्रावर आक्रमण झाल्यास त्याचा प्रतिकार सर्वांनीं करावयाचा आहे. या करारान्वयें अमेरिकेच्या सहाय्यानें युरोपमध्यें संरक्षक फौजा एकत्र करण्यांत आल्या आहेत. हा करार विशेषेंकरून सोव्हिएट राष्ट्रगटाच्या विरोधी आहे, हें स्पष्ट दिसतें. अमेरिकेच्या आर्थिक व लष्करी सहाय्यावर या संघटनेचा डोलारा अवलंबून आहे. या संघटनेचीं लष्करीं सूत्रें अमेरिकन सेनाधिकाऱ्यांच्या हातीं आहेत. आयसेनहॉवर यांचीं अध्यक्षपदीं निवडणूक झाल्यावर सरसेनापतिपद जनरल ग्रुएन्थर या अमेरिकन सेनापतीस देण्यांत आलेलें आहे.

१४. **ॲन्झस करार :** अमेरिका, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड या प्रशान्त महासागरांतील तीन राष्ट्रांनीं १ सप्टेंबर १९५१ रोजीं केलेला प्रादेशिक संरक्षणकरार. या करारान्वयें हीं राष्ट्रें प्रशान्त महासागरांतील प्रदेशावर झालेल्या आक्रमणाला संघटित प्रतिकार करतील. संरक्षण योजना निर्माण करण्यासाठीं 'प्रशान्त सागर समिती' (Pacific Council) ची स्थापना केलेली आहे. ब्रिटनची इच्छा या करारांत भाग घेण्याची असून देखील त्या राष्ट्राला वगळण्यांत आलें आहे. हा करार म्हणजे उत्तर अटलांटिक कराराची प्रशान्त महासागरांतील छोटी आवृत्ति आहे. दुसऱ्या महायुद्धांतील कटु अनुभवामुळें ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड हीं राष्ट्रें स्वसंरक्षणासाठीं दुबळ्या ब्रिटनऐवजीं अमेरिकेच्या कच्छपीं लागलीं आहेत.

१५. **अरबलीग :** २२ मार्च १९४५ रोजीं स्थापना. ईजिप्त, सौदी अरेबिया, इराक, ट्रॅन्सजॉर्डन येमेन या देशांचे राजे व सीरीया व लेबॅनॉन या राष्ट्रांचे अध्यक्ष यांच्या संमतीनें ही संस्था निर्माण करण्यांत आली. अरबलीगच्या कौन्सिलवर प्रत्येक सभासद्राष्ट्राचा एक प्रतिनिधि आहे. सभासद नसलेल्या अरब राष्ट्रांविषयीं (उदा. मोरोक्को) सहकार्याचें व सहानुभूतीचें धोरण. अरब राष्ट्रांचें स्वातंत्र्य, त्याचें संरक्षण व संवर्धन, अरब राष्ट्रांत परस्पर सहकार्य व विचारविनिमय व संघर्ष मिटविण्यासाठीं शस्त्रांचा उपयोग न करणें इत्यादि ध्येयांची घोषणा. जागतिक ज्यू संघटनेच्या (Zionism) विरोधासाठीं अरबलीगचा उदय. इस्राईल राष्ट्राच्या स्थापनेस अयशस्वी विरोध.

१६. **व्हिएट-नाम :** दुसऱ्या महायुद्धांत फ्रेंच इंडोचायना जपानच्या वर्चस्वाखालीं गेला. जपानच्या पराभवानंतर १९४५ मध्यें व्हिएट-नाम गणराज्याची घोषणा करण्यांत आली. डॉ. हो-चि-मिन्ह हा साम्यवादी नेता पहिला अध्यक्ष. फ्रेंचांच्या साम्राज्यवादी धोरणामुळें यादवी युद्धास सुरुवात. बाओ दाय या अनामच्या पदच्युत राजाला हाताशीं धरून फ्रेंचसत्ता बळकट

करण्याचे अयशस्वी प्रयत्न. १९४६-५३ या दीर्घ कालावधींत फ्रेंचांना आपली सत्ता प्रस्थापित करतां आलेली नाहीं. चीनमधील कम्युनिस्ट क्रांतीनंतर व्हिएटनामचा प्रश्न अधिकच बिकट झालेला आहे. कोरियांतील तहानंतर नवचीनची आर्थिक व लष्करी मदत हो-चि-मिन्हला अधिकाधिक प्रमाणांत मिळण्याची शक्यता. फ्रेंचांना अमेरिकेची वाढती मदत. कम्युनिस्ट वर्चस्वाला पायबंद घालण्यासाठीं धडपड. इंडोचायना कम्युनिस्ट झाल्यास इंडोनेशिया, ब्रह्मदेश, सयाम व मलाया या देशांत कम्युनिस्ट क्रांति अटळ. व्हिएट-नाम हें इंडोचायनाचें प्राचीन नांव पण सध्यां बाओदायच्या पक्षाचें नांव. हो चि-मिन्हच्या पक्षाचें नाव व्हीएट–मिन्ह.

---

# (२) कोष्टकें

## कोष्टक १ लें

## जगांतील प्रमुख देशांची लोकसंख्या व अपेक्षित वाढ

| नांवें | | १९४० | १९७० |
|---|---|---|---|
| १ सोव्हिएट रशिया | ... | १७४ | २५१ |
| २ नैऋत्य आणि मध्य युरोप | ... | २३४ | २२५ |
| ३ दक्षिण आणि पूर्व युरोप | ... | १६५ | १९२ |
| एकंदर (युरोप व रशिया) | ... | ५७३ | ६६८ |
| ४ संयुक्त संस्थानें | ... | १३३ | १५१ |
| ५ कॅनडा | ... | ११ | १५ |
| ६ दक्षिण अमेरिका | ... | १३२ | १८७ |
| एकंदर (नवें जग) | ... | २७६ | ३५३ |
| ७ जपान | ... | ७३ | ८८ |
| ८ हिंदुस्थान व पाकिस्तान | ... | ३८९ | ५५० |
| ९ चीन | ... | ४०० | ५०० |
| एकंदर | ... | ८६२ | ११३८ |

सर्व आंकडे दशलक्षांचे आहेत.

कोष्टक २ रें

प्रमुख देशांचें धान्योत्पादन (१९४७)

| देश | | गहूं | तांदूळ | मका |
|---|---|---|---|---|
| १ संयुक्त संस्थानें | ... | ३७,१७४ | १,६२० | ५४,६९७ |
| २ सोव्हिएट रशिया | ... | ३८,०८७ | ... | ४,६४८ |
| ३ चीन | ... | २३,६४७ | ४६,५०७ | ६,७०२ |
| ४ हिंदुस्थान | ... | ४,८७१ | २८,५९० | ... |
| ५ पाकिस्तान | ... | ३,३२० | ११,८१९ | ... |
| ६ अर्जेंटिना | ... | ६,६६४ | ... | ६,५०० |
| ७ कॅनडा | ... | ९,२७४ | ... | ... |
| ८ जपान | ... | ... | ११,१३४ | ... |
| ९ ऑस्ट्रेलिया | ... | ६,१३४ | ... | ... |
| १० रुमानिया | ... | ... | ... | ५,२७९ |

सर्व आंकडे सहस्र टनांचें आहेत.

कोष्टक ३ रें

## कांहीं प्रमुख देशांचें औद्योगिक उत्पादन (१९४८)

| देश | | कोळसा (दशलक्ष टन) | पोलाद (सहस्र टन) | पेट्रोल (शें. प्रमाण) | विद्युत् शक्ति (दशलक्ष किलोवॅट) | मोटारी (सहस्र) | सिमेंट (सहस्र टन) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ संयुक्त संस्थानें | ... | ५९०·७ | ८०,३१६ | ५९ % | ३,३६,५९२ | ५,२८५ | ३५,१०० |
| २ इंग्लंड | ... | २१०·७ | १५,११० | ... | ४६,५३६ | ४९८ | ८,६५२ |
| ३ सोव्हिएट रशिया | ... | २०३·८ | १६,५०० | ६·४% | ६३,००० | २७० | ६,५०० |
| ४ पश्चिम जर्मनी | ... | ८८·६ | ५,५६० | ... | २९,००४ | ५९ | ५,५२८ |
| ५ फ्रान्स (सार) | ... | ५५·८ | ८,४६४ | ... | २७,६०४ | १९७ | ५,३७६ |
| ६ हिंदुस्थान | ... | ३०·३ | १,२०० | ... | ... | ... | ... |
| ७ मध्यपूर्व | ... | ... | ... | १२ % | ... | ... | ... |
| ८ व्हेनिझुएला | ... | ... | ... | १४·३% | ... | ... | ... |

## अभ्यासू वाचकांसाठीं उपयुक्त ग्रंथांची यादी

(1) Morgenthau H.— Politics Among Nations.

(2) Schwarzenberger G.— Power Politics.

(3) Schuman F. L.— International Politics.

(4) Friedman W.— An Introduction to World Politics.

(5) Cole G. D. H.— The Intelligent Man's Guide to the Post-War World.

(6) Carr E. H.— The Twenty Years' Crisis 1919-1939.

(7) Parker Moon.— Imperialism and World Politics.

(8) Jack Belden.— China Shakes the World.




नकाशा १ जगांतील सत्तागटांची विभागणी.




नकाशा २ जगांतील पेट्रोल व युरेनियमचे सांठे.




नकाशा ३ प्रमुख आशियाई राष्ट्रांची खनिज संपत्ति.

# सूचि

( टीप—आंकडे पृष्ठांचे आहेत. )

# बहिःशाल शिक्षण ग्रंथमाला

## आगामी प्रकाशनें

—०—

२. “ महाराष्ट्राचें लोक-वाङ्मय ”

ले. सौ. अनसूया लिमये.

★ ★ ★

३. “ व्यक्ति-स्वातंत्र्याचा विकास ”

ले. श्री. मा. प. मंगुडकर.

★ ★ ★

४. “ वनश्री–दर्शन ”

ले. डॉ. म. वि. आपटे.

★ ★ ★

५. “ भारतीय पशु ”

ले. सौ. शकुन्तला पोंक्षे.